# अग्निद्वीप

[ १७ ]

[ आस्वली सैनिक उग्रदत्ताला त्यांचा सरदार कंध याच्याकडे घेऊन गेले. कंधनें एकपादाला ठार करण्यासाठीं उग्रदत्त याच्याशीं मैत्री करून त्याची मदत मागितली. त्यानें हें देखील सांगितलें कीं एकपादला ठार करणें वाटतें तितकें सोपें नाहीं. कारण त्याला मंत्राचें बळ प्राप्त आहे. पुढें वाचा. ]

व्याघ्रचर्मवाल्यांचा सरदार एकपाद याच्या असामान्य मांत्रिक शक्तीचें वर्णन ऐकून उग्रदत्ताच्या अंगावर शहारेच उभे राहिले. कंधच्या बोलण्यांत थोडें देखील खोटें नाहीं हें त्यानें तेव्हांच ओळखलें. एकपाद याचा वध होईपर्यंत तो किंवा त्याचे दोघे साथी व चंद्रसेना यांची सुटका होणें अशक्य आहे ह्याची त्याला पूर्ण जाणीव होती. पण रक्त सांडल्याशिवाय म्हणजे एकपादाची त्यावर नजर पडल्याशिवाय त्याचा शेवट कसा करावयाचा ?

उग्रदत्त याच विचारांत होता. तेवढ्यांत कंध म्हणाला—"एकदां माझ्या अनुयायांनीं त्याला धरलें देखील होतें. पण त्याचा वध करण्याची गोष्ट तर सोडूनच दे, त्यांनीं त्याला ठार करण्यासाठीं हातांत तलवार घेतल्याबरोबर त्यानें स्वतःच्याच तलवारीनें आपल्या शरिरावर लहान जखम करून




घेतली आणि त्याचें रक्त पाहून माझेच सैनिक मेले.

"याचा अर्थ असा कीं त्याच्यासमोर जाऊन युद्ध करणेंच अशक्य!" उग्रदत्तनें चकित होऊन विचारलें.

रुद्र म्हणाला—"मला वाटतें त्याच्या किल्ल्याला आपण वेढा दिल्यावर त्याला कसें ठार करावयाचें याचा विचार करूं. उग्राक्ष कांहींतरी युक्ती काढीलच."

उग्रदत्ताला रुद्रची सूचना तितकीशी पसंत पडली नाहीं. स्वतःच्या मुलासारखें ज्यानें मला लहानाचें मोठें केलें त्याच्याशीं असा विश्वासघात करावयाचा ! पण कंधच्या म्हणण्याप्रमाणें उग्राक्षाची मदत घेण्याखेरीज दुसरा उपाय तरी काय ? साहसी राक्षसांच्या मदतीशिवाय या भयंकर पक्ष्यांच्या सैन्याचा पराभव करणें अशक्य आहे.

उग्रदत्त विचार करीत उभा होता. कंधनें जवळ जाऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवून विचारलें—"मग काय ठरविलेंस, उग्रदत्त ! तूं आपल्या पोषक पित्याकडे निरोप पाठविणार कीं नाहीं ?"

"पण तिकडे कोण जाऊन निरोप पोंचता करणार ? मीच जाऊं म्हणतोस ?" उग्रदत्तनें विचारलें.

कंध कांहींच बोलला नाहीं. त्याच्या चेहऱ्यावर त्याच्या मनांतले भाव स्पष्ट उमटत होते. उग्रदत्तनें स्वतः जाणें त्याला पसंत नव्हतें. कारण तो स्वगृहीं पोंचला तर राक्षस रुद्र व आरुद्र यांची इतकी फिकीर करणार नाहींत व त्याला ठेवून घेतील. मग आपला हेतू साध्य होणार नाहीं. हें सर्व आळखून रुद्रच पुढें येऊन म्हणाला—"कपिलपूरला मी जातों. मी येथील सर्व परिस्थिती नीट समजाऊन सांगतों आणि आवश्यक मदत घेऊन येतों. माझा भाऊ



आरुद्र व्याघ्रचर्मवाल्यांकडे आहे. त्याला सोडविण्यासाठीं मी उलट पावलीं परत येईन. चंद्रसेनेला सोडवून आणणें किती अगत्याचें आहे हें मीच जास्त नीट पणें सांगूं शकेन. मला परवानगी द्या !"

कंधनें होकारार्थी मान हलविली. उग्रदत्तनें पण तें कबूल केलें. त्यानंतर कंधनें आपल्या अनुयायांपैकीं एकाला बोलावून रुद्रला भयंकर पक्ष्यांवर बसवून कपिलपूरला घेऊन जायला सांगितलें. तो जायला कबूल झाला. पण त्यानें एक शंका केली. म्हणाला—"सरदार ! उग्रदत्त व त्याच्या मित्रांना व्याघ्रचर्मवाले या भयंकर पक्ष्यांवरच धरून घेऊन आले. तेव्हां पासून उग्राक्ष व त्याच्या अनुयायांचा या पक्ष्यांवरच इतका राग आहे कीं आकाशांत भयंकर पक्षी दृष्टीस पडल्याबरोबर त्याला ठार करण्याचा प्रयत्न केल्याशिवाय ते राहणार नाहींत. निरोप पोंचविण्याची गोष्टच सोडून द्या, ते त्या पक्ष्यांना व आम्हांला जमिनीवर उतरल्याबरोबर ठार करतील. इतका राग आहे त्यांचा या पक्ष्यांवर."

उग्रदत्त कांहीं वेळ त्याविषयीं विचार केल्यावर म्हणाला—"तरमग रुद्र ! तूं एक काम कर. जमिनीवर उतरण्यापूर्वी आपल्या



अंगावरच्या कपड्याचा एक भाग फाडून जमिनीवर टाक व त्याबरोबर मी आपल्या पोषक पित्याच्या नांवीं जें पत्र देत आहें तें देखील टाक. तें पाहिल्यावर त्यांना सर्व उलगडा होईल व संकट टळेल."

ही युक्ती सर्वांना पसंत पडली. उजाडतांच उड्डाण करा असें आपल्या अनुयायांना सांगून कंध उग्रदत्तला बरोबर घेऊन त्याच्यासाठीं खास ठरलेल्या झोपण्याच्या खोलींत गेला.

* * *

तिकडे उग्राक्ष त्याचा लाडका मुलगा उग्रदत्त नाहींसा झाल्याचें ऐकून खिन्न मनानें



विचार करीत बसला होता कीं, हीं मुलें कोठें गेलीं. तेवढ्यांत त्याच्या दोघां अनुयायांनीं येऊन सांगितलें–“ सरदार एक मोठा.....भयं-कर....” बोलतां बोलतां भीतीनें त्यांची बोबडीच वळल्यासारखी झाली.

“बोला ना, काय झालें तें! राक्षसा-सारखे राक्षस आणि असे भितां काय? बोला!” उग्राक्षानें रागावून विचारलें–“ काय झालें, बोलाल कीं नाहीं?”

पण त्यांच्या तोंडावाटे शब्दच उमटेना. ते अडखळत घाबऱ्या आवाजांत म्हणाले– “कोणीतरी अग्निद्वीपांतला राहणारा दिसत आहे व दिवसाढवळ्या आपल्या या भागांत उतरण्याच्या प्रयत्नांत आहे. पहारेकऱ्यांनीं बाण सोडले व भाले रोखून उभे राहाले. तें पाहून त्यानें एक पुरचुंडी फेंकली आणि अजून वरच उडत आहे.”

“पुरचुंडी! कोठें आहे ती?” उग्राक्षानें जास्त रागानें विचारलें.

“ती एका झाडावर पडली व तेथेंच अडकून राहली. आमच्यापैकीं एक जण ती काढायला वर चढला आहे.” एकजण म्हणाला.

“आणि तूं रिकाम्या हातांनीं वेड्यासारखा येथें धांवत आलास! चला तर आपण तिकडेच जाऊं!” असें सांगून उग्राक्षपण निघाला.

कांहीं अंतर चालून गेल्यावर उग्राक्षाला एका उंच टेकडीवर कांहीं राक्षस मोठमोठ्यानें ओरडत असलेले दिसले. त्या वेळीं एक भयंकर पक्षी आकाशांत घिरट्या घालीत होता.

उग्राक्षाला येत असलेला पाहून दोघे पुढें धांवत गेले. एका राक्षसाच्या हातांत एक लहानशी पुरचुंडी होती. तो म्हणाला– “सरदार या भयंकर पक्ष्यावर कोणीतरी तिघे बसलेले दिसले. त्यांपैकीं दोघे व्याघ्र-चर्मवाले नसून अस्वलाचें कातडें त्यांच्या अंगावर आहे व एक साध्या माणसासारखे कपडे घातलेला आहे. त्यांनीं हें पत्र काप-डांत गुंडाळून खालीं टाकलें. असें सांगून त्यांनीं तें पत्र उग्राक्षाला दिलें.

उग्राक्षानें तें पत्र उघडून वाचण्याचा प्रयत्न केला. पण वाचतां न आल्यानें म्हणाला– “ही मनुष्यांची भाषा दिसते आहे. आप-ल्याला नाहीं वाचतां यायची.” राक्षसांबरोबर कांहीं मनुष्यपण होते. त्यांच्यापैकीं एकाला बोलावून उग्राक्षानें तें पत्र वाचायला दिलें.

त्यानें तें पत्र वाचलें व चकित होऊन म्हणाला–“ महाराक्षस! हें पत्र तर तुमचा दत्तक पुत्र उग्रदत्त याचें आहे. त्यानें तें पत्र अग्निद्वीपांतून लिहिलें आहे. या पक्ष्यावर जे तिघेजण आहेत त्यांपैकीं एक रुद्र आहे व अस्वलाचें कातडें घालून आलेले आपले मित्र आहेत. असें या पत्रांत लिहिलें आहे.”

“म्हणजे माझा उग्रदत्त अजून जिवंत आहे तर! तो परत येणार असें मला वाटतच होतें. तो परत येऊन माझा वारस म्हणून राज्य करणार हें नव्हतों का मी सांगत? तो स्वतःच कां नाहीं आला? त्यानें रुद्राला कां पाठवून दिलें? बरें तें मागाहून पाहूं. त्या भयंकर पक्ष्यावरच्या स्वारांना खालीं उतरायला



प्रथम खूण तर करा.” उग्राक्ष सशंक-पणेंच म्हणाला.

कांहीं राक्षस टेकडीवर, झाडावर वगैरे उंच जागीं चढून खालीं उतरण्यास हातवारे करूं लागले. एका दोघांनीं झाडाच्या फांद्या तोडून त्या हालवून खूण केली. तो भयंकर पक्षी एक दोन घिरट्या घालून उग्राक्ष उभा होता तेथें अगदीं जवळ खालीं उतरला. रुद्रानें पक्ष्यावरून खालीं उडी मारली व उग्राक्षाकडे धांवत आला.

त्याला पाहून उग्राक्षाला फार आनंद झाला. त्यानें आनंदाच्या भरांत त्याला



दोन्ही हातांनीं उचलून घेतलें व खालीं ठेवून उग्रदत्तची खुशाली विचारली. "तो तुझ्याबरोबर कां नाहीं आला? आरुद्र कोठें आहे?"

"उग्रदत्त खुशाल आहे. आरुद्र व नायक सुदर्शन याची मुलगी चंद्रसेना मात्र व्याघ्रचर्मवाल्यांच्या हातीं कैदेंत आहेत. व्याघ्रचर्मवाल्यांचा सरदार एकपाद याचा वध होईपर्यंत, त्यांना सुटका मिळणें अशक्य आहे व उग्रदत्तपण सुरक्षितपणें परत पोंचणें कठीण आहे. त्यानें तुला शक्य तितक्या लवकर यायला सांगितलें आहे." रुद्र म्हणाला.

"माझा मुलगा मदत मागतो? अरे प्राणपणानें त्याचें रक्षण करायला मी धांवेन. तोच माझा वारस माझ्या मागें हें माझें राज्य तो नाहींतर कोण पाहणार? काय बोलतोस तरी काय तूं?" उग्राक्ष म्हणाला. पण त्या वेळीं त्याचें सर्व अंग रागानें थरथर कांपत होते. त्याच्या मुलावर हात टाकण्याची हिंमत? पाहतो कोण त्याचा शत्रू आहे तो.

उग्राक्ष थोडा शांत झाल्यावर रुद्रनें अग्निद्वीपाची परिस्थिति थोडी समजावून सांगितली व म्हणाला—"व्याघ्रचर्मवाले आणि आस्वली यांचें हाडवैर आहे. आस्वली आपल्या बाजूनें आहेत. आपण जर व्याघ्रचर्मवाल्यांचा नायनाट करून अग्निद्वीपाचें राज्य त्यांना दिलें तर ते आपलें सख्य मान्य करून आपल्याला सर्व प्रकारें मदत करतील."

नंतर त्यानें एका आस्वली सैनिकाची ओळख करून दिली व म्हणाला—"हा आपल्याला वाट दाखवायला म्हणून आला आहे. आपल्याला समुद्र मार्गें अग्निद्वीपांत जावें लागेल. तेथें पोंचायला पुरे दोन दिवस लागतील."

नंतर रुद्र त्या आस्वली सैनिकाला तेथें वाट दाखवायला ठेवून पुन्हां भयंकर पक्ष्यावर बसून अग्निद्वीपांत गेला.



रुद्राक्ष आपल्या सैन्यांतील पांचशें निवडक राक्षसांना घेऊन अग्निद्वीपाकडे निघाला. ते डोंगर, नद्या व रानेंवनें ओलांडून सुमारें एका आठवड्यानें समुद्रकाठीं येऊन पोंचले. रुद्रनें सांगितल्याप्रमाणें दोन दिवसांत प्रवास संपला नाहीं.

राक्षसांनीं आयुष्यांत अगदीं पहिल्यानेंच समुद्र पाहिला होता. नजर जेथवर जाई तेथवर पाणीच पाणी होतें. तें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें.

"इतक्या मोठ्या समुद्रांत जमीन कोठून असणार? समुद्र केव्हांच गिळून टाकील. कांहींतरी लुच्चेगिरी तर नसेल? आपल्याला समुद्रांत बुडवून टाकण्यासाठीं हा व्याघ्रचर्मवाल्यांचा डाव तर नसेल?" उग्राक्षाचे अनुयायी परस्परांशीं पुटपुटत होते.

पण उग्राक्षाचे कान तिखट होते. तो ओरडला—"झाडें कापून त्यांचीं खोडें एकाला एक जोडून बांधा. प्रत्येकावर पन्नास जणांना बसावयाचें आहे. विसरूं नका. काळजीपूर्वक जुजुबी नावा केल्यांत तर तुम्ही सर्व सुरक्षित पणें अग्निद्वीपांत पोंचाल. नाहींतर...."

उग्राक्षानें एवढें सांगितल्यावर त्यांना थोडा धीर आला व सर्व कामाला लागले.



त्यांनीं मोठमोठीं झाडें उपटून काढलीं. डहाळ्या व फांद्या तोडून फेंकून दिल्या व मोठमोठे सोट एकाला एक जोडून नावा तयार केल्या.

सर्व प्रवासाला निघणार तोंच चित्रसेन कडून निरोप घेऊन एक दूत आला. त्याच्या कडून उग्राक्षाला अग्निद्वीपावरची सर्व हकीगत कळली व उग्रदत्त खुशाल असल्याचें चित्रसेनालापण कळल्याचें समजलें. चित्रसेनानें निरोप पाठविला होता कीं मी देखील सैन्य घेऊन मदतीला येत आहें. आपल्या मुलाला व्याघ्रचर्मवाले उचलून घेऊन गेल्याची वार्ता ऐकल्यापासून मला व महाराणीला चैन

पडतनासें झालें आहे. त्यानंतर नायक सुदर्शन याची कन्या चंद्रसेना हिला देखील व्याघ्रचर्मवाले उचलून घेऊन गेल्याचें ऐकून तर आम्हांला फारच काळजी वाटली. सुदर्शन नायकानें नागवर्माशीं झालेल्या प्रत्येक युद्धांत आम्हांला मदत केली होती. तो महाराणीचा नातेवाईक देखील आहे. युवराजाचें लग्न चंद्रसेनेशीं व्हावें अशी आमची इच्छा होती. पण दैवदुर्विलास कांहींतरी निराळाच दिसतो आहे.

त्या निरोपाचा परिणाम उग्राक्षाच्या मनावर अगदीं उलटाच झाला. त्याला भयंकर राग आला. तो आपली गदा उगारून म्हणाला—“ युवराज चंद्रसेन ! त्याच्यावर त्यांचा आतां हक्क नाहीं. तो माझा मुलगा आहे व त्याच्या बऱ्यावाइटाची जबाबदारी माझ्यावर आहे. तो सुदर्शन कोण व त्याची ती मुलगी चंद्रसेना कोण मला नाहीं माहीत. ती उग्रदत्ताला योग्यवधू आहे एवढें कळलें तें पुरें.”

जास्त बोलण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून दूत निघून गेला. त्यानंतर उग्राक्षाच्या आज्ञेनें राक्षसांनीं आपापल्या नावा समुद्रांत सोडल्या व त्यांवर बसून आस्वली सैनिकाच्या सल्ल्याप्रमाणें त्याच्या नावेमागें चालू लागले.

पुरा एक दिवस व रात्र निर्विघ्नपणें प्रवास केल्यावर पहाटे दूर आकाशांत आगीचे लोट त्यांना दिसले. “ अग्निद्वीप ! अग्निद्वीप !” भयभीत राक्षस ओरडले. कांहीं वेळानें त्या बाजूनें दूर आकाशांतून कांहींतरी काळी वस्तु उडत त्यांच्याकडे येत असलेली दिसली. तो भयंकर पक्षी होता.

[ पुढल्या अंकांत संपूर्ण ]






# शापग्रस्त देव

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ जाऊन त्यानें प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला—“ या अंधाऱ्या रात्रीच्या वेळीं सारें जग स्वस्थपणें झोंपलें असतां तूंच एक वेडा पीर कर्तव्य पालन करण्यासाठीं इतके कष्ट सोशित आहेस. मला वाटतें कीं तुला कोणी तरी शाप दिला असावा. कारण कोणी धर्मात्मा पुरुषानें शाप दिला तर तो देवाला देखील भोगावा लागतो. याचें उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतों. ऐक.” असें सांगून वेताळानें गोष्ट सुरू केली.

दक्षिणेकडे पूर्वेकडील समुद्रकाठावर एक मोठें देऊळ होतें. त्याचा पुजारी एक बाल ब्रह्मचारी होता. तो राजाकडून किंवा देवळाच्या अधिकाऱ्यांकडून पगार वगैरे कांहीं घेत नसे. पूजा, अभिषेक वगैरे



तो करीत असे. त्याला फक्त देवाचाच भरंवसा होता.

तो पुजारी एकटाच होता. आईवडील किंवा इतर नातेवाईक त्याला कोणी नव्हते. शिवालयच त्याचें घरदार सर्व कांहीं होतें. शंकरच आईबाप व नातेवाईक होते. गांवकरी येऊन पूजा वगैरे करीत. देवासमोर कांहीं ठेवलें तर तें तेवढें तो प्रसाद म्हणून ग्रहण करी. पूजा वगैरे आटोपून तो देवळांतच ध्यान धरून बसून राही. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, त्यानें देवाच्या सेवेलाच सर्व आयुष्य वाहून घेतलें होतें. सर्व त्याला एक धर्मात्मा पुरुष मानीत.

त्या शिवालयांतील सांबावर गांवकऱ्यांची फार भक्ती होती. कोणाला मूल नसेल किंवा आणखी कांहीं कष्ट असेल तर लोक येऊन नवस करीत व देव त्यांच्या हाकेला पावत असे. नवस फेडण्यासाठीं लोक येत. देवासमोर नवसाचा जिन्नस ठेवून जात. पुजारी तो जिन्नस राजाकडे पोंचता करी. असें वर्षानुवर्षे चालू होतें.

त्या गांवांत एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याला मूलबाळ कांहीं नव्हतें. एकदां देवळांत येऊन त्यानें अभिषेक करवून पुत्रप्राप्तीचा नवस मागितला आणि एक सोन्याचा आंबा देण्याचें कबूल केलें.

त्याच्या भाग्यानें कांहीं दिवसांनीं त्याची बायको गरोदर राहली व कालक्रमानें त्याला मुलगा झाला. नवसाला देव पावला म्हणून नवराबायकोला आनंद झाला. त्या श्रीमंत गृहस्थानें सोनाराकडून सोन्याचा एक आंबा करवून घेतला व नवस फेडण्यासाठीं तो देवळांत आला.

त्या वेळीं पुजारी ध्यान धरून बाजूला बसला होता. श्रीमंत गृहस्थानें फुलांफळांचें





तबक पुजाऱ्याजवळ ठेवलें व म्हणाला—"भटजी, मी समुद्रावर आंघोळ करून येतों. आल्यावर पूजा अभिषेक करा. मी तबक ठेवून जातों." असें सांगून तो स्नानाला निघून गेला.

पुजारी ध्यानमग्न होता व त्याला कोण येऊन काय बोललें हें कळलें नाहीं. त्यानें तें तबक पाहिलें नाहीं कीं त्यांतला तो सोन्याचा आंबा देखील पाहिला नाहीं.

तो श्रीमंत गृहस्थ स्नानाला निघून गेल्यावर कांहीं वेळानें देवळांत एक चोर आला. त्या चोराचापण त्या सांबावर पूर्ण विश्वास होता. तो प्रत्येक वेळीं चोरी करायला जाण्यापूर्वी सांबाला येऊन नमस्कार करीत असे व आपलें कार्य निर्विघ्न पार पडावें म्हणून देवाजवळ मागणें मागीत असे. तो चोर एक गरीब शेतकरी होता. सात आठ मुलें झाल्यामुळें शेतकीवर इतक्या मुलांचा उदर निर्वाह चालणें अशक्य झालें. म्हणून बिचाऱ्यानें हा 'नवीन धंदा' सुरू केला होता व 'देवाच्या कृपेनें' त्याला आपल्या 'धंद्यांत' चांगलें यशपण येऊं लागलें. अर्थातच त्याचा देवावरचा विश्वास अढळ होत गेला. नित्य नियमाप्रमाणें तो त्या दिवशीं पण देवाला नमस्कार करून कोठें तरी चोरीला जायचें असें मनाशीं ठरवून निघाला होता.

चोरानें देवळांत पाय ठेवल्याबरोबर पुजाऱ्याच्या शेजारीं ठेवलेलें तबक व त्यांतला तो सोन्याचा आंबा दिसला. त्यानें देवाचे आभार मानले आणि मनांतल्या मनांत देवाजवळ प्रार्थना केली—"देवा! आज तुझ्या कृपेनें मला तुझ्या पायांशेजारींच एक सोन्याचा आंबा मिळाला. हाच तुझा आशीर्वाद समजून मी आज चोरी करायला जात आहें. मुलांचें पोट भरलें नाहीं व तीं



उपाशीं मेलीं तर त्याचें पाप तुझ्याच कपाळीं. हा आंबा विकून मी दोनतीन महिने सुखानें राहीन. तोंपर्यंत चोरी करणार नाहीं. तूं अशीच कृपा वेळोवेळीं करीत गेलास तर मला चोरी करण्याची तरी काय गरज?" त्यानें पुन्हां एकदां नमस्कार केला व आंबा उचलून घेऊन गेला.

तो श्रीमंत गृहस्थ स्नान करून आला तेव्हां तबकांत आंबा नसलेला पाहून त्याला पुजाऱ्यावर संशय आला. त्यानें रागानें पुजाऱ्याला हलवून त्याचें ध्यान भंग केलें व म्हणाला—" काय रे भटा! माझा सोन्याचा आंबा कोठें लपवून ठेवला आहेस? तुझें बकध्यान आम्हांला कळतें."

" सोन्याचा आंबा! मी नाहीं पाहिला!" पुजारी म्हणाला.

" बऱ्या बोलानें आंबा कोठें आहे तो सांग. नाहींतर तुला राजासमोर उभा करीन. समजलास काय? मी आंबोळीला जातांना सांगून गेलों होतों तबक ठेवलें आहे म्हणून!" श्रीमंत गृहस्थ म्हणाला.

" मला कांहीं माहीत नाहीं!" पुजारी नम्रपणें म्हणाला.

त्या श्रीमंताला जास्तच राग आला. म्हणाला—" तो नवसाचा आंबा होता. तूं तो चोरून घेतला आहेस. तो तुला पचणार नाहीं. आजपर्यंत काय काय चोरलें आहेस तें तो देवच जाणें."

" मला देवाच्या घरीं चोरी करायची काय गरज? ती माझी माऊली, मी तिचा तान्हा! आईच्या घरीं चोरी करीन म्हणतां! असा मातृद्रोह, असा स्वामिद्रोह माझ्या हातून कधीं घडणार नाहीं." भावुक पुजारी म्हणाला.

सगळे चोर असेच बोलतात. चोरी करून देवाच्या डोक्यावर आळ आणणारे तुम्ही पुजारी! तुला जें कांहीं बोलायचें असेल राजासमोर बोल!" असें सांगून तो निघून गेला आणि राजदरबारी त्यानें फिर्याद केली.

राजानें पुजाऱ्याला हजर करायला हुकूम सोडला. पुजाऱ्यानें त्याला त्या आंब्याविषयीं कांहीं माहीत नसल्याचें सांगितलें. पण राजानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. म्हणाला—" तबकांत आंबा होता. ज्यावेळीं तबक ठेवलें त्या वेळीं देवळांत तूं एकटाच होतास. आंबा नाहींसा झाला तेव्हां पण तूं तेथेंच होतास. तबक ठेवून जात आहे असें शेटजींनीं तुला सांगितलें होतें. मग दुसरा कोण जबाबदार या चोरीला? तूं चोरी केलीस कीं नाहीं तें मला माहीत नाहीं. पण चोरीची जबाबदारी मात्र तुझ्यावरच आहे एवढें विसरूं नकोस. तूं आजपर्यंत किती माल अशा तऱ्हेनें गडप केला असशील तें तो देवच जाणें." सांगून राजानें त्याला दहा फटक्यांची शिक्षा दिली.

चांडाळ हासूड घेऊन आला. त्यानें एक हासूड मारल्यावर पुजाऱ्याला भयंकर राग आला. तो राग राजावर नव्हता कीं त्या श्रीमंत माणसावर नव्हता. राग होता देवावर.



तो देवाला म्हणाला—" माझ्याशिवाय त्या वेळीं देवळांत कोणी नव्हता म्हणून मला ही शिक्षा होत आहे. देवा तूं तर होतास. कां नाहीं येऊन साक्ष दिलीस. इतके दिवस मी तुझी सेवा केली त्याचें हेंच का फळ? जो देव आपल्या भक्ताचें रक्षण करूं शकत नाहीं त्याचें हें देऊळ कशाला? समुद्रांत बुडून कां नाहीं जात?"

पुजाऱ्याचें बोलणें संपतांच समुद्राचें पाणी वाढूं लागलें. जमीन हादरूं लागली. लाटा देवळाच्या भिंतीवर येऊन आदळूं लागल्या, व थोड्या वेळानें देऊळ पाण्याखालीं बुडून

गेलें. समुद्राचें पाणी ओसरलें तेव्हां देऊळ नाहींसें झालेलें होतें.

राजानें येऊन पुजाऱ्याचे पाय धरले व क्षमा मागितली.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें— "राजा! मला हें कळत नाहीं देवानें असें स्वतःचें तोंड कां लपविलें? तो व देऊळ असें अदृश्य कां झालें? सर्व शक्तिमान देव आपल्या भक्ताचें रक्षण कां करूं शकला नाहीं व स्वतःचें देखील कां करूं शकला नाहीं. त्याला त्याच्या भक्ताच्या शापामुळें समुद्रांत बुडी मारून कां दडून बसावें लागलें? या प्रश्नाचें उत्तर तुला माहीत असून जर तूं दिलें नाहींस तर परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर पडतील."

विक्रमार्क म्हणाला—"देवानें जें केलें तें सर्व गोष्टींचा विचार करूनच केलें. पुजाऱ्याचें रक्षण करावयाचें म्हणजे खरा चोर कोण आहे हें सांगावें लागणार. पण पुजाऱ्यासारखाच चोरपण देवाचा भक्त होता. चोराला शिक्षा झाली असती तर आठदहा प्राणांवर संकट आलें असतें. याशिवाय स्वतः देव साक्ष द्यायला आला तर देवावरचा विश्वासच उडाला असता. उलट भक्ताच्या शापानें फळ तो भोगायला तयार झाला तर देवाचा महिमा जास्त वाढेल. देवाला हा नित्याच पेच प्रसंगपण नकोसा वाटूं लागला असावा. कारण चोर, संन्यासी, धनी गरीब सर्व आपला आपला स्वार्थ साधण्यासाठीं देवाला संकटांत घालूं लागले होते. म्हणून देवानें या पेचप्रसंगाला तोंड म्हणून भक्ताच्या शापासमोर मान वांकवून भक्ताला मोठेंपण दिलें व आपला महिमा वाढविला."

अशा तऱ्हेनें मौनभंग झाल्यामुळें वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला व जाऊन झाडाला लोंबकळूं लागला.





# सौजन्यच नडलें

[२]

दोघे मित्र तंबूत बसून जेवत होते तेव्हां ज्या स्त्रीचें लग्न जाफरशीं झालें होतें, तिनें पालखीचा परदा थोडा बाजूला सारून दोघांना पाहिलें. दोघांची मैत्री निभावून नेण्यासाठीं अत्तफनें हा त्याग केला व स्वतः होऊन जाफरशीं आपलें लग्न करून दिलें हें कळायला तिला वेळ लागला नाहीं.

जाफर आपल्या नोकरांचाकरांबरोबर निघाला. तो पालखीजवळ येऊन म्हणाला— "प्रियतमे! तुझें रूप पाहून...."

ती जाफरला म्हणाली—"मी आपली प्रियतमा नसून अत्तफची आहे. त्यानें हा त्याग तुमच्यासाठीं केला आहे. तुम्ही त्याचे खरे स्नेही व मित्र असाल तर तुम्ही त्याची वस्तु त्याला परत देणें बरोबर होईल."

"म्हणजे! माझ्यासाठीं अत्तफनें एवढा त्याग केला!" जाफर उद्गारला.

"तुम्ही मला पाहाल्यावर त्याला सांगितलें असेल. आपल्या मित्रासाठीं अत्तफ स्वतःचा प्राण द्यावा लागला तरी मागें पुढें पाहणार नाहीं." ती म्हणाली.

जाफरला आपल्या मित्राचा तो उदार स्वभाव पाहून रडूं कोसळलें. म्हणाला— "आतां या पुढें अत्तफसाठीं तुझ्या रक्षणाचा भार माझ्यावर राहील. तुला डेमास्कसला परत पाठविल्यास तुझ्या वडिलांच्या मनांत विनाकारण निरनिराळ्या शंका कुशंका उठूं लागतील. म्हणून अत्तफला बगदादला बोलावून घेऊं व तेथेंच मी तुझं त्याच्याशीं लग्न लावून देईन."




तिकडे बगदादला जाफर निघून गेल्यावर खलीफाला फार वाईट वाटलें. आपण आपल्या एका विश्वस्त माणसाला आपल्या लहरी स्वभावामुळें घालवून बसलों. तो रानावनांत हिंडत असेल. त्यानें जाफरच्या शोधार्थ लोक पाठविले. चार महिन्यानंतर एका दूतानें येऊन सांगितलें कीं जाफर लग्न करून आपल्या बेगमेबरोबर येत आहे. खलीफा त्याला सामोरा गेला आणि प्रेमानें भेटून विचारलें—" मित्रा ! इतके दिवस तूं मला कसा विसरलास ? कोठें होतास ?"

जाफर खलीफाला आपलें लग्न झालेलें सांगून म्हणाला—" पण हें अत्तफच्या त्यागा-मुळेंच होऊं शकलें."

खलीफाला अत्तफच्या त्यागाचें वर्णन ऐकून आश्चर्य वाटलें. म्हणाला—" असा मित्र दुर्मीळ असतो. त्याला आदरपूर्वक घेऊन येण्यासाठीं मी निरोप पाठवितों."

जाफरनें अत्तफच्या प्रेमिकेला राहण्यासाठीं उत्तम व्यवस्था करून दिली. तिच्या तैनाती-साठीं दासी नेमल्या. तो स्वतः कधीं अत्तफच्या प्रेमिकेस भेटायला गेला नाहीं. नोकराला पाठवून कुशल क्षेम विचारून घेऊं लागला. त्यानें तिच्याकडे असाहि निरोप पाठविला कीं अत्तफला स्वतः खलीफानें बोलावणें पाठविलें आहे व त्यांच्यासमोर तुझें अत्तफशीं लग्न करून देण्याचें ठरलें आहे.

तिकडे डेमास्कसला सर्व लोकांना कळलें कीं खलीफांचा वजीर जाफर व अत्तफ यांची मैत्री आहे. म्हणून अत्तफच्या शत्रूंनीं त्याच्या-विरुद्ध राज्यप्रतिनिधि व अधिकाऱ्यांचे कान भरायला सुरवात केली. जोंपर्यंत हा आहे तोंपर्यंत तुम्हांला पगारांत बढती मिळणें शक्य नाहीं व हुद्दापण वाढणार नाहीं. कारण त्यानें खलीफांकडे जाफर मार्फत तुमच्या-विरुद्ध कागाळ्या केल्या आहेत. म्हणून वेळींच सावध व्हावें !"

राजप्रतिनिधी मूर्ख व आततायी होता. त्यानें अत्तफला कैद करून त्याला सुळावर चढविण्याची शिक्षा सुनावली. पण त्या अधिकाऱ्याच्या कांहीं सुज्ञ स्नेह्यांनीं त्याला सल्ला दिला कीं या कामांत इतकी घाई करूं नये. दुष्ट लोक खोटें बोलायला कमी करत नाहींत. हें कळलें तर जाफर तुम्हांला कामा-वरून कमी तर करीलच मृत्युदंड सुद्धां देईल. अत्तफला दिलेल्या शिक्षेची गोष्ट लपवून ठेवणें शक्य नाहीं.

राजप्रतिनिधि तें ऐकून घाबरला. त्यानें अत्तफला कैदेची शिक्षा दिली. पण अत्तफ एके दिवशीं कैदेंतून पळून गेला. अनेक कष्ट व यातना त्याला सहन कराव्या लागल्या. कोठें जावें हेंच त्याला कळत नव्हतें. आपल्या या स्थितींत कोणा मित्राकडे किंवा नाते-वाइकांकडे जाणें तर त्याला बिलकुल पसंत नव्हतें. शेवटीं तो बगदादला जाणाऱ्या एका काफल्याबरोबर निघाला आणि एक महिना पायीं प्रवास करून बगदादला आला.

दोन दिवस उपाशी सर्व शहर फिरला व तिसऱ्या दिवशीं एका मशीदींत जाऊन



बसला. त्याचे सर्व कपडे फाटून गेले होते. अंगावर मांस उरलें नव्हतें. दाढी वाढलेली होती. डोळे खोल आंत गेले होते. उपास-मार व झोंप नाहीं म्हणून तो इतका रोड झाला होता कीं त्याच्याकडे पाहणाऱ्याला दया येण्याऐवजीं घृणाच होत होती.

थोड्या वेळानें त्याच्यासमोर एक भिकारी येऊन बसला. आपली झोळी सोडून रोट्या, भाजी, फळें व अन्य पदार्थ एका मागून एक खाऊं लागला.

भुकेनें अत्तफचा जीव कासावीस होत होता. पण मागण्याची हिंमत झाली नाहीं.

त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रू वाहूं लागले. भिकाऱ्यानें डोकें वर करून त्याच्याकडे पाहिलें व म्हणाला—

"तूं आपल्या या अश्रूंनीं हें सारें वाळवंट भिजवून काढलेंस तरी तुला मी एक देखील तुकडा द्यायला तयार नाहीं. पण एक सल्ला देतों. खलीफाचा वजीर जाफर दान करीत आहे. अत्तफ नांवाचा त्याचा कोणी मित्र आहे, म्हणे. त्यानें फार मोठें दानपुण्य करून व त्याग करून जाफरची मैत्री संपादन केली. तो झोंपतांना एकदां अत्तफला मनांतल्या मनांत सलाम करून त्याचे आभार मानतो. तूं त्याच्याकडे जाऊन मागितलेंस तर तो तुला पोटभर जेवायला घालील.

अत्तफला भोवळ आल्यासारखें झालें. तरमग आपला तो पाहुणाच वजीर जाफर होता काय? आपण सहज त्याला जाफर म्हणून लोकांना खोटें सांगितलें होतें. देवाच्या कृपेचा दाखला याहून जास्त तो काय असणार? त्याच्या जिवांत जीव आला. त्यानें जाफरच्या नांवीं एक पत्र लिहिलें व जाफरचा पत्ता विचारीत त्याच्या घरीं गेला. फाटकावर उभ्या पाहरेकऱ्यांना म्हणाला—"माझें नांव अत्तफ आहे. आपल्या मालकाला एवढी चिठ्ठी नेऊन दे!"

त्या शिपायानें दोन शिव्या हासडल्या व म्हणाला—"तूं अत्तफ! आमचे मालक तर रोज सकाळीं उठतांना व झोंपतांना त्याला नमस्कार करतात आणि तूं त्या धर्मात्म्याचें नांव स्वतःला लावून घेतोस? हो चालता!" असें सांगून त्यानें अत्तफला दोन वेत लगावले. अत्तफ बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. त्याच्या तोंडांतून रक्त वाहूं लागलें.

तरी तो म्हणाला—"माझें हें पत्र माझ्या मित्राला नेऊन दे!" नोकर थोडा चपापला व चिठ्ठी घेऊन आंत गेला. त्या वे जाफर आपल्या स्नेही मंडळींबरोबर ब अत्तफचा गुणानुवाद करीत होता—" कोण, माझा हुद्दा काय हें कांहीं माह नसूनहि त्यानें माझ्यासाठीं काय न केलें? त्याच्यासारखा मनुष्य या दुनि मिळणार नाहीं. त्याचें ऋण आयुष्य फेडणें मला शक्य होणार नाहीं." त्य वेळीं नोकरानें चिठ्ठी आणून दिली.

पत्रावर अत्तफची सही पाहून जाफर घेरीच आली. त्याच्या हातांतला दारू पेला जमीनीवर पडून फुटला. त्याची क







जाफरच्या कपाळाला लागली व एक मोठी जखम झाली त्याचें सर्व तोंड रक्तबंबाळ झालें.

जाफरचे स्नेही बाहेर धांवले—"कोण आहे तो चिठ्ठी देणारा! पकडा त्याला." अत्तफला शोधायला वेळ लागला नाहीं. कारण तो फाटकाजवळच उभा होता. त्यांनीं त्याला काजीकडे पाठविलें. काजीनें मागचा पुढचा विचार न करतां त्याला पन्नास फटक्यांची शिक्षा दिली. अत्तफला कैदेंत टाकण्यांत आलें व त्याला पन्नास फटके मारण्यांत आले.

जाफर शुद्धीवर आल्यावर अत्तफच्या चिठ्ठीची गोष्ट त्याला आठवली. पण चिठ्ठीच मिळाली नाहीं. त्यानें फक्त सहीच पाहिली होती. चिठ्ठी वाचली नव्हती. म्हणून मजकूर पण कळला नाहीं. मित्राला भेटूं न शकल्याबद्दल त्याला मनस्वी दुःख झालें.

अत्तफ तुरुंगांत असतांना खलीफांना एक मुलगा झाला. कैद्यांना सुटका देण्याचा हुकूम झाला. अत्तफ कैदेंतून सुटला पण कोठें जावें काय करावें त्याला सुचेना. जाफरच्या घरीं जाण्याचा विचारच त्याच्या मनांत आला नाहीं. डेमास्कसला परत जावें म्हणावें तर राजप्रतिनिधि पुन्हां तुरुंगांत टाकील. बगदाद शहरांत कोठें थारा मिळण्याची शक्यता नाहीं. येथें तर भिकाऱ्यांचे देखील संघ आहेत. गरिबांचा वाली या शहरांत कोण मिळणार? जाफरला आपला भाऊ म्हणून आजवर मानीत आलों ती चूक होती. आतां अल्लाचा आधारच काय तो उरला आहे. अत्तफनें ती रात्र मशीदींतच काढण्याचें ठरविलें. परंतु मशीदींत रात्री रहायला परवानगी नव्हती. म्हणून एका पडक्या रिकाम्या घरांत ती रात्र काढण्याच्या हेतूनें तो शिरला. काळोखांत कांहीं दिसलें नाहीं व पायाला कांहीं तरी लागलें. त्यानें वाकून पाहिलें तर तें माणसाचें शरीर होतें.





कोणी तरी त्या माणसाचा खून केला होता. जवळच खंजीर पण पडला होता.

अत्तफ बाहेर आला व गस्त देणाऱ्या शिपायांना बोलावून त्यानें तें दाखविलें. त्यांनीं अत्तफलाच खुनी समजून धरलें व खूप चोप दिला. त्यांनीं त्याला कैदेंत टाकलें.

दुसऱ्या दिवशीं काजीच्या समोर अत्तफला हजर करण्यांत आलें. काजीनें चवकशी करून दुसऱ्या दिवशीं निकाल सांगितला. आदल्या दिवशीं रात्रीं त्यानें जाफरकडे जाऊन त्याचा सल्ला घेतला. म्हणाला—"एक मनुष्य भिकारी दिसतो आहे. त्याच्यावर खुनाचा आरोप आहे. त्याच्याजवळ शिपायांना तर सुरा देखील सांपडला आहे. त्याला काय शिक्षा द्यावी."

"त्याचें डोकें उडवावें." जाफरनें हुकूम दिला.

दुसऱ्या दिवशीं जाफर पायींच फिरायला निघाला तेव्हां त्याला वध्यस्थानाजवळ गर्दी दिसली. त्यानें जवळ जाऊन काजीला विचारलें—"कोणाला तरी शिक्षा देतां आहां वाटतें?"

"होय, एका खुनी माणसाला शिरच्छेदाची शिक्षा दिली आहे. डेमास्कसहून तो बगदादला आला होता, म्हणे."

डेमास्कसचें नांव ऐकतांच जाफरनें अत्तफकडे निरखून पाहिलें. पण तो त्याला ओळखूं शकला नाहीं. अत्तफच्या चेहऱ्यांत इतका बदल झाला होता. त्याला त्यानें विचारलें—"कायरे, कोठला राहणारा? खुद्द डेमास्कसचा कीं जवळपासच्या खेड्यांतला?"

"खुद्द डेमास्कसचाच राहणारा आहें!" अत्तफ म्हणाला.

"डेमास्कसला अत्तफ नांवाचा एक उदार तरुण आहे, त्याला तूं ओळखतोस का?" जाफरनें विचारलें.

"होय! आपली व त्याची मैत्री होती. आपण त्याच्याच घरीं रहात होता. त्याच्या नात्यांतल्या एका मुलीशींच आपलें लग्न झालें होतें, मला तें सगळें माहीत आहे. बगदादला परत येतांना आपण त्याचा निरोप घेतला, हें देखील मला आठवतें." अत्तफ म्हणाला.

"पण तो हल्लीं तेथें नाहीं. कोठें गेला?" जाफरनें विचारलें.

"तो आपल्याच शोधार्थ निघाला. पण त्याचें भाग्यच उफराटें निघालें आणि आज त्याला वध्यस्थानी खुनी म्हणून धरून आणण्यांत आलें आहे!" अत्तफ म्हणाला.

"म्हणजे!...." असें म्हणून जाफर चकित होऊन अत्तफकडे पाहूं लागला. ओळख पटली. त्यानें आपल्या मित्राला मिठी मारली.

इतक्यांत एक म्हातारा ओरडत आला— "थांबा, थांबा!"

"कोण तूं?" जाफरनें त्याला विचारलें.

"खरा खुनी!" म्हातारा म्हणाला.

"तूं खून कां केलास?"

"त्या पाजी माणसाचा एकदांच काय दहादां खून करायला मिळाला तर त्यांत



पाप नाहीं. पण माझ्याऐवजीं एका निरपराध माणसाचा शिरच्छेद होत आहे, हें ऐकून मी आलों आहें." तो म्हणाला.

"तुझ्या बोलण्यावर आमचा विश्वास नाहीं. तुझ्यावर आरोप साबीत होईपर्यंत अत्तफची शिक्षा रद्द झाली आहे." जाफर म्हणाला.

जाफरनें आपल्या मित्राचा हात धरला व त्याला घेऊन घरीं गेला. तेथें स्नान वगैरे झाल्यावर त्याला घेऊन खलीफाकडे गेला.

"जाफरच्या तोंडीं तुझ्या औदार्याचें वर्णन मी ऐकलें आहे. पण तूं असा ह्या तऱ्हेनें कां आलास?" खलीफानें विचारलें.








अत्तफला रडूं कोसळलें. पण त्यानें आपली करुण कहाणी जेव्हां सांगितली, ती ऐकून खलीफा देखील स्वतःला आवरूं शकले नाहींत. त्यांच्या डोळ्यांना टिपें आलीं. त्यांनीं जाफरला विचारलें—"या तरुणाचें ऋण तुझ्यावर किती आहे हें मी सांगण्याची गरज नाहीं."

"त्यानें माझ्या करतां जें केलें त्या उपकाराची फेड मी या आयुष्यांत तरी करूं शकणार नाहीं. त्याचा सेवक गुलाम म्हणून आयुष्य घालवायला मिळालें तर मला आनंदच होईल." जाफर म्हणाला.

अत्तफचें भाग्य पुन्हां पालटलें. खलीफानें राज्यप्रतिनिधीला धरून आणण्यास हुकूम सोडला. अत्तफचें त्याच्या प्रेमिकेशीं खलीफाच्यासमोर लग्न झालें. डेमास्कसला ही बातमी गेली तेव्हां अत्तफला डेमास्कसहून लवकर परत येण्यासाठीं पत्रावर पत्रें येऊं लागलीं.

खलीफाला अत्तफनें परत डेमास्कसला जाऊं नये असें वाटत होतें. परंतु आग्रह केल्या मुळें त्यालाच डेमास्कसचा काजी म्हणून नेमून खलीफानें त्याला निरोप देण्याचें ठरविलें. त्याला रत्नें व जड जवाहीर उपहार म्हणून दिले आणि खेचरें, उंट व नोकरचाकर पण बरोबर पाठवून मोठ्या थाटानें निरोप दिला.

अत्तफ पुन्हां डेमास्कसला एक काजी म्हणून येत असल्याचें ऐकून डेमास्कसच्या राहिवाश्यांनीं स्वागताची तयारी केली.

अत्तफनें डेमास्कसला आल्याबरोबर डेमास्कसच्या अधिकाऱ्याला त्याचे सर्व अपराध माफ करून कैदेंतून सुटका दिली.

त्या दिवशीं रात्रीं खलीफाला तें पुस्तक मिळालें होतें व त्याविषयीं त्यानें जाफरला जो प्रश्न विचारला होता, त्याची गोष्ट खलीफा पार विसरून गेला. जाफरनें देखील त्याची आठवण करून दिली नाहीं.





# * दोन मित्र *

फ्रान्स देशांत घडलेली ही गोष्ट आहे.

एकाच दिवशीं दोघां जमीनदारांना दोन मुलें झालीं. दोघांचा जन्मच एका दिवशीं झाला नाहीं, त्यांचा चेहरामोहरा पण एकच होता, इतका कीं दोघे जुळीं भावंडें वाटत. एकाचें नांव अमिल होतें व दुसऱ्याचें अमिस. एकदां दोघे जमीनदार सहज भेटले व परस्परांच्या मुलांत साम्य पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटलें. तेव्हांपासून दोघां मुलांचा पण परस्पर स्नेह वाढत गेला.

वयांत आल्यावर दोघे राजाच्या पदरीं नोकरीला लागले. राजाला दोघांत थोडा फरक देखील दिसला नाहीं. पण त्यानें त्यांना कामें मात्र अगदीं निरनिराळीं दिलीं.

पुढें कांहीं दिवसांनीं अमिसचें एका मुलीवर प्रेम जडलें व त्याचें लग्न पण झालें. परंतु त्या मुलीचें प्रेम अमिसवर जितकें होतें त्याहून त्याच्या जमीनजुमल्यावर व संपत्तीवर जास्त होतें. अमिस व अमिल यांची परस्परांशीं मैत्री तिला खपत नसे. परंतु तिनें अमिलविषयीं तिच्या मनांतला तिटकारा पतीला कधीं कळूं दिला नाहीं.

अमिलनें लग्न केलें नाहीं. त्याला एक कारण होतें. राजाच्या मुलीवरच त्याचें मन बसलें होतें. तिच्याशिवाय दुसरीशीं लग्न करावयाचें नाहीं अशी त्यानें मनांतल्या मनांत प्रतिज्ञाच केली होती. परंतु ही प्रतिज्ञा पुरी होणें तितकें सोपें नव्हतें.

राजकुमारीच्या मनांत अमिलविषयीं कधीं विचार तरी उठला कीं नाहीं कोणास ठाऊक? राजकन्येचा विवाह कोणत्यातरी राजकुमाराशीं झाला पाहिजे असें राजाला वाटे.

एकदां अमिस आपल्या सासुरवाडी जायला निघाला तेव्हां अमिल त्याला निरोप द्यायला

श्री. वा. गो. पाठक

आला. त्या वेळीं तो अमिलला म्हणाला—"संभाळून रहा बुवा! आपल्या वेड्या प्रेमाला थोडी वेसण घाल, नाहींतर मागाहून पश्चात्ताप करीत बसावें लागेल."

"मी घाईत कांहीं करणार नाहीं!" अमिलनें वचन दिलें. अमिस आपल्या बायकोबरोबर निघून गेला.

अमिलला सुद्धां ही गोष्ट कळली नव्हती कीं स्वत: राजकन्येचें मन देखील त्याच्यावर बसलें आहे. एकदां अमिलला ती एकांतांत भेटली तेव्हां परस्परांचें परस्परावर प्रेम असल्याची गोष्ट त्यांना कळली. अमिलला आनंद झाला. त्यानंतर दोघं परस्परांना अनेकदां भेटलीं.

परंतु एकदां दोघांना एकांतांत बोलत असतां एका अधिकाऱ्यानें पाहिलें. अमिल व अमिसवर राजाची मर्जी होती हें त्या अधिकाऱ्याला आवडलें नाहीं. तो संधी पहात होता व ती चालून आली. त्यानें तिखट मीठ लावून राजाचे कान भरले. राजानें अमिलला बोलावून विचारलें—"तूं राजकन्येला एकांतांत भेटतोस असें मला कळलें आहे. तुझा धाडशीपणा पाहून कौतुक वाटतें!" राजा व्यंग करून म्हणाला.

अमिलला ज्या गोष्टीची भीति होती तेंच घडलें. खोटें बोलणें पाप आहे. सत्याचाच नेहमीं जय होतो, असा अमिलचा ठाम विश्वास होता. खरें बोलावें तर राजाचा कोप होणार. म्हणून तो म्हणाला—"मला याविषयीं कांहींच बोलावयाचें नाहीं."

पण तो अधिकारी स्वस्थ बसला नाहीं. त्यानें विचारलें—"म्हणजे मी खोटा आणि तूं खरा, हेंच कीं नाहीं. देवाला साक्षी ठेवून मी तुला द्वन्द्व युद्धाला आव्हान करीत आहें."

राजा व दरबारी यांच्या समक्ष द्वन्द्व-युद्धासाठीं वेळ ठरली. अमिल राजाचा निरोप घेऊन अमिसला भेटायला गेला आणि संयोग असा कीं त्याच दिवशीं अमिस आपल्या सासुरवाडहून परत आला होता. दोघांची वाटेंतच गांठ पडली.

अमिलनें घडलेलें वृत्त थोडक्यांत सांगून या पेच प्रसंगांतून कांहींतरी तोड काढायला सांगितलें. म्हणाला—"मित्रा! चहाडखोरां-पासून देव माझें रक्षण करणार नाहीं असें का वाटतें तुला? आतां या गोष्टीचा निकाल लागलेलाच बरा असें मला वाटत आहे."

अमिस थोडा वेळ विचार करून म्हणाला—"तूं माझ्या घरीं निघून जा. वेळ प्रसंग







येईल तसें मी पाहून घेईन. मी कळवीपर्यंत येऊं नकोस. त्या चहाडखोराचा समाचार मी घेतों. मी त्याच्याशीं द्वन्द्व युद्धास जातों. तो मला ओळखूं शकणार नाहीं. त्यांत मी शिरस्त्राण व कवच घालून गेलों तर तोच काय मला कोणी देखील ओळखूं शकणार नाहीं. या शिवाय मी राजकुमारीला कधीं भेटलों नाहीं किंवा एकांतांत तिच्याशीं बोललों नाहीं हें बेधडक सांगूं शकेन व खोटें बोलल्याचा अपराधपण लागणार नाहीं."

अमिल आपल्या मित्राच्या सांगण्याप्रमाणें त्याच्या घरीं निघून गेला. अमिसनें त्याच्या ऐवजीं द्वन्द्व युद्ध करून त्या चहाडखोर अधिकाऱ्याचा वध केला. त्यावरून दरबारी व राजा सर्वांची अमिल निरपराध असल्याची खात्री पटली. राजानें एका चहाडखोर अधिकाऱ्याच्या बोलण्यावर विश्वास करून विनाकारण आरोप लावल्याबद्दल आपली दिलगिरी व्यक्त केली व म्हणाला—"या गोष्टीची अफवा राज्यभर पसरलीच आहे. अमिलसारखा योद्धा राजकन्येला वर मिळाल्याबद्दल आमच्या राजघराण्याचा मान वाढेलच. म्हणून त्याच्याशीं तिचा विवाह करण्याचा माझा विचार आहे." सर्वांनीं अमिलचा जयजयकार केला.

अमिसनें अमिलला निरोप पाठवून राजधानी बाहेरच त्याला भेटून सर्व हकीकत सांगितली. मित्राच्या शौर्यामुळें व औदार्यामुळें अमिल त्या कठीण प्रसंगांतून वांचला व स्वप्नांत देखील जी इच्छा पुरी होण्याची अशा नव्हती ती पुरी झाली.

अमिल व राजकन्या दोघांचा लग्न समारंभ थाटामाटानें पार पडला. अमिलनें, हा योग जुळून येण्यास त्याच्या मित्रानें जें साहाय्य केलें त्याचें वर्णन करून राजकन्येशीं त्याची ओळख करून दिली. तेव्हां ती मिळाली हा



[illegible] कधीं संधी देईल का?"

पुढें कांहीं दिवसांनीं दोघां मित्रांनीं राजाच्या पदरची नोकरी सोडून दिली व जी थोडी मिळकत त्यांना मिळाली होती तींत समाधान मानून आपल्या गांवीं येऊन राहूं लागले.

अमिल व राजकुमारीला दोन मुलें झालीं. त्यांचा संसार सर्व प्रकारें सुखानें चालू होता.

परंतु अमिसच्या भाग्यानें पाठ फिरविली. त्याला कुष्टरोग झाला. त्यामुळें त्याची बायको त्याला एकटा सोडून निघून गेली. त्या रोगाला औषधच नव्हतें. तो दूर एका खोपट्यांत रहात असे. नोकरचाकर देखील त्याच्याजवळ येत नसत व त्याचें काम करण्यांत टाळाटाळ करीत. त्याला दोन वेळचें खायला देखील नीट मिळतनासें झालें.

शेवटीं वैतागून त्यानें एकदां आपल्या बायकोकडे निरोप पाठविला—"असा माझा जीव घेण्यापेक्षां मला विष देऊन टाक, म्हणजे मला मुक्ती मिळेल व तुला पण मुक्ती मिळेल."

अमिसचे नोकर स्वामी भक्त होते. पण मालकिणीच्या भीतीनें ते थोडें थोडें दुर्लक्ष



करीत. एकदां त्यानें आपल्या दोघां नोकरांना बोलावून सांगितलें, बाबांनो! तुमच्या मालकिणीला माझी पर्वा नाहीं. तो देव वर आहे तोंपर्यंत मला स्वतःच्या जिवाची काळजी करण्याचें कारण नाहीं. उचला माझी खाट आणि मला नेऊन ठेवा कोठें तरी! देव तारी त्याला कोण मारी?

नोकर आपल्या मालकाची खाट उचलून घेऊन निघाले. अमिस भीक मागत अमिलच्या घरीं आला. आपल्या स्नेह्याला त्या स्थितींत पाहून अमिलला त्याची दया आली. त्यानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं












व प्रेमानें आपल्या मित्राला भेटला. तो त्याला घरांत बोलावून घेऊन गेला. त्यानें स्वतःचा पलंग त्याला झोंपायला दिला व रात्रंदिवस त्याची सेवाशुश्रूषा करूं लागला.

एके दिवशीं रात्रीं झोंपेंत अमिसला एक दृष्टांत झाला. देवीनें स्वप्नांत येऊन त्याला विचारलें—"रोगमुक्त होण्याची तुझ्या मनांत इच्छा आहे का?"

"होय! पण कसें?" अमिसनें विचारलें.

"तूं आपल्या मित्राच्या मुलांच्या रक्तानें स्नान केलेंस तर तुझा हा रोग बरा होईल." देवी म्हणाली.

"तसें असेल तर नको! मला त्याची गरज नाहीं मी हें घृणित काम करणार नाहीं." अमिस स्वप्नांतच जोरानें ओरडला.

परंतु अमिलला त्याचें तें बडबडणें ऐकूं आलें. त्यानें विचारलें—"कोणतें घृणित काम तें? तूं कोणाशीं बोलत होतास अमिस?"

"कांहीं नाहीं रे! तें एक स्वप्न होतें!" अमिस म्हणाला.

"अरे होय! पण कळूं तर देशील तें काय स्वप्न होतें तें!" अमिलनें आग्रह केला.

अगदीं नाइलाजानें अमिसनें जें स्वप्न पाहिलें होतें खरेंखरें सांगून टाकलें व म्हणाला—"हें सर्व स्वप्न आहे. त्यांत कांहीं अर्थ आहे का?"

अमिलनें मित्राला मनांतला हेतू कळूं दिला नाहीं. अमिसला झोंप लागली पण अमिलचा डोळा लागला नाहीं. रात्रभर तो विचार करीत अंथरुणावर पडून राहिला. नंतर तो त्याची बायको व मुलें जेथें झोंपलीं होतीं तेथें गेला व बायकोला जागें करून म्हणाला—"अमिसची तब्येत आज जरा जास्त बिघडली आहे. तूं चर्चमध्यें जाऊन त्याच्या वतीनें व माझ्या वतीनें प्रार्थना करून ये."

ती निघून गेल्यावर अमिलनें आपली तलवार घेऊन आपल्या दोघां मुलांचा वध करून त्यांचें रक्त घेऊन आला व तें त्यानें आपल्या मित्राच्या अंगाला चोपडलें. अमिस झोंपलेलाच होता. त्याची झोंप मोडली तेव्हां कुष्ठरोग बरा झालेला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. देवीनें सांगितलेली गोष्ट त्याला आठवली व मित्रानें आपल्या मुलांचा वध करून आपल्याला वांचविलें ह्याचा विचार करून तो घाबरून उभा राहाला. म्हणाला—"हें तूं काय केलेंस मित्रा? त्याचा विचार करूनच माझ्या अंगावर कांटा उभा राहतो."





पण अमिल शांतपणें म्हणाला—" मित्रा! देवाच्या कृपेनें तूं बरा झालास. चल आपण चर्चमध्यें जाऊन देवाचे आभार मानूं." त्यानें अमिसला अंगांत घालण्यासाठीं स्वतःचा एक उत्तम पोशाख काढून दिला. दोघे चर्चमध्यें जायला निघाले.

दोघे चर्चमध्यें पोंचले तेव्हां अमिलची बायको प्रार्थना करून परत येत होती. ती थोडा वेळ थांबली. दोघे मित्र प्रार्थना करून आल्यावर ती त्यांच्याबरोबर घरीं निघाली. घरीं पोंचल्यावर तिनें अमिसचा आजार कसा काय बरा झाला म्हणून विचारलें.

अमिल म्हणाला—" ही सर्व देवाची कृपा आहे!" पण अमिसला राहवलें नाहीं. त्याला रडूं कोसळलें व त्यानें त्याच्या मित्रानें केवढा त्याग केला, हें अडखळत सांगून टाकलें. तेव्हां ती म्हणाली—" मग मला कां नाहीं सांगितलें ? मला उपकाराची फेड करण्यास संधी मिळाली नाहीं!"

तिच्या तोंडून हें वाक्य निघालें खरें, पण मातृस्नेहानें उचल घेतली व ती आपला हुंदका आवरूं शकली नाहीं. आपल्या पतीकडे नजर उचलून तिनें एकदां देखील पाहिलें नाहीं, व तिचीं मुलें ज्या खोलींत झोंपलीं होतीं त्या खोलीकडे ती धांवली. तें भयंकर दृश्य पाहण्यापूर्वीच आपण घेरी येऊन पडणार असें तिला वाटत होतें. परंतु त्या मनःस्थितींत ती आपल्या खोलीकडे जात असतां खोलींतून हंसत बागडत येणाऱ्या मुलांना पाहून तिला आश्चर्याचा धक्का बसला. तिनें गुडघे टेंकून देवाला नमस्कार केला.

मुलांच्या गळ्यावर एका लाल रेघेशिवाय तिला दुसरें कांहीं दिसलें नाहीं.



# शाहणी गृहिणी

[स्वामी रामतीर्थ कथा]

याज्ञवल्क्य ऋषींना दोन बायका होत्या. एकीचें नांव कात्यायिनी व दूसरीचें नांव मैत्रेयी. त्यांना गृहस्थाश्रमी अलोट संपत्ती मिळाली व त्याचा उपभोग करून त्यांनीं शेवटीं वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करण्याचें ठरविलें. त्यांनीं आपल्या सर्व संपत्तीचे दोन वांटे केले व आपल्या दोघां पत्नींना एकेक घ्यायला सांगितलें.

मैत्रेयी शाहणी होती. तिनें विचार केला, सर्व संपत्तीचा व सुखोपभोगाचा त्याग करून पती वनांत जात आहेत. तेथें जास्त आनंद मिळत असेल म्हणूनच त्यांनीं सर्वसंग परित्याग करण्याचें ठरविलें असेल. नाहींतर कोणी स्वतः होऊन कष्टाचें जिणें पसंत करील का ?

असा विचार करून ती पतीला म्हणाली—" आपल्याला जो ज्ञानलाभ झाला आहे त्यांतला एक वांटा मला द्यावा. मला हें धन नको."

कात्यायिनीला सर्व संपत्ती मिळाली. पण ज्ञानधनाचा वांटा मैत्रेयीलाच मिळाला.





# घरांतलें भूत

एका गांवीं पांडू कासार रहात असे. गांवाच्या टोंकाला एक झोंपडी बांधून तींत तो रहात असे. त्याला दोन मुलें होतीं. थोडीशी शेतीची जमीन, झोंपडें व बांगड्या या शिवाय त्यांच्याकडे एक गाय व चार कोंबड्या पण होत्या.

पांडू रोज पहाटे उठून धार काढी व शेणगोठा करून गाईला गवत घाली. नंतर न्याहारी करून चार भाकऱ्या दुपारच्या जेवणासाठीं बांधून घेई व बांगड्या घेऊन फेरीला जाई. संध्याकाळ पावेतों जवळपासच्या खेड्या-पाड्यांत हिंडून तिन्हीसांजा घरीं परत येई.

एके दिवशीं तो वडाच्या पाराजवळ पोंचला तेव्हां ऐन दुपारची वेळ झाली होती. जवळ विहीर होती. त्यानें बांगड्यांचें गाठोडें जमिनीवर ठेवलें व तांब्याभर पाणी आणून खायला बसला. खाणेंपिणें झाल्यावर अर्धी भाकरी उरली होती ती तेथेंच कावळे कुत्रीं खातील असा विचार करून तेथेंच टाकून निघून गेला.

पांडू इकडून गेला व तिकडून वडाच्या झाडावरून एक ब्रह्मराक्षसीण खालीं उतरून आली. इतके दिवस ती दुसऱ्या एका झाडावर रहात असे. तें झाड पडून गेल्यावर ती या झाडावर त्याच दिवशीं येऊन राहूं लागली होती. कित्येक दिवसाची भुकेली होती. ती अर्धी भाकरी देखील तिला मोठी वाटली व जिभल्या चाटत ती धांवत आली व एक मिनिटांत ती भाकरी खाऊन टाकली.

त्यापूर्वी तिनें रक्तमांस सोडून बाकी कांहीं खालें नव्हतें. पण भाकरी खाल्ल्या नंतर माणसांचे खाद्यपदार्थ स्वादिष्ट असतात हें तिला कळलें. माणसाचे खाद्यपदार्थ खायला मिळावं म्हणून तिनें मनुष्यरूप घ्यायचें ठरविलें आणि एका सुंदर तरुणीचें रूप घेऊन झाडाखालीं रडत पांडू कासाराची वाट पहात बसून राहली.

पांडू नित्याप्रमाणें विहिरीवर संध्याकाळच्या सुमारास पाणी प्यायला थांबला. तेव्हां त्याला एका स्त्रीच्या रडण्याचा आवाज ऐकूं आला. त्यानें खांद्यावरचें बांगड्यांचें गाठोडें जमिनीवर ठेवलें व वळून पाहिलें तर झाडाखालीं बसलेली एक स्त्री दिसली. त्यानें जवळ जाऊन विचारलें—"बाई! कोण तुम्ही? येथें एकट्या रडत कां बसलां आहां?"

"मी फार दुरून आलें आहें. ते मला एकटीला सोडून कोठेंतरी रागानें निघून गेले आहेत. मी त्यांना हुडकत येथवर आलें. चार दिवसांची उपाशी आहें." ब्रह्मराक्षसीण म्हणाली.

"तर मग आमच्या घरीं चला! आमचें घर दूर नाहीं, जवळ आहे. आम्ही जी मीठ भाकर खाऊं तुम्हाला वाढूं. घरांत माझ्या बायकोला थोडा हातभार लावा म्हणजे झालें. तुमच्या पतीचा शोध लागल्यावर जा!" पांडू कासार म्हणाला.



ब्रह्मराक्षसिणीला तरी तेंच हवें होतें. "माझ्या हातून जें काम होईल तें मी करीन. पण जें काम होणार नाहीं तें काम करायला कोणी सांगितलें तर मात्र मी ताबडतोब निघून जाईन, हें मी बजावून सांगतें. मागाहून कोणी नांवें ठेवलेलें मला नाहीं पसंत." ब्रह्मराक्षसीण आपला फणकारा दाखवीत म्हणाली. पांडू कासाराला तिचें तें बोलणें आवडलें नाहीं. पण गांजलेली स्त्री आहे. तिला आश्रय दिला तर तिच्या स्वभावांत फरक पडेल असा विचार करून तो तिला बरोबर घेऊन घरीं गेला. कासारणीनें पतीच्या

तोंडून त्या स्त्रीविषयीं सर्व माहिती कळल्यावर तिला आंत बोलावून घेतलें व तिला तिचें नांव विचारलें.

उत्तर देतांना थोडा वेळ ती घोटाळली. पण नंतर ती म्हणाली—"मला सर्व प्रेता म्हणतात."

प्रेता पांडू कासाराच्या घरीं राहूं लागली व त्याच्या बायकोला घरच्या कामाला मदत करूं लागली. ती सकाळीं उठून सडासारवण करी व पांडू कासार दूध काढून गेल्यावर शेणगोठा करी. ती गाईला चरायला सुद्धां घेऊन जाऊं लागली. प्रेता आल्यामुळें पांडूच्या बायकोला घरकाम हलकें वाटूं लागलें. घरांतली सर्व लहानथोर माणसें तिच्याशीं आपुलकीनें वागत.

हिंवाळ्याचे दिवस आले. रात्री मोठ्या व दिवस लहान होऊं लागले. त्यांत संक्रांतीचा सण जवळ आला. पांडूचा धंदा जोरांत चालू होता. त्याला घरीं परत यायला रात्र होऊं लागली. एके दिवशीं त्याला घरीं यायला फार उशीर झाला. त्यानें दरवाज्यावर थाप दिली. पण कोणी दरवाजा उघडला नाहीं. तेव्हां त्यानें कडी खडखडावून बायकोला हाक मारली. त्याची बायको पांघरूण घेऊन खाटेवर झोपली होती. कासारणीनें तिला जागें करून म्हटलें—"ते आले आहेत वाटतें. प्रेता, जरा पुढें होऊन दार उघड बरें!"

प्रेतानें गुणगुणत पडल्या पडल्याच हात लांब करून कडी काढली. कासारणीनें पाहिलें व तिला धडकीच बसली. पण ती प्रेताशीं कांहीं बोलली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिनें रात्री घडलेली गोष्ट सांगून प्रेताला ताबडतोब घराबाहेर काढण्यास पतीला सांगितलें. म्हणाली—"हिचें नांवच प्रेता!"

पांडूला देखील आश्चर्य वाटलें. कारण तो रात्रीं घरांत आला तेव्हां प्रेता झोंपलेली होती. इतक्या लवकर ती कडी काढून चटईवर जाऊन कशी पोंचली व कशी झोंपी गेली, याचें त्याला आश्चर्य वाटत होतें. तेवढ्या अवधींत चटईपर्यंत जाऊन झोंपणें शक्यच नव्हतें.

पण तिला घराबाहेर काढायचें कसें. प्रेतानें सांगितल्याप्रमाणें तिच्याकडून न होणारें काम तिला सांगितलें तर ती घराबाहेर निघून जाईल असा विचार करून पांडू म्हणाला—"हें पहा, प्रेता, आपल्या घराच्या चारही बाजूला इतकी जमीन आहे.





माझ्या मतें आपण येथें झाडें लावूं या. पण प्रथम चारही बाजूला भिंत बांधली पाहिजे.

हें काम माझ्यानें होणार नाहीं असें प्रेता म्हणाली नाहीं. तिनें भिंतीच्या पायासाठीं स्वत: चर खणून तयार केला व कोठून तरी विटा आणून भिंत उभी केली. नंतर मोठमोठीं झाडें उपटून घेऊन आली व तीं देखील लावलीं.

तिचें हें दिव्य पाहून ती सामान्य स्त्री नव्हे हें पांडू कासारालाच काय सर्व गांवकऱ्यांना वाटूं लागलें. आतां घरांतल्या या भुतीणीला घराबाहेर कसें काढायचें हा एक प्रश्न पडला. तसा प्रेताचा कोणाला त्रास वगैरे नव्हता. परंतु भुतिणीला घरांत ठेवणें धोक्याचें आहे, यांत शंका नव्हती. गांवकऱ्यांनीं येऊन पांडू कासाराला धमक्या दिल्या—"तूं या भुतिणीला घराबाहेर काढतोस कीं नाहीं ? नाहींतर आम्ही घराला आग लावून तुला व तिला बाहेर काढूं." कांहीं लोक घरांत शिरून हळूच प्रेताला पाहून निघून जात.

एकदां पांडू कासार आपल्या बायको व मुलाबरोबर बाहेर अंगणांत बसला असतां एक उंदीर घरांतून बाहेर धांवत आला. त्याचा पाठलाग करीत मांटी आली. पण उंदीर भिंतीच्या पायाजवळच्या एका भोकांत शिरला. पांडूचा मुलगा ती गंमत पहात होता. तो ओरडून म्हणाला—"प्रेता ! काढ त्या उंदराला बाहेर !"

"तुला काय वाटलें मला काढतां येणार नाहीं !" असें म्हणत ती उंदरासारखी लहान होऊन त्या बिळांत शिरली.

पांडू कासराला ही संधी छान मिळाली. त्यानें बिळांत माती भरली व बीळ बुजवून टाकलें. त्यानंतर कोणी कधीं प्रेताला पाहिलें नाहीं.






# नवीन नोकरी

महिन्याभराची कमाई ती पावली घेऊन भीमू घरीं निघाला. तो रानांतून जात होता. संध्याकाळची वेळ, काळोख पडूं लागला. तरी तो चालत राहिला. समोरून कांहीं लोक येत असलेले त्याला दिसले. प्रत्येकाच्या हातांत एकेक लहान गांठोडें होतें.

ते जव्हेरी होते व हिऱ्यामाणकांचा व्यापार करीत एका गांवाहून येत होते. रात्रीची वेळ होती. चोर व लुटेरे येऊन लुटून घेऊन जातील म्हणून भीतीमुळें त्यांनीं रानांतच झाडावर मुकाम करण्याचा विचार केला.

त्यांनीं भीमूला हाक मारून विचारलें—"काय रे, कोण तूं ? कोठें चाललास ? रात्रीं रानांतच राहण्याचा विचार आहे का ? चोर येतातना, म्हणून येथेंच झाडावर लपून रात्र काढण्याचा विचार आहे आमचा."

"हो पण कोण तुम्हीं ?" भीमूनें विचारलें.

"आम्ही होय ? जव्हेरी ! आम्ही झाडावर झोंपतों. तूं खालीं बसून पहारा दे. सकाळीं तुला कांहींतरीं बक्षिस देऊन आम्ही पुढें जाऊं." जव्हेरी म्हणाले.

भीमू म्हणाला—"ठीक आहे. चढा झाडावर. मी बसतों खालीं पहारा देत. पाहतों कोण येतो तें."

"जर श्वापदें आलीं तर ?" जव्हेऱ्यांनीं विचारलें.

"ठार करीन मी त्यांना. भिऊं नका. तुम्ही झोंपेंत खालीं पडूं नका, मात्र. संभाळून रहा वर !" भीमूनें पोक्तपणानें सल्ला दिला.

"मुलगा हुशार दिसतो ! शूर साहसी दिसतो !" भीमूची वाखाणणी करीत सर्व झाडावर चढले. त्यांनीं आपापलीं गाठोडीं

भीमूचा पराक्रम ]

[श्री. मा. गो. मोरे

झाडाला बांधली व स्वतःला झाडाच्या फांदीशीं बांधून झोंपी गेले. भीमू देखील खालीं झाडाच्या बुंधाला टेंकून झोंपी गेला.

रात्रीं चोर नेमके त्याच झाडाजवळ येऊन पोंचले. भीमूच्या पायाला अडखळून सगळ्यांत पुढला चोर खालीं आदळला. मागचा चोर म्हणाला—" सावकाश, खालीं पाहून चाल."

चोराचा पाय लागल्यानें भीमूची झोंप मोडली. तो रागानें उठून म्हणाला—" तुम्हांला डोळे उघडून चालायला काय झालें? माणसा-सारखा माणूस मी, मला लाथ मारून चाला-यला लाज कशी नाहीं वाटत तुम्हांला?"

" गप्प बैस! तुझ्याकडे जें कांहीं असेल तें मुकाट्यानें काढ! नाहींतर ही तलवार आरपार जाईल!" एक चोर म्हणाला.

" मला काय? देईन माझ्याजवळ आहे तें, पण तुम्ही कोण हें तर सांगशील कीं नाहीं?" भीमूनें विचारलें.

" चोरां! तुझ्याजवळ जें आहे तें मुका-ट्यानें काढतोस कीं नाहीं?" चोरानें विचारलें.

" म्हणजे तुम्ही चोर आहां तर! ही घ्या पावली. माझ्याजवळ आणखी दुसरें कांहीं नाहीं." असें सांगून त्यानें आपली पावली काढून दिली. ते पुढें निघाले. थोडें अंतर चालून गेल्यावर त्यानें त्यांना हाक मारून बोलाविलें—" ही पावली मला एका वाण्यानें दिली होती. ती खोटी निघाली तर मागाहून मला जबाबदार म्हणूं नका! झाडावर जव्हेरी झोंपले आहेत त्यांना दाखवून ती खरी आहे कीं नाहीं हें आतांच विचारून घ्या."

जव्हेऱ्यांचें नांव ऐकतांच चोर परतले. त्यांनीं आपापल्या तलवारी उपसल्या. झाडा-वरून जव्हेऱ्यांना खालीं उतरवून त्यांना खूप लुटलें व भीमूला म्हणाले—" तूं आमच्या टोळींत सामील झालास तर चोरी कशी करायची हें तुला शिकवून देऊं." तो कबूल झाला.





# अयोध्याकांड

आपल्या वडिलांना त्या करुण स्थितींत पाहून श्री रामचंद्राचें मन फार दुःखी झालें. त्यांनीं कैकेयी मातेस विचारलें—" माते! माझ्या हातून कांहीं चूक झाली का? बाबा फार काळजींत दिसतात. काय कारण असेल कांहीं समजत नाहीं. मी यापूर्वी त्यांना इतके दुःखी झालेले कधीं पाहिलें नाहीं."

कैकेयीनें निःसंकोचपणें सर्व सांगून टाकलें. म्हणाली—" कांहीं नाहीं रे बाळ! तुझ्यावर का तुझ्या वडिलांचा राग असणार? तुझ्यावर त्यांचें जें प्रेम आहे त्यामुळेंच ते इतके दुःखी झाले आहेत. त्यांच्या मनांत तुला सांगावेंसें वाटत आहे. पण तुझ्या प्रेमामुळें त्यांच्या तोंडांतून ते शब्द उमटत नाहींत. त्यांनीं एकदां मला एक वर दिला होता. वचन पालन करणें हा क्षात्रधर्म आहे. वडिलांनीं दिलेलें वचन पुरें करणें व करविणें मुलाचा म्हणजे तुझा धर्म आहे. ते स्वतःच्या तोंडानें सांगणार नाहींत. म्हणून मलाच सांगावें लागणार आहे."

" राज्याभिषेकाची ही सर्व तयारी व्यर्थ जाणार नाहीं. भरताचा राज्याभिषेक होईल, आणि तूं वल्कल वस्त्रें धारण करून वनांत गेलास तर तुझ्या वडिलांवर हा आरोप कोणी लावणार नाहीं कीं त्यांनीं वचन देऊन तें मोडलें."

अगदीं कठोरपणानें कैकेयीनें हें सांगून टाकलें. सामान्य माणसानें तें ऐकलें असतें



तर त्याला कैकेयीचा रागच आला असता व तो तिला उलट उत्तर देऊन व तोंडावरच तिची निंदा करून तेथून निघून गेला असता. पण रामाला यत्किंचित देखील राग आला नाहीं. तो म्हणाला—"माते ! मी तयार आहें. वडिलांची आज्ञा व माते तुझीपण आज्ञा पालन करण्याचें भाग्य मला लाभलें आहे. भरत गादीवर बसला काय किंवा मी बसलों काय एकच. पण मला एकाच गोष्टीचें दु:ख होत आहे. या ल्हानशा गोष्टीसाठीं बाबांना इतकें दु:ख कां वाटावें. भरताला राज्य देण्याचा माझा विचार आहे हें बाबानीं मला सांगायला एवढा संकोच कां करावा?"

कैकेयी म्हणाली—"त्यांची ही इच्छा पुरी करण्यास तूं होकार देशील कीं नाहीं, एवढीच शंका त्यांच्या मनांत होती. मी भरताला बोलावून घेतें. तूं मात्र रानांत जाण्याची तयारी कर. तूं जाईपर्यंत तुझे बाबा स्नानसंध्येला सुद्धां उठतील कीं नाहीं मला शंका वाटते."

कैकेयीनें थंडपणानें तें सर्व सांगितलें. तिच्या प्रत्येक शब्दाबरोबर दशरथाच्या हृदयाला घरें पडत होतीं. तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. रामानें त्याला हात देऊन नीट झोंपविलें व कैकेयीला म्हणाला—"माते ! मी कधीं धनापेक्षा किंवा राज्यापेक्षा ठेवली नाहीं. आणखी कांहीं करावयाचें असल्यास तें देखील नि:संकोचपणें सांगून टाक."

तें ऐकून दशरथ एकदां उठून रामाशीं कांहीं बोलण्याच्या विचारांत होता. पण पुन्हां बेशुद्ध होऊन खालीं पडला. रामानें दोघांना नमस्कार केला व अंत:पुरांतून बाहेर पडला. लक्ष्मणाला तें सर्व कळलें. त्याला फार वाईट वाटलें व राग पण आला. तरी तो स्वत:ला आवरून रामाच्या मागें चालूं लागला.



राम रथांत बसून गेला नाहीं. छत्र-चामरांचा त्यानें त्याग केला व कौशल्या मातेचा निरोप घेण्यासाठीं निघाला. रामाचें तें विचित्र वागणें पाहून अंत:पुरांतील दास-दासी रडूं लागल्या. सर्वसंगपरित्याग करून वनगमन करणाऱ्या वैराग्यासारखा राम तेथून निघून गेला.

राम कौशल्येच्या महालांत आला तेव्हां कैकेयीच्या महालांत घडलेलें वृत्त तेथें कोणाला कळलें नव्हतें. रामानें प्रवेश केल्याबरोबर दासदासी छत्रचामर घेऊन त्याच्या स्वागता-साठीं धांवल्या. पण रामानें त्यांना थांबायला सांगितलें व सरळ कौशल्या मातेकडे गेला. वृद्ध दासदासींनीं "महाराज रामचंद्र की जय !" चा जयघोष करून कौशल्या मातेला रामलक्ष्मण आल्याची वार्ता दिली.

कौशल्या तेव्हां पूजा करीत होती. रामानें नमस्कार केल्याबरोबर तिनें त्याला आशीर्वाद दिला व राज्याभिषेकाच्या मुहूर्ताला फार वेळ नाहीं, वशिष्ठ मुनि वाट पहात असतील असें सांगितलें.

तें ऐकून या आनंदांत वनगमनाची गोष्ट कशी सांगावयाची हा संकोच रामाला वाटला. पण धीर करून राम म्हणाला—"आई ! बाबांनीं मला वनाचें राज्य दिलें आहे. मी त्याचें रक्षण करण्यासाठीं जात आहें. आतां मी सिंहासनाऐवजीं दर्भासनावर बसणार आहें. बाबांनीं भरताला राज्य द्यायचें ठरविलें आहे व तें मी कबूल केलें आहे."



तें ऐकून कौशल्येला डोक्यावर आकाश कोसळल्यासारखें वाटलें व ती बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली. रामानें तिला सावरून बसविलें. कांहीं वेळानें हुंदका आवरून ती म्हणाली—"बाळा ! मला आयुष्यभर असेंच रडत रहावें लागणार आहे. तुला आपल्या पोटीं जन्म देऊन आज वनांत जाण्यासाठीं



निरोप देण्याचा प्रसंग माझ्यावर यावा त्यापेक्षां मी वंध्याच राहाले असतें तर बरें झालें असतें. मूल नाहीं एवढेंच काय तें दुःख राहिलें असतें. हृदयाचें रक्त आटवून तुला लहानाचा मोठा केला आणि आतां ही माय-लेकरांची ताटातूट कशी सहन होणार ? मी राजमहीषी आहें पण राजमाता होण्याचें भाग्य मला मिळालें नाहीं. आजपर्यंत सवती-मत्सर आपल्या घरांत नव्हता आणि आज एकाएकीं हें उग्ररूप धारण करून तो उभा राहिला आहे. मला दासदासींपेक्षां जास्त हाल सहन करावे लागणार. मरण तरी मागून येतें कां ? बाळ, मी देखील येतें तुझ्या-बरोबर, करूं दे तिला आणि तिच्या लेकाला राज्य !"

लक्ष्मण तें सर्व ऐकत होता. त्याच्या अंगाचा संताप वाढत चालला होता. तो म्हणाला—" माते ! त्या कैकेयीच्या हट्टानें दादाला आज वनवास भोगावा लागत आहे त्यांत नवीन असें कांहींच दिसत नाहीं. म्हातारपणामुळें मन दुबळें होतेंच. बाबांनी स्त्रीच्या मोहाला बळी पडून हा कठोर वनवास दादाला दिला आहे. पण आपण हा अन्याय डोळ्यादेखत होऊं देणें शोभत नाहीं." नंतर तो रामाकडे वळून म्हणाला—" दादा ! जगाला हें कळण्यापूर्वी कीं, राजानें भरताला राज्य व तुला वनवास दिला आहे, चल आपण आपल्या पराक्रमानें तुझा हक्क मिळ-विण्याचा प्रयत्न करूं. मी आपल्या सर्व शत्रूंचा नायनाट केल्याशिवाय शस्त्र खालीं ठेवणार नाहीं. अन्यायाचा प्रतिकार करणें हा क्षत्रि-यांचा धर्म आहे. अन्याय करणारा कोणी परका असो किंवा स्वतःचा बाप असो त्याचा प्रतिकार केला हा पाहिजेच. तूं आम्हां सर्व भावंडांत मोठा आहेस. कुळरीतीप्रमाणें गादी तुलाच मिळाली पाहिजे. तुला रानांत पाठवायला तूं काय चूक केलीस, मला सांग ! हें माझें धनुष्य आणि हा बाण माझ्या हातांत व तूं पाठीराखा असल्यावर मला कोणाचीहि भीती नाहीं."

कौशल्या म्हणाली—" बाळा रामा ! लक्ष्मण म्हणतो तें कांहीं गैर नाहीं. वडिलांची आज्ञा शिरोधार्य असावी. परंतु कोणत्या परिस्थितींत त्यांनीं आज्ञा दिली आहे हें पाहलेंच पाहिजे. तूं रानांत जाणें मला बिलकुल पसंत नाहीं. तूं गेलास तर मी उपाशी राहून प्राण सोडीन. त्याचें पाप तुला !"



रामानें जवळ येऊन मातेला समजाव-ण्याचा यत्न करीत म्हटलें—" आई, वडिलांची आज्ञा मोडणें बरोबर होणार नाहीं. वडि-लांच्या आज्ञेनें पूर्वी याहून मोठमोठीं व घोर पापें मुलांनीं केली आहेत. याचीं उदाहरणें काय कमी आहेत ? कंड नामक मुनीनें गोवध केला. परशुरामानें मातृहत्त्या केली. सगरपुत्र भस्म झाले. आणि मी तुझ्या आज्ञेबाहेर का आहें ? तुझ्या बोलण्याकडे मी दुर्लक्ष करीत नाहीं. पण तूंच सारासार विचार करून मला रानांत जायची परवानगी दे. मी मोठा आहें. मी जो कित्ता घालून देईन तोच माझे धाकटे भाऊ गिरवणार." नंतर लक्ष्मणाकडे वळून राम म्हणाला—" लक्ष्मणा ! तुझें प्रेम व पराक्रम मी ओळखतों. पण बाबा, जेथें धर्म तेथेंच जय असतो. आपण स्वतःच्या धर्माचें पालन केलेंच पाहिजे. रागाच्या भरांत स्वार्थवश कांहीं करून नंतर पश्चात्ताप करणें हें शहाणपणाचें काम नव्हें."

राम पुन्हां आईला म्हणाला—" मी वनांत जात आहे याचा बाबांना आनंद होत आहे असें का तुला वाटतें. वचनांत बद्ध झाल्या-मुळें त्यांना अकर्तव्य तें करावें लागलें. त्यांचें मन अत्यंत दुःखी आहे. हा दैव-दुर्विलास समजून मनाचें समाधान करून



घेण्यापलीकडे कांहींच करतां येत नाहीं. नाहींतर कैकेयी मातेला असा वर मागण्याची बुद्धि झाली असती का! तिचें माझ्यावर भरतापेक्षां जास्त प्रेम होतें, हें तुला माहीत आहे आणि ती देखील एक माताच आहे. माझ्या राज्याभिषेकांत विघ्न आल्याचें तुला इतकें दुःख झालें हें जितकें स्वाभाविक आहे, तितकेंच किंबहुना जास्त दुःख माझ्या राज्याभिषेकानें तिला होणें नैसर्गिक नाहीं का?"

राम वडिलांची आज्ञा मोडून घरीं राहणें अशक्य आहे हें पाहून कौशल्या मातेनें मन कठोर करून त्याला आशीर्वाद दिला.

नंतर राम सीतेच्या महालांत गेला. सीतेला पाहतांवर रामाचा धीर सुटला. त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुप्रवाह सुरू झाला. सीता आनंदानें रामाच्या स्वागतासाठीं जवळ आली. पण रामाच्या डोळ्यांत टिपें पाहून ती घाबरून गेली.

रामानें थोडक्यांत सर्व सांगून टाकलें आणि म्हणाला—"मला आतां रानांत जाणें भाग आहे. तोंपर्यंत तूं घरीं राहून वृद्ध सासूसासऱ्यांची सेवा कर. भरत सांगेल तसें वाग. त्याच्यासमोर कधीं माझी प्रशंसा करूं नकोस. तो स्वभावानें गोड आहे. माझा धाकटा भाऊ आहे, म्हणून तुझा भार त्याला वाटणार नाहीं."

तें ऐकून सीता किंचित प्रेमाकुल व क्रोधपूर्ण आवाजांत म्हणाली—"हें सर्व काय बोलतां आहां! असा माझा अपमान कां करतां! स्त्रीचा धर्म पति आहे. तुम्हांला वनवास दिला तर तो मला नाहीं का दिला! मी तुमच्या पावलावर पाऊल ठेवून अग्नीसमोर प्रतिज्ञा नाहीं का केली! तुमचें सुख तें माझें सुख, तुमचें दुःख तें माझें दुःख, आणि रानांतील श्वापदांचें भय म्हणाल तर तुमच्यासारखे पराक्रमी पती जवळ असल्यावर




मला कशाचें भय? जो रानांत राहणाऱ्या ऋषी व मुनींचें रक्षण करील तो माझें रक्षण करणार नाहीं का? मी सुद्धां बरोबर येणार. माझा हा निश्चय अढळ आहे.

रामानें अनेक प्रकारें सीतेची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण सीतेनें त्याचें एक ऐकलें नाहीं. म्हणाली—"ज्योतिष्यांनीं आपलें भविष्य वर्तवलें तेव्हां वनाचा योग आहे असें सांगितलें होतें, तसेंच माझें भविष्य सांगताना देखील त्यांनीं वनाचा योग सांगितला होता. तेव्हां तो टळणें शक्य नाहीं. म्हणून मी देखील बरोबर येणार."

तरी रामानें बरोबर घेऊन जाण्यास नकार दिला. सीतेला अपार दुःख वाटलें व राग पण आला. तिनें रागाच्या भरांत म्हटलें—"माझ्या वडिलांनीं माझा हात तुमच्या हातांत दिला तो तुम्ही मला असें सोडून जाल म्हणूनच का दिला. त्यांचा जावई पराक्रमी असावा म्हणून तर त्यांनीं धनुष्ययज्ञ करविला होता. त्यांना ही गोष्ट कळली तर त्यांना काय वाटेल? त्यांना तुमच्या शौर्याबद्दल संशय आला तर माझी मान खालीं होईल, याचा कांहीं विचार! मी तरी अशी काय चूक केली कीं मला येथें सोडून वनांत जायचा विचार केलात? तुमच्याशिवाय जगांत माझें कोणी नाहीं. जेथें तुम्ही तेथें मी." असें सांगून सीता रडूं लागली.

रामानें जास्त आग्रह केला नाहीं. त्यानें तिला बरोबर जाण्याची तयारी करावयास सांगितलें.

राम निघून गेल्यावर सीतेनें अंगावरचे सर्व दागिने काढून दासदासींना वांटून टाकले. उरलेलें समान ब्राह्मणांना दान करून टाकलें.



# अग्निद्वीप

[ १८ ]

[ अग्निद्वीपांतून उग्रदत्तानें आपला पोषक पिता उग्राक्ष याच्याकडे मदतीसाठीं बहिऱ्या हातीं निरोप पाठविला. उग्राक्ष आपलें राक्षस सैन्य घेऊन समुद्र मार्गें अग्निद्वीपाकडे निघाला. समुद्रांत एक दिवस व रात्र प्रवास केल्यावर त्यांना आकाशांत दूर कांहींतरी ढगाच्या तुकड्यासारखें दिसलें. पुढें वाचा. ]

तो भयंकर पक्षीच होता. त्याला पाहतांच सर्व राक्षस घाबरून गेले. उग्राक्ष गरजला—"असे भितां काय? तेलांत बुडवून मशाली पेटवा!" राक्षसांनीं मशाली पेटविल्या. मशाली पाहून भयंकर पक्षी पुन्हां आकाशांत वर उडूं लागले व त्याच्यावरच्या स्वारांनीं भाले फेंकायला सुरवात केली. पण हें युद्ध दहापांच मिनिटांहून जास्त चालू राहिलें नाहीं.

एकदां भयंकर पक्ष्यांवरचे स्वार नावांत जणुं कांहीं उतरण्यासाठीं म्हणून झटकन खालीं आले व पुन्हां आकाशांत उडून गेले. त्यांत त्यांचा काय हेतू होता कळला नाहीं. वर जातांना ते हंसले मात्र.

दुसऱ्या दिवशीं किंवा रात्रीं व्याघ्रचर्म-धाऱ्यांनीं पुन्हां हल्ला केला नाहीं. तिसऱ्या दिवशीं सूर्योदयाच्या सुमाराला नावा अग्नि-द्वीपाला जाऊन लागल्या.










"नावा आणखी कांहीं अंतर पश्चिमेकडे घेऊन चल. दोन ज्वालामुखी पर्वतांमधून एक दरी आहे. त्या दरीच्या खाडींतून नावा आंत घेतल्या तर आपण अग्निद्वीपाच्या मध्यभागीं पोहचूं." त्या आस्वली सैनिकानें सांगितलें.

तो वाट दाखवायलाच आला होता. म्हणून त्याच्या सांगण्याप्रमाणें उमाक्षानें पश्चिमेकडे नावा घेऊन चलायला आज्ञा केली. नावा किनाऱ्याच्या बाजूबाजूनेंच चालत होत्या. कांहीं वेळानें एक खाडी दोन पर्वतांच्या मधून जात असलेली दिसली. तीच ती खाडी होती. परंतु आस्वली व उमाक्षाला वाटलें तशी ती खाडी निर्जन नव्हती. खाडीच्या मुखाजवळ एका किनाऱ्यावर आस्वली व व्याघ्रचर्मवाले यांचें युद्ध सुरू होतें. कांहीं भयंकर पक्षी आस्वली लोकांवर खाडीच्या आंतल्या टोंकाजवळ हल्ला करीत होते.

परंतु राक्षसांच्या नावा आलेल्या पाहाल्या-बरोबर व्याघ्रचर्मवाल्यांनीं आस्वली लोकांशीं युद्ध करायचें सोडून पळ काढला. त्या भयंकर पक्ष्यावरून जे स्वार परतले होते. त्यांनीं अगाऊ सूचना दिली होती. म्हणून राक्षसांचें सैन्य पोंचण्यापूर्वी जे आस्वली त्यांच्या स्वागतासाठीं आले होते त्यांचा फन्ना उडवून टाकायचा त्यांचा बेत होता.

ते पळूं लागल्यावर आस्वली लोकांनीं त्यांच्यापैकीं कित्येकांना ठार केलें. सर्वांत पुढें येत असलेल्या आस्वलीला पाहून उमाक्ष चकितच झाला. ओरडून त्यानें हाक मारली— "उमदत्त! अरे कायरे तुझा हा वेश!" त्याला तो प्रेमानें भेटला.

एकपादाशीं युद्ध करण्यास राक्षसांचें आलेलें सैन्य पाहून आस्वली लोकांचा उत्साह द्विगुणित वाढला. उमदत्तानें थोडक्यांत आपल्या शत्रूच्या शक्तीचें वर्णन करून आस्वली सरदार कंध याचा परिचय करून दिला—"हाच यांचा सरदार आहे. यानें व याच्या अनुयायानींच आमचें व्याघ्रचर्म-वाल्यांच्या हातून रक्षण केलें."

कंधानें उमाक्षाला नमस्कार केला व म्हणाला—"उमाक्ष! तुझा मुलगा शूर व कर्तबगार दिसतो. तूं आपल्या सैन्याबरोबर आमच्या मदतीला येऊन बिळांत उंदरासारखें जीवित घालविणाऱ्यांना बाहेर उजेडांत यायला मोकळें केलेंस! एकपादासारखा क्रूर आज-पर्यंत झाला नाहीं व पुढें देखील होणार नाहीं. त्याला व त्याचे मित्र नागवर्मा व करवीर यांना आपण वाटेला लावूं शकलो तर या द्वीपांत व तुझ्या राज्यांत राहणारे लोक सुखी होतील."

"मग उशीर कां! चला, त्यांच्या किल्ल्याला वेढा देऊं या!" उमाक्ष म्हणाला.

"पण तें तितकें सोपें नाहीं. थोडा विचार करूनच पाऊल पुढें टाकलें पाहिजे. एकपादाच्या किल्ल्यांत अजून सुदर्शन सरदाराची मुलगी चंद्रसेना आहे. तिच्या केसाला देखील धक्का लागूं नये अशा तऱ्हेनें किल्ला सर करावयाचा आहे. पर्वतेंच नव्हे,



किल्ल्यांत तुमचाच एक मनुष्य आहे. तुझ्या मुलाचा मित्र आरुद्र. तो नेहमीं एकपादाच्या बरोबरच असतो व त्याला तुझ्या राज्यांत काय कोठें आहे हें सांगत असतो. तो फितूर झाला आहे. हें तुला कदाचित माहित नसेल." कंध म्हणाला.

आरुद्र शत्रूला सामील झाल्याचें ऐकून उमाक्षाला राग आला. "कोठें आहे रुद्र!" उमाक्ष गरजला. रुद्र घाबरत पुढें येऊन उभा राहिला.

"काय रे! आरुद्र शत्रूला फितूर झाला आहे का?" उमाक्षानें विचारलें.



"उमदत्त त्याचा सुद्धां मित्र आहे. त्याला कां नाहीं विचारून पहात ! चंद्रसेनेवर त्याची नजर असेल कदाचित. म्हणून तो फितूर होणें शक्य आहे." रुद्र म्हणाला.

"चंद्रसेनेचें लग्न माझ्या मुलाशीं होणार ! वाटेंत जो कोणी उभा राहील त्याला मी उभा चिरून काढीन." उमाक्ष म्हणाला.

"उमाक्ष ! अशी घाई करूं नकोस. अजून तुला मी त्या एकपादाविषयी खरें रहस्य सांगितलेंच नाहीं. त्याला मंत्रबळ प्राप्त आहे. कोणी त्याचें किंवा त्यानें आपल्या शत्रूचें रक्त पाहिलें तर शत्रू गतप्राण होऊन पडतो." कंथ म्हणाला. कंथच्या म्हणण्याचा उमाक्षाला लगेच अर्थ बोध झाला नाहीं. पण तें कळल्यावर मात्र तो चकित होऊन कंथकडे पाहूं लागला. म्हणाला—"मित्रा ! असल्या मंत्रबळाची गोष्ट मी पूर्वीं कधीं ऐकली नाहीं. मग या एकपादाचा समाचार कसा काय घ्यायचा ! हा एक प्रश्नच आहे !"

"आहे एक उपाय ! आपल्यापैकीं कित्येकांना जिवावर उदार होऊन बेत तडीस न्यावा लागेल. डोंगरी किल्ल्यांत शिरकाव सहजीं मिळेल. त्यांच्याकडे भयंकर पक्षी आहेत तसे आमच्याकडे देखील आहेत. म्हणून त्यांच्या बळावर अवलंबून राहून आम्हांला अडवून धरणें त्यांना शक्य नाहीं. तुझा प्रत्येक अनुयायी आंत उतरल्यावर दहा वीस जणांना पुरे आहे. पण धोका काय तो एकपादला पकडण्यांत आहे. तो आपल्या अंगावर लहान जखम करून आमच्या समोर उभा राहिला तर आपल्याला जिवंत परत फिरणें शक्य नाहीं." कंथ म्हणाला.

"त्याच्या अंगांत फार शक्ती आहे तर ?" उमाक्षानें विचारलें. "छे: ! बटुकडा व लंगडा आहे तो. अंगांत बळ मुळींच नाहीं. पण मंत्रबळ आहे ना !" कंथ म्हणाला.

"ठीक आहे, सांग काय उपाय तो ! माझे अनुयायी मरायला भिणार नाहींत. किल्ल्यांत दाखल झाल्यावर तो कोठें आहे हें शोधून काढण्यासाठीं एक जण पुढें पुढें जाईल. आम्ही त्याच्या पाठीमागून जमिनी-कडे पहात वांकून चालूं. त्याला पाहल्यावरोबर पुढला आम्हांला सावध करील. तो स्वतः नंतर मेला तरी भिण्याचें कारण नाहीं. आम्ही डोळे बंद करूनच एकपादाला चारी बाजूंनीं घेरून त्याचा गळा दाबून त्याला ठार करूं." उमाक्ष म्हणाला.

"पण नंतर डोळे उघडल्यावर त्याचें रक्त दिसेलच कीं ! तो मेला तरी त्याचें रक्त पाहाल्यावर आपण मरूं." कंथ म्हणाला.

"हें सर्व विचार करायला माझें डोकें चालत नाहीं. त्याला ठार केल्यावर काय करायचें तें पाहूं." तूं किल्ल्याची वाट दाखव !" म्हणत उमाक्ष पुढें निघाला.

एक आस्वली पुढें वाट दाखवायला चालूं लागला. सर्व त्या दरींतून थोडें अंतर चालत गेल्यावर खडकाळ व चिंचोळी वाट लागली. म्हणून एकेक करून ओळीनें चालत ते डोंगराच्या शिखराजवळ पोंचले. शिखरावरच किल्ला होता. आकाशांत भयंकर पक्षी नव्हते



कीं व्याघ्रचर्मवाले पण नव्हते. स्मशानवत् घोर शांती सर्वत्र होती.

"एकपादानें सर्वांना एकदम ठार करण्या-साठीं खास कांहींतरी उपाय केलेला दिसतो आहे. अंगाला स्वतःचेंच रक्त फासून तो एकदम किल्ल्याच्या भिंतीवर येऊन उभा राहील व आपण त्याला पाहल्यावरोबर जागच्या जागीं थंडगार होऊं." कंथ म्हणाला.

"कोणी किल्ल्याच्या भिंतीकडे पाहूं नका ! फक्त पुढें जाणारानेंच पहावें." उमाक्षानें सर्वांस सावध केलें.



आतां ते किल्ल्याजवळ पोंचले होते. वरून त्यांना कुजबुज ऐकूं आली. कोणी वर डोकें करून पाहिलें नाहीं. किल्ल्यांतून त्यांना एकपादाचा कर्कश आवाज ऐकूं आला– "सुदर्शनाच्या पोरीला ही पहा फेंकली, खालीं दरींत!"

तें ऐकून उग्राक्षासकट सर्व घाबरले. तरी कोणी डोकें वर करून पाहिलें नाहीं. इतक्यांत आणखी एक आवाज ऐकूं आला–"विश्वास घात!" त्याच्या पाठोपाठ आरुद्धचा आवाज ऐकूं आला–"उग्रदत्त! चंद्रसेना खालीं दोरखंड सोडीत आहे. चढून वर या. एकपादाला चामड्याच्या पिशवींत कोंबून पिशवीचें तोंड बंद केलें आहे. भिण्याचें कारण नाहीं. तो पहा नागवर्मा चंद्रसेनेवर तलवार घेऊन धांवला!" तलवारीचा खण-खणाट ऐकूं येऊं लागला.

उग्रदत्त व उग्राक्ष आणि त्यांचे अनुयायी दोरखंड धरून किल्ल्यांत चढून गेले. चंद्रसेना ओरडली–"आरुद्ध करवीरशीं झुंजत आहे!" उग्राक्ष तें दृश्य पाहून चकित झाला. त्याची भावी सून इतकी शूरवीर असेल याची त्याला कल्पना नव्हती. नागवर्मावर रोखून तो आपली गदा फेंकणार, इतक्यांत चंद्रसेनेची तलवार नागवर्माला लागली व तो गच्चीवरून खालच्या फर्शीवर जाऊन आदळला. उग्राक्षानें जाऊन चंद्रसेनेची पाठ थोपटली. म्हणाला– "तुझ्या होणाऱ्या सासूनें पालखींतून उडी मारून असेंच शौर्यानें व्याघ्रचर्मवाल्यांच्या हातून स्वतःचें रक्षण केलें होतेंस. तूं खरोखरच क्षत्रियकन्या आहेस."

राक्षसांना पाहून करवीरनें पाय काढला. पण आरुद्धनें तलवारीची खोंच मारून त्याला जमिनीवर लोळविलें. हें सर्व एका क्षणार्धांत झालें. एकपाद ज्या चामड्याच्या पिशवींत किड्यासारखी वळवळ करीत होता

ती पिशवी उचलून कंथ म्हणाला—"एक-पाद्या! लंगड्या! उकडतें आहे वाटतें थांत! चल तुझी आहुती देऊन त्या ज्वालामुखीची भूक शांत करतों, म्हणजे जगाचें कल्याण होईल." म्हणत तो ज्वालामुखीकडे कंथला उचलून घेऊन धांवला.

सर्व आरुद्रकडे चकित होऊन पहात होते. तो म्हणाला—"उग्राक्ष! मी तुझ्या-विरुद्ध शत्रूला फितूर झाल्याचें सोंग केलें म्हणून त्याचा माझ्यावर विश्वास बसला. चंद्रसेनेला दरींत फेंकण्याची गोष्ट सांगतांना तो असावध आहे हें पाहून मी त्याच्यावर पिशवी टाकली. म्हणून तो ओरडला—"विश्वासघात!" तें ऐकून नागवर्मा चंद्रसेनेवर धांवला व करवीर माझ्यावर! चंद्रसेनेनें प्रसंगावधान राखून दोरखंड सोडलें म्हणून तुम्ही सर्व वेळेवर येऊन पोंचलात." सर्वांनीं आरुद्र व चंद्रसेनेच्या चातुर्याची व शौर्याची प्रशंसा केली.

उग्राक्ष, उग्रदत्त व चंद्रसेना आपल्या सर्व साथी अनुयायांबरोबर स्वदेशीं परत आले. चित्रसेन व सुदर्शन सरदार सर्वांना आनंद झाला. उग्राक्षानें आपल्या महालांत रोशनाई केली. कंथला अग्निद्वीपचें राज्य मिळालें.

सुमुहूर्तावर उग्रदत्त व चंद्रसेना यांचा थाटानें विवाह समारंभ संपला. चंद्रसेनेचे सर्व नातेवाईक उग्रदत्ताचा बाप चित्रसेन व आई सर्व लग्नाला हजर होतीं.

कंथ बहुमूल्य उपहार घेऊन लग्नाला हजर झाला होता.

उग्रदत्ताला चित्रसेनाचें, त्याचा सासरा सुदर्शन यांचें व त्याचा पोषकपिता उग्राक्ष याचें रानांतलें राज्य मिळालें. त्याच्या राज्यांत सुख व शांति नांदूं लागली. (संपूर्ण)



# रूपनाथ

विक्रमार्कनें आपला हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला. झाडावरचें प्रेत काढलें व खांद्यावर घेऊन नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ म्हणाला—"राजा! तूं कोणत्या तरी स्त्रीच्या फंदांत पडून तर हें संकट स्वतःवर ओढवून घेतलें नाहींस? कारण मनुष्य किती हि हुशार व बुद्धिमान असला तरी स्त्रीच्या नादीं लागून त्याला नाना हाल अपेष्टा सहन कराव्या लागतात. तुला कंटाळा येऊं नये म्हणून रूपनाथाची गोष्ट सांगतों. ऐक!" तो गोष्ट सांगूं लागला—

कपिल नांवाच्या देशांत एक राजा राज्य करीत असे. त्याला मल्लिका नांवाची एक अत्यंत रूपवती कन्या होती. तिचें लग्न करून देण्यासाठीं राजानें जवळपासच्या राजेरजवाड्यांकडे दूत पाठवले. कित्येक

राजकुमार स्वतः मागणी घालायला आले. परंतु मल्लिकेला एक देखील पसंत पडला नाहीं. राजा तिच्या इच्छेविरुद्ध तिचें लग्न करून द्यायला तयार नव्हता. शेवटीं राजानें तो नाद सोडून दिला.

त्याच सुमारास पद्मदेशचे महाराज वीरसिंह यांची राणी मरण पावली. राजाचें उतारवय होतें. तरी त्यानें आपल्या मंत्र्यांना बोलावून कोणीतरी योग्य वधू पहावयला सांगितलें. एका मंत्र्यानें पुढें होऊन कपिल देशाची राजकन्या महाराजांना योग्य वधू आहे अशी सूचना केली. राजानें आपला दूत कपिल देशाच्या राजाकडे पाठविला.

वीरसिंहाचा दूत आला तेव्हां राजा दरबारांतच बसला होता. त्यानें दरबार बरखास्त केला आणि एकांतांत वीरसिंह महाराजांचा काय निरोप आहे म्हणून दूताला विचारलें.

निरोप ऐकून राजाला आनंद तर झालाच, त्याबरोबर तो काळजींत पण पडला. कारण वीरसिंह एक अत्याचारी शासक होता. त्याच्याशीं वैर करून शांतपणें राज्य करणें अशक्य आहे याची जाणीव त्याला होती. आजपर्यंत अशा बलाढ्य राजाशीं त्यानें सख्य ठेवलें होतें. इतक्या मोठ्या घरांत आपली मुलगी पडली तर आपल्या राज्यावर वांकडी नजर फिरवण्याची कोणी छाती करणार नाहीं. परंतु जर का मुलीनें नकार दिला तर काय करायचें? म्हणून तो काळजींत पण पडला होता.

राजानें भीत भीत आपल्या मुलीला बोलावलें आणि म्हणाला—"बाळ! किती आनंदाची गोष्ट आहे, पहा! पद्मदेशाच्या वीरसिंह महाराजांनीं तुला मागणी घातली आहे. मग काय म्हणतेस?"





वीरसिंहानें घातलेल्या मागणीला नकार देण्याची छाती वडील करणार नाहींत हें मल्लिकेला माहीत होतें. म्हणून ती म्हणाली—"जो तुमचा जांवई होऊं शकतो तो माझा पति होऊं शकणार नाहीं का?" त्याचा अर्थ राजाला नीट कळला कीं नाहीं कोण जाणें. त्याला वाटलें कीं आपल्या मुलीनें आपला मान राखला. त्यानें वीरसिंह महाराजांच्या दूताला सांगितलें कीं, महाराजांनीं आमच्या मुलीसाठीं मागणी घालावी यांत महाराजांचा थोरपणा दिसून येतो. आमच्या घराण्याचें हें परम भाग्यच आम्ही मानतों. आज पासून बरोबर चवदाव्या दिवशीं चांगला मुहूर्त आहे. करितां महाराजांनीं साखरपुडा करावा.

साखरपुडा करावयास पद्मसिंह महाराजांनीं स्वतः जाण्याची गरज नव्हती. पण आपल्या लहरींत ते स्वतःच आपल्या लव्याजम्यासह आले. त्यांचे अंगरक्षक एकाहून एक पराक्रमी होते. त्यांत रूपनाथ नांवाचा एक तरुण सरदार होता. तो नांवाप्रमाणें खरोखरच मदनाचा पुतळाच होता.

कपिल देशाच्या राजानें वीरसिंह महाराजांच्या सत्कारार्थ एक मोठी मेजवानी दिली. मेजवानीला वीरसिंह महाराजांबरोबर त्यांचे अंगरक्षक हजर होते. अर्थातच ते त्यांच्याच पंगतीला बसले होते.

मल्लिका अंतःपुरांतून वीरसिंह महाराजांना व त्यांच्याबरोबरच्या अंगरक्षकांना पहात होती. तिची दृष्टी बराच वेळ रूपनाथावर खिळून राहिली. तिनें आपल्या एका सखीला विचारलें—"ही कसली मेजवानी आहे ग? हा राजा कोण आणि त्याच्याबरोबर आलेले हे सर्व लोक कोण?"

ती सखी गालांतल्या गालांत हंसत म्हणाली—"वा ग वा! तुलाच माहीत नाहीं

तर मला तरी काय कळणार? तूंच जाऊन त्या वीरसिंह महाराजांना कां नाहीं विचारीत कीं ते कोणाचा साखरपुडा करायला आले आहेत?"

"साखरपुडा! अस्सं! कळलें! पण काय ग, हा थेरडा का माझ्याशीं लग्न करणार? हा तर बाबांच्याहून चार आठ वर्षांनीं मोठाच असेल! ह्यानें मुलाचें किंवा नातवाचें लग्न करायचा विचार केला असता तर शोभलें तरी असतें. पण स्वतःच बोहल्यावर उभा रहायला ह्याला लाज तरी कशी नाहीं वाटत?"

तिनें रात्री वीरसिंह महाराज व त्यांच्या बरोबर आलेल्या सर्व लोकांकडे कांहींतरी मादक पेय पाठविलें. फक्त रूपनाथाकडे पाठविलें नाहीं. तें पिऊन सर्व नशेच्या गुंगींत असतां तिनें आपल्या एका चतुर दासीला रूपनाथ याच्याकडे पाठविलें. ती येऊन रूपनाथाला म्हणाली—"आपल्याला राजकुमारीनें बोलाविलें आहे."

रूपनाथाला आश्चर्यच वाटलें. तो दासीबरोबर राजकुमारीच्या महालांत गेला. "काय आज्ञा आहे, राजकुमारी?" त्यानें विचारलें.

"उद्या परवा माझ्यावर एक मोठं संकट येणार आहे. तुझ्या राजाचें माझ्याशीं लग्न होणार आहे. हें माझ्या इच्छेविरुद्ध होत आहे. या संकटांतून तूंच माझें रक्षण केलें पाहिजेस. तूं माझें रक्षण केलेंस तर मी तुझ्या गळ्यांत स्वच्छेनें माळ घालीन." राजकुमारी म्हणाली.

"मी महाराजांचें मीठ खाल्लें आहे. तुला मदत करणें शक्य नाहीं मला!" रूपनाथ म्हणाला.

"संकटांत सांपडलेल्या स्त्रीचें रक्षण करणें हें प्रत्येक पुरुषाचें कर्तव्य आहे असें नाहीं का तुला वाटत? तूं राजद्रोह कर असें नाहीं मी म्हणत. मला मदत कर एवढेंच मागतें आहे." मल्लिका म्हणाली.

"मग मी काय करूं म्हणतेस?" त्यानें विचारलें.

"आज रात्रीं आपण दोघें पळून जाऊं." ती म्हणाली.

"तसें करणें म्हणजे महाराजांच्या मर्जी-विरुद्ध करणें होईल. पण यांत तुला तरी फायदा काय? वीरसिंह महाराजांना व त्यांच्या बलाढ्य सैन्याला मी ओळखतों. आपण कोठें जरी गेलों तरी ते आपला







पिच्छा पुरवतील व कैदेंत छळ करून ठार करतील. त्यांची राणी कदाचित तूं होणार नाहींस, पण माझी बायको सुद्धां होणें अशक्य आहे." रूपनाथानें स्पष्ट सांगून टाकलें.

"मला मदत करायला तूं तयार नाहींस हें कळलें मला. अंगांत इतकी शक्ति असूनहि तूं कापुरुष आहेस." मल्लिका म्हणाली.

"मी हें सर्व तुला एवढ्यासाठीं सांगितलें कीं तुला तें प्रथमच कळावें. माझी ना नाहीं. तूं तयार असशील तर मी तयार आहें. चला, जिवावर उदार होऊन निघूं या तर!" रूपनाथ म्हणाला. मल्लिकेच्या मनासारखें झालें. ती निघाली.

रूपनाथ म्हणाला होता त्यांत थोडी देखील अतिशयोक्ति नव्हती. दुसऱ्या दिवशीं रूपनाथ व मल्लिका दोघे पळून गेल्याची गोष्ट ऐकून वीरसिंहाला भयंकर राग आला व त्यानें रूपनाथाला जिवंत किंवा मृत धरून हजर करण्यास आपल्या सैन्यास हुकूम सोडला. तो स्वतः देखील त्याच्या शोधार्थ निघाला. रूपनाथ व मल्लिका यांना पूर्वींच त्याची कल्पना होती. म्हणून तीं रात्रीशिवाय कोठेंहि तास दीड तासापेक्षां जास्त राहालीं नाहींत. रात्रींसुद्धां अकल्पित स्थानींच विश्राम करीत. शिकारी पाठीस लागला असतां जशी एकाद्या जनावराची मनः स्थिति होते तशी त्यांची झाली होती. रानोमाळ हिंडत ते एका राक्षसाच्या रानांत येऊन पोंचले. त्या राक्षसाला एक वर होता. त्याच्या स्वतःच्या गदेशिवाय त्याचा वध दुसऱ्या कोणत्याहि शस्त्रानें होणें शक्य नव्हतें. ती गदा ज्याला लागेल तो देखील वांचणें शक्य नव्हतें. म्हणून त्या वनांत कोणी प्रवेश करीत नसे. वीरसिंह देखील त्या बाजूला शिकारीला येत असे, पण त्यानें त्या राक्षसाच्या रानांत कधीं प्रवेश केला नाहीं.





म्हणून रूपनाथानें तें रान सुरक्षित आहे असें समजून त्यांत प्रवेश केला. राक्षसाला माणसाचा वास आला. त्यानें त्यांना हुडकून काढलें. रूपनाथानें आश्रय देण्यास विनंती केली. राक्षसानें तें कबूल केलें. पण एका अटीवर. त्या रानांत एक मंत्रवलेलें जांभळाचें झाड होतें. त्या झाडाला कधीं हात लावतां कामा नये किंवा त्याचीं फळें पण तोडतां कामा नये. त्या झाडाच्या जांभळांत हें विशेष होतें कीं तीं फळें खाणाऱ्याला भूक तहान लागत नसे.

"मला त्या जांभळांची गरजच नाहीं. मी त्या झाडाला शिवणार देखील नाहीं." रूपनाथानें वचन दिलें व राक्षसाच्या परवानगीनें एक पर्णकुटी बांधून तींत दोघे राहूं लागलीं. त्यांच्या सर्व गरजा रानांत भागत असत. लाकूडफाटा, फळें, कंदमुळें व इतर पदार्थ त्यांना मिळत. म्हणून त्यांना आपल्या रानाच्या बाहेर कधीं जावें लागलें नाहीं. राक्षस देखील त्यांच्याकडे कधीं येत जात नसे. जांभळाच्या झाडाजवळच तो आपल्या घरांत रहात असे.

वीरसिंह आपलें सैन्य घेऊन राक्षसाच्या रानापर्यंत येऊन पोंचला. आंत शिरण्याची त्याची हिम्मत होईना. त्यानें तंबू व राहुट्या उभ्या करून तेथेंच तळ दिला. आपल्या अंगरक्षक सैनिकांना बोलावून तो म्हणाला—"कोणीहि या रानांत पाय देखील टाकण्याची गरज नाहीं. परंतु जर कोणी साहस करून रानांत जायला तयार झाला व रूपनाथाचें डोकें किंवा जांभळें घेऊन आला तर मी त्याला एक मोठी जहागीर देईन."

तें ऐकून दोघे सैनिक उभे राहिले. त्यांनी विचार केला, जांभळाच्या झाडाला हात लावला नाहीं तर राक्षसाला राग येणार नाहीं. म्हणून आपण त्या बाजूला फिरकायचें देखील नाहीं.

रूपनाथ आंत गेला आहे यावरून आपल्याला देखील प्रवेश मिळेल. एकदां प्रवेश मिळाला कीं रूपनाथाचा शिरच्छेद करून आणणें तेवढें कठीण नाहीं.

परंतु त्यांना यश आलें नाहीं. रूपनाथानें दोघांचा मल्ल युद्धांत व द्वंद्व युद्धांत पराभव करून त्यांना कैद केलें. त्या दोघांनीं रूपनाथाजवळ क्षमा मागितली व म्हणाले कीं, महाराजांनीं तुझें डोकें किंवा जांभळाचीं फळें या पैकीं एक आणून देणाराला मोठी जहागीर देण्याचें वचन दिलें आहे. त्या लोभानें आम्ही आलों.

मल्लिकेनें तें ऐकलें आणि रूपनाथाला विचारलें—"जांभळांसाठीं जहागीर? म्हणजे त्या जांभळांत कांहीं तरी विशेष असलें पाहिजे!"

रूपनाथानें त्या जांभळाच्या झाडाचा महिमा, त्यानें लोकांकडून जसा ऐकला होता तसा, मल्लिकेला सांगितला.

तो ऐकून मल्लिका म्हणाली—"तर मग मला तीं जांभळें खाऊन पाहिलेंच पाहिजे! आणून दे!"

"अग हो! पण राक्षसाला मी वचन दिलें आहे कीं, मी त्या झाडाला



हात देखील लावणार नाहीं!" रूपनाथ म्हणाला.

"तें कांहीं नाहीं! मला तीं फळें चाखायचीं आहेत." मल्लिकेनें हट्ट धरला.

रूपनाथ अगदीं नाइलाज होऊन राक्षसाकडे गेला.

"काय रे! आतां कशाला आला आहेस?" राक्षसानें विचारलें.

"माझी बायको चार जांभळें तोडून घेऊन या म्हणून हट्ट धरून बसली आहे. पण मी वचन दिल्याप्रमाणें झाडाला हात लावणार नाहीं. तूंच चार जांभळं तोडून दे!" रूपनाथ म्हणाला.

तें ऐकून राक्षसाला राग आला—"दुष्टा! पहिल्यानें टेकायला जागा मागितलीस, आतां तुझी नजर जांभळावर देखील जाऊं लागली वाटतें!" त्यानें रागाच्या भरांत आपली गदा रूपनाथावर फेंकली.

पण रूपनाथानें तो वार चुकवला. गदा जमिनींत जाऊन रुतून बसली. रूपनाथानें जोरानें लाथ मारून ती गदा हलवून बाहेर काढली व राक्षसाला मारली. राक्षस तत्काल जमिनीवर पडून ठार झाला. रूपनाथानें जांभळाचीं फळें तोडून घेतलीं व घरीं परत आला.













मलिकेला फळें पाहून आनंद झाला. म्हणाली—"मला माहीत होतें राक्षस देईल म्हणून!" रूपनाथानें राक्षसाचा वध केल्याची गोष्ट तिला सांगितली नाहीं.

त्या दोघां सैनिकांनीं तें सर्व ऐकलें व म्हणाले—"आम्हांला जांभळें दे! आम्ही निघून जाऊं. आम्हांला तर जहागीर हवी आहे. तुझा वध करून काय मिळणार आहे!"

रूपनाथानें त्यांना थोडीशीं जांभळें दिलीं व सोडून दिलें.

फळें खाऊन वीरसिंहाला आनंद झाला व त्यांचा महिमापण कळला. जांभळें मिळालीं त्यावरून त्यानें अनुमान लावलें कीं, राक्षस मेल्याशिवाय जांभळें मिळणें शक्य नाहीं. म्हणून त्यानें राक्षसाच्या वनांत कूच करण्यासाठीं सैन्याला आज्ञा केली. म्हणाला—"आतां आपल्याला भिण्याचें कारण नाहीं. रूपनाथाला पकडणें अवघड नाहीं. चला!"

रूपनाथाला वीरसिंह येत असल्याचा सुगावा लागतांच तो मलिकेला घेऊन जांभळाच्या झाडावर दाट पानांच्या आड एका जागीं चढून बसला.

राजाच्या सैनिकांनीं सारें रान पालथें घातलें, पण रूपनाथाचा शोध लागला नाहीं. शेवटीं ते त्या जांभळाच्या झाडाजवळ येऊन पोंचले. राजानें तेथेंच पडाव करायचें ठरविलें व तंबू उभे करायला सांगितलें. तो स्वतः जांभळाच्या झाडाखालीं आपल्या एका अंगरक्षकाबरोबर बुद्धिबळें खेळायला बसला.

झाडावर बसून रूपनाथ खेळ पहात होता. त्यानें झाडावरून ऐन रंगांत खेळ आल्यावर एक जांभूळ एका मोहऱ्यावर टाकलें. त्यामुळें राजा हारला.

अशा तऱ्हेनें तीनदां राजा हारला. प्रत्येक वेळीं रूपनाथानेंच जांभूळ टाकलें होतें.



फक्त रूपनाथानेंच राजाला बुद्धिबळांत कित्येक वेळां हारवलें होतें. जांभळें तीनदां पडल्यावर राजाला संशय आला, कदाचित रूपनाथच वर बसून जांभूळ टाकीत असेल. त्यानें एका तरुणाला झाडावर चढून रूपनाथाला खालीं ढकलायला सांगितलें.

तो तरुण झाडावर चढला. रूपनाथानें त्याला वर चढूं दिलें. तो जवळ आल्याबरोबर जोरानें लाथ मारून त्यानें त्याला खालीं पाडलें. परंतु जांभळाच्या झाडाचा महिमा असा होता कीं, खालीं पडलेला मनुष्य रूपनाथासारखा दिसूं लागला. राजानें लगेच त्याला ठार केलें. पण मरून खालीं पडल्यावर राजाला कळलें कीं, तो रूपनाथ नसून रूपनाथाला खालीं पाडायला ज्याला सांगितलें होतें तो सैनिक होता. त्यानें आणखी एका तरुणाला झाडावर चढून जायला सांगितलें. त्याला देखील रूपनाथानें लाथ मारून खालीं पाडलें. तो देखील रूपनाथासारखाच राजाला वाटला. राजानें त्याला देखील ठार केलें. पण तो रूपनाथ नसून आपल्याच पैकीं एक जण आहे हें कळल्यावर कोणीहि झाडावर चढायला तयार होईना. सर्व म्हणाले—"आतां ही मनुष्यांची शिकार बंद करावी. आम्ही







आजपर्यंत तुमच्या लहरीखातर पुष्कळ कष्ट सहन केले. पण यापुढें मात्र आपल्या आज्ञेचें पालन करायला आम्ही तयार नाहीं. राजकुमारीनें रूपनाथावर प्रेम केलें तर त्यांत कांहीं गैर आम्हांला वाटत नाहीं. त्याच्याशीं वैर सोडून आपण त्याच्याशीं सख्य करून घ्यावें असा आमचा सल्ला आहे. आपण चार जांभळांसाठीं जहागीर धायला तयार झालांत. तीं जांभळें तरी रूपनाथानेंच दिली होतीं. त्यानेंच राक्षसाला ठार केलें."

सर्व अंगरक्षक व त्याचे विश्वस्त सरदारच विरुद्ध बोलूं लागल्यावर रूपनाथाला क्षमा करायला राजा तयार झाला. राजानें त्याला खालीं उतरायला सांगून मल्लिकेशीं त्याचें लग्न करून दिलें व त्याला एक जहागीर देऊन त्याचा सन्मान केला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा ! रूपनाथ राजभक्त होता, बुद्धिमान होता व शूर पण होता. एका स्त्रीच्या नादाला लागून त्यानें स्वतःचा जीव धोक्यांत कां टाकला ? तिच्याशीं लग्न करण्याची पण त्याला इच्छा नव्हती. मग तिच्याबरोबर पळून जाण्याची तरी काय गरज होती ? ह्या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

विक्रमार्क म्हणाला—"पाण्यांत बुडणाऱ्याला वांचविणाऱ्याचे कपडे भिजणारच. असहाय मल्लिकेला मदत धायला तो कबूल झाल्यावर तिच्यावर येणाऱ्या संकटांचा वांटा पण त्याच्या पदरीं आल्याशिवाय कसा राहील ? म्हणून रूपनाथाला सर्व कष्ट सहन करावे लागले."

राजाचें मौन अशा प्रकारें भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व झाडावर जाऊन फांदीला लोंबकळूं लागला. (कल्पित)





# सुळावरची पोळी

भीमू चोरांच्या टोळींत सामील झाला. भीमूच्या पराक्रमाची कल्पना चोरांना नव्हती. पण त्यांना हें कळायला वेळ लागला नाहीं कीं, त्याच्या अंगांत राक्षसी पराक्रम असला तरी अकलेच्या नांवानें तो शून्यच आहे.

एकदां चोर भीमूला बरोबर घेऊन एका श्रीमंताच्या घरीं चोरीला गेले. त्यांनीं भिंतीला भोंक पाडलें व आंत शिरले. त्यांनीं भीमूला पण आंत बोलाविलें व सर्व वस्तू दाखवून त्याला म्हणाले—"ज्या वस्तू वजनी असतील त्या तूं उचलून आम्हांला बाहेर दे. आम्ही बाहेरून घेत जाऊं."

भीमूनें मुंडी हलवून सर्व समजल्यासारखें दाखविलें. तो प्रत्येक वस्तु उचलून पाहूं लागला, सर्वांत जड काय आहे. तेवढ्यांत त्याला उखळाचा दगड व वरवंटा दिसला. त्याला वाटलें, चोर दाखवायला विसरले असतील. म्हणून त्यानें उखळ उचलून न्यायचें ठरविलें. त्यानें तें जागचें हलवलें पण उचलतां येईना. कोणी हात लावून खांद्यावर दिलें तर नेणें सोपें जाईल असा विचार करून सैंपाकघरांत सैंपाकी झोंपलेला होता त्याला जागें केलें व म्हणाला—"जरा इकडे ये ! येऊन हें उखळ डोक्यावर ठेवायला हात दे."

सैंपाक्यानें उठून विचारलें—"कोण रे तूं मला जागा करून उठवायला ? उखळ उचलून तुझ्या डोक्यावर उचलून ठेवूं होय मी ?"

"मग त्यांत काय झालें ? मला एकट्यानें तें उचलत नाहीं म्हणून जरा हात लावायला सांगितलें. चोरांनीं हें मला घेऊन यायला सांगितलें नव्हतें. मीच घेऊन जात आहें. त्यांनीं दाखविलेल्या वस्तू हलक्या आहेत.

त्या उचलून घ्यायला तूं नाहीं आलास तरी चालेल." भीमू म्हणाला.

सैंपाकी जोरानें ओरडला—"चोर! चोर!!" घरांतले लोक जागे झाले. त्यांनीं भीमूला धरलें. जागाजाग झालेली पाहून सर्व चोर पळून गेले.

त्या घरच्या लोकांनीं भीमूच्या बुद्धीचा पराक्रम पाहिला व थक्क होऊन त्याला सोडून दिलें. तो आपल्या चोर मित्रमंडळींच्या शोधार्थ निघून गेला.

टोळी राहण्याच्या जागीं पोंचल्यावर चोरांच्या सरदारानें भीमूचा कान पिळवटून त्याचें थोबाड लाल केलें व म्हणाला—"बैलोबा, तुझ्यामुळें काल सर्वांचा घात होणार होता." भीमूनें क्षमा मागितली आणि अशी चूक पुन्हां करणार नाहीं, म्हणून वचन दिलें.

दुसऱ्या दिवशीं चोर एका जमीनदाराच्या घरीं चोरी करायला गेले. भीमूला पण त्यांनीं बरोबर नेलें.

या खेपेस भिंतीला भोंक पाडून भीमूला आंत पाठवून म्हणाले—"उखळाजवळ जाऊं नकोस. ही वाळू घेऊन जा. वर जाऊन ही वाळू टाकीत जा. वाळू पडल्यावर ज्या वस्तुचा "घस घस" असा आवाज होईल ती उचलून घेऊन ये."

भीमू वाळूची पिशवी घेऊन आंत शिरला. घरभर हिंडला. लोक घोरत पडले होते. त्यानें विचार केला, चोरांनीं सांगितल्याप्रमाणें मी वाळू फेंकीत गेलों तर ती ह्या लोकांच्या तोंडांत व अंगावर पडेल. तें बरोबर होणार नाहीं. म्हणून तो ओरडून म्हणाला—"मी वाळू फेकणार आहें. सावध व्हा! तोंडें बंद करा. नाहींतर तोंडांत वाळू पडेल! तोंडावर पांघरूण घेऊन झोंपा!"

त्याचा आवाज ऐकून सर्व उठून बसले. जागाजाग झालेली पाहून चोर पळून गेले.

ह्या खेपेस चोरांनीं भीमूची खूप हजेरी घेतली. पुन्हां तो पायां पडला व गयावया करूं लागला. "पुन्हां असें कांहीं केलेंस तर तुझें डोकेंच उडवूं, सांगून ठेवतों!" चोरांचा सरदार म्हणाला.

दोन तीन दिवसांनीं चोरांनीं राजवाड्यांतच चोरी करायचें ठरविलें. धान्याचीं कोठारें, खजीना, अमूल्य वस्तू व दाग दागिन्यांची खोली अशा निरनिराळ्या खोल्या व दालनें होतीं. त्यांनीं एकेक खोलीवर एकेक चोराला नेमलें. ह्या खेपेस त्यांनीं भीमूला बाहेर ठेवलें व कांहीं धोका असेल





तर हें शिंग ठेवून घे. ह्याचा उपयोग कर बरें का ? असें बजावून ठेवलें.

चोर आंत गेल्यावर भीमू बाहेर एकटा बराच वेळ उभा राहिला. "कांहीं धोका बिका दिसत नाहीं. असा विचार करून तो देखील आंत शिरला.

आंत पाय ठेवतांच त्याला गोठा दिसला. त्यांत एक चोर प्रथमच घुसला होता. त्यानें एक गाय सोडली होती. ती गाय मारकी होती. ती त्या चोराला शिंगानें मारूं लागलेली पाहून भीमूला वाटलें, ही धोक्याची सूचना आहे. त्यांत तो चोर गाईला म्हणाला— "थांब तुझें शिंग उपटून बाजवितों." भीमूनें लगेच आपलें शिंग घेतलें व जोरानें बाजविलें.

आवाज ऐकून राजाचे शिपाई जागे झाले. चोरांनीं पण शिंगाचा आवाज ऐकला. पण आवाज बाहेरून न येतां आंतूनच आलेला पाहून ते चकित झाले. काय करावें त्यांना सुचेना. ते जागच्या जागीं उभे राहिले. शिपायांनीं येऊन त्यांना धरून त्यांच्या मुसक्या बांधल्या.

सर्व चोरांना राजासमोर हजर करण्यांत आलें. त्यांना जन्मठेपेची शिक्षा झाली. भीमूला साक्ष द्यावी लागली. त्यानें चोर कोठें राहतात वगैरे शिपायांना दाखविलें होतें. त्याच्यामुळेंच राजवाड्याचें रक्षण झालें व चोरांचा धुमाकूळ बंद होऊं शकला असा विचार करून राजानें त्याला पांचशे रुपये बक्षिस दिले. नंतर राजदरबारीं प्रवेश मिळण्यास खूण म्हणून एक अंगठी पण बक्षिस दिली. भीमूला तें बक्षिस मिळाल्याचा आनंद किंवा दुःख कांहींच झालें नाहीं. कारण त्याला अंगठीचें महत्त्व कळलेंच नाहीं व पांचशें रुपये ही मोठी रकम कीं लहान हें देखील कळलें नाहीं.

बक्षिस घेऊन भीमू घरीं निघाला.






# खलीफाची संपत्ति

खलीफा हरून अल रशीद यांच्या नातवाचे नातू अल मुतसिद बिल्ला सहावे खलीफा म्हणून गादीवर बसले तेव्हां बगदाद येथें घडलेली ही गोष्ट आहे.

एकदां खलीफा वेश पालटून आपले अंतरंग मित्र हमदून याच्या बरोबर नगराची हालहवाल पहात होते. ते एका संगमरमरी दगडावर बसून थोडी विश्रांती घेत होते. तें एक उद्यान होतें. उद्यानाच्या मधोमध एक सुंदर इमारत होती. ती अस्पष्ट दिसत होती. खलीफा रत्नपारखी होते. त्यांनीं तें उद्यान, त्यांतलीं फुलझाडें व त्यांची मांडणी पाहून ह्या महालांत राहणारा जो कोणी असेल, हुशार असावा हें ओळखलें.

इतक्यांत त्या महालांत काम करणाऱ्या दोघां मुलांना बोलत बाहेर येत असलेले त्यांनीं पाहिलें. दोघे आड उभे राहिले.

"आज मालकाला जेवणांत मजा नाहीं वाटणार. कारण आज त्यांच्या बरोबर जेवायला कोणी अतिथी पाहुणा नाहीं !" एक नोकर म्हणाला.

"कोणी उद्यान पहायला म्हणून आंत आला तर बरें होईल." दुसरा म्हणाला.

तें ऐकून खलीफा हमदूनला म्हणाले— "ऐकलेंस हमदून ! पाहुणा आला नाहीं म्हणून दुःखी होणारा हा कोणी तरी विक्षिप्त मनुष्य दिसतो आहे."

"मला वाटतें अशा माणसाची ओळख करून घ्यावी." हमदून म्हणाला. समोर येऊन हमदून म्हणाला—"हें पहा बाळांनो ! आम्ही दोघे परदेशी आलों आहों. एक दिवस राहणार आहों. जाऊन विचारून ये."

मुलांना परमानंद झाला. दोघे धांवतच मालकाकडे गेले. थोड्या वेळानें स्वतः मालक



दोघां पाहुण्यांना आदरपूर्वक घरांत बोलावून घेऊन गेला. पंचपक्वान्नांचें जेवण वाढून त्यानें आतिथ्य सत्काराचें भाग्य दिल्याबद्दल आपल्या पाहुण्यांचे आभार मानले.

हमदून पाहुणचार पाहून इतका खूष झाला कीं तो यजमानाची प्रशंसा करूं लागला. परंतु खलीफांच्या चेहऱ्यावर आनंद तर दूरच, राग दिसला. त्याचा सत्कार व विनय ते पार विसरून गेले. त्यांनीं करड्या आवाजांत त्याला विचारलें—"कोण तूं?"

"लोक मला अबू अल हसन अली इब्न या नांवानें ओळखतात." तो म्हणाला.

"मी कोण, हें ओळखलेंस का?" खलीफांनीं त्या स्वरांत विचारलें.

"माफ करा. मी आपल्याला नाहीं ओळखलें. अतिथि पाहुणा हा अल्लाचा निरोप घेऊन येतो, असें मी आजवर मानीत आलों आहें." तो म्हणाला.

इतक्यांत हमदूननें खलीफाचा परिचय करून दिला. अहमदनें खलीफांचे पाय धरले व म्हणाला—"चुकून सेवकाच्या हातून कांहीं चूक झाली असेल तर मालकांनीं क्षमा करावी. आतिथ्य सत्कारांत कांहीं उणीव राहिली असेल कदाचित!"

"उणीव काय असणार तुझा आतिथ्य सत्कार शाही थाटाचा होता यांत शंका नाहीं." खलीफांच्या आवाजांत खोंच होती.

"तुझ्या घरांतल्या वस्तूंवर माझे आजोबा मला बल्लाह यांचें नांव आहे. तूं या वस्तू खजिन्यांतून चोरून आणल्यास याबद्दल तुला काय शिक्षा होऊं शकते, हें माहीत आहे का?" खलीफांनीं विचारलें.

तें ऐकून अहमदनें स्मित केलें. त्याच्या मनाला धीर आला. तो म्हणाला—"सांगतों, ती गोष्ट ऐकावी, मालक!" त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.



"माझे वडील एका सामान्य घराण्यांत जन्मले होते. तरी ते बगदादचे सर्वांत श्रीमंत व मातबर व्यापारी म्हणून प्रसिद्ध होते. मी त्यांचा वारस.

"एकदां मी दुकानांत बसलों होतों. दुकानांत एक अत्यंत रूपवती तरुणी आली. 'अबू अल हसन इब्न अहमदचें दुकान हेंच का?' तिनें विचारलें. तिचें रूप व लावण्य पाहून मी तिच्यावरच भाळलों. मीच दुकानाचा मालक अहमद आहें, हें कळल्यावर ती दुकानांत निस्संकोच येऊन बसली. मला तीनशें दीनार पाहिजे आहेत. आपण आपल्या मुनीमांना आज्ञा करा. माझ्या मुनीमानें माझ्या आज्ञेनें तीनशें दीनार दिले. तिनें ते घेतले व आभाराचा एक शब्द देखील बोलल्याशिवाय आली तशी लगबगीनें निघून गेली.

"हे तीनशे दीनार कोणाच्या नांवीं लिहून ठेवूं?" मुनीमानें विचारलें.

"मला तरी ती कोण आहे हें कोठें माहीत आहे?" मी म्हणालों.

आमचे मुनीम पळत पळत त्या तरुणीच्या मागें गेले व त्यांनीं तिला नांव विचारलें, तेव्हां रागानें त्या मुलीनें त्यांच्या तोंडांत





एक लगावली. बिचारे मुनीमजी 'अल्ला' 'अल्ला' म्हणत दुकानांत परत आले.

मी दिवसभर त्याच विषयीं विचार करीत बसलों होतों. दुसऱ्या दिवशीं ती पुन्हां दुकानांत आली. पहिल्या दिवशीं काय घडलें याची तिला जणुं कांहीं आठवणच नव्हती. आल्याबरोबर ती म्हणाली—"काल मी कांहीं बोलल्याशिवाय निघून गेलें."

"अल्लाची शपथ! माझ्या मनांत कधींच तो विचार आला नाहीं. हें दुकान तुझेंच आहे. यांतली प्रत्येक वस्तू तुझीच व मी पण तुझाच गुलाम आहें!" मी म्हणालों.

"हुं:! तर मग मला पांचशें दीनार द्या!" ती म्हणाली. मी पुन्हां पांचशे दीनार दिले. ते घेऊन पुन्हां कांहीं बोलल्याशिवाय ती निघून गेली.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं ती पुन्हां दुकानांत आली. हिरे, मोती व मखमलीकडे बोट दाखविलें. मी त्या हिऱ्यामोत्यांबरोबर तें मखमली कापड तिला बांधून दिलें.

तीनदां फुकटाचा हा सौदा तिनें करून घेतल्यावर स्वस्थ बसणें मला बरोबर वाटलें नाहीं. मुनीमजींप्रमाणें आपलें थोबाड रंगवून घ्यायला तयार होऊन मी सुद्धां तिच्या पाठोपाठ गेलों. ती टाइग्रीस नदीकाठीं गेली. एका नावेंत बसून ती पलीकडे आपल्या आजोबांच्या (खलीफांच्या) महालांत पोंचली. तिला भेटणें किती कठीण आहे, ह्याची कल्पना मला तेव्हां आली.

मी घरीं येऊन आईला एका मुलीवर माझें मन गेल्याचें सांगितलें आणि म्हटलें ती खलीफांच्या घरची असली तरी तिच्याशीं निकाह करण्यासाठीं मी जिवाचें बरें वाईट करून घ्यायला तयार आहें.

"तुला वेडबीड तर नाहीं लागलें. तुझ्या रूपावर व वैभवावर एकीहून एक सुंदर मुली उड्या घेतील! तूं त्या मुलीचा नाद सोडून दे." आई म्हणाली.

"नशिबांत असेल तेंच होतें, आई! वर अल्ला मालक आहेच!" असें सांगून मी निघून गेलों.

एके दिवशीं मी आमच्या सराफीच्या दुकानांत बसलों होतों. तेव्हां आमच्या अडतीच्या दुकानांत बसणारा म्हातारा मुनीम आला. माझ्या वडिलांचा त्याच्या प्रामाणिकपणावर पूर्ण विश्वास होता. मला पाहून मी आजारी आहें कीं काय अशी शंका आली त्याला. मी थोडक्यांत त्याला सांगितलें, ह्या आजारावर हकीम वैद्याकडे औषध नाहीं, मुनीमजी! त्या चाणाक्ष मुनीमानें सर्व ओळखलें व कोण काय याची चवकशी करून म्हणाला—"घाबरण्याचें कारण नाहीं. खलीफांच्या घरचे कपडे शिवणारा शिंपी माझ्या ओळखीचा आहे. चार पैसे तळहातावर पडल्याबरोबर पोपटासारखी त्याची चरपट पंजरी सुरू होईल."

मी मुनीमजींबरोबर त्या शिंप्याच्या घरीं गेलों. मी आपल्या अंगरख्याचा खिसा धरून फाडून घेऊन गेलों होतों. टांका लावून द्यायला मी शिंप्याला सांगितलें. त्यानें





लगेच टांका लावून दिल्यावर मी त्याला दहा दीनार दिले. तो डोळे फाडफाडून माझ्याकडे पाहूं लागला आणि मिस्किल पणानें डोळे मिचकावीत स्मित करून म्हणाला–"कोणाच्या तरी प्रेमांत गुरफटलेली दिसते आहे स्वारी!"

मी म्हणालों–"या महालांतील एका मुलीनें माझें मन हिरावून नेलें आहे. तिचें नांव सुद्धां मला माहीत नाहीं." शिंपी म्हणाला–"ती मोती असणार! आणखी कोण? ती खलीफांसमोर गायला जाते."

त्याच वेळीं दुकानाकडे एक मुलगा येत असलेला दिसला. त्याच्याकडे पाहून शिंपी म्हणाला–"तो मोतीचाच छोकरा आहे!" त्या मुलानें दुकानांत खुंटीवर टांगलेला एक अंगरखा काढून विचारलें–"याची काय किंमत?" मी तो अंगरखा खुंटीवरून काढून त्या मुलाला देत म्हटलें–"हा घे! याची किंमत शिंप्याला मिळाली आहे!"

तो मुलगा माझ्याकडे मार्मिक नजरेनें पाहून हंसला. मला एका बाजूला बोलावून त्यानें विचारलें–"आपण अबू अल हसन इब्न अहम्मदच ना?"

"तुला कसें कळलें?" मी विचारलें.

"कां नाहीं कळणार! आपलें नांव तर पन्नास वेळां तरी आमच्या मालकिणीच्या तोंडांतून निघत असेल." तो मुलगा म्हणाला.

माझें मनोगत कळल्यावर तो मला तेथेंच थांबायला सांगून निघून गेला. थोड्या वेळानें तो एक पिशवी घेऊन आला. खलीफांचें नांव लिहिलेला एक पोशाक त्या पिशवींत होता. दररोज रात्रीं खलीफा तो पोशाक करून आपल्या अंतःपुरांत जात असत. तो मुलगा म्हणाला–"तुम्ही हा पोशाख करून रात्रीं सरळ आंत चला. तुम्हांला कोणी अटकाव करणार नाहीं. तुम्हांला निळ्या संगमरमरी चौखटीचा दरवाजा लागेल, तो उघडून आंत या. माझी मालकीण आपल्याला भेटेल." वाट वगैरे सर्व नीट समजावून सांगून तो निघून गेला.

मी विचार केला. तें साहसाचें काम होतें. त्याची मला संवय नव्हती. पण इतका दूर आलोंच आहें तर चार पावलें पुढें टाकायचा निश्चय मी मनाशीं केला. मी खलीफांचा पोशाख करून कस्तूरीचा डबा घेऊन निघालों. आंत शिरल्यावर असा चाललों कीं जणुं कांहीं रोजची पायाखालची वाटच. मुलानें सांगितल्याप्रमाणें अंतःपुरांतल्या प्रत्येक दरवाज्यासमोरच्या पात्रांत थोडी कस्तूरी टाकीत निळ्या संगमरमरी चौखटीच्या दरवाज्याजवळ आलों. मी दरवाजा उघडणार तेवढ्यांत कोणीतरी पाठीमागून येत असल्याचा भास झाला. वळून पाहिलें तर मशालींचा उजेड. खलीफा स्वतः येत होते.

आतां मागें पाऊल टाकणें अशक्य होतें. जिवावर उदार होऊन मी समोर दिसलें तें दार उघडलें व घाई घाईनें एका मागून एक दरवाजा उघडीत गेलों. सुदैवानें शेवटचा दरवाजा उघडला. मी आंत शिरलों. मला



पाहतांच आंतली तरुणी उठून उभी राहाली. तिच्याबरोबर एक दोन दासी होत्या.

ती ओरडली असती तर मी तेथेंच घेरी येऊन पडलों असतों. मला सुळावर तरी चढविण्यांत आलें असतें नाहीतर माझा शिरच्छेद झाला असता. त्या मुलाचें ऐकून मी विनाकारण या मोहांत पडलों असें मला वाटलें. मी आत्मग्लानीनें खालीं डोकें करून उभा राहालों. पण तेवढ्या अवधींत एकदां निरखून त्या तरुणीला पाहून घेतलें.

तोंडावर बारीक बुरखा होता. त्यांतून आवाज ऐकूं आला—"अबू अल हसन का? यावें यावें! माझी बहीण नेहमीं आपल्या विषयीं सांगत असते. तिनें तुमची चांगलीच परीक्षा घेतली तर! सुदैवानें तुम्ही माझ्याच महालांत प्रवेश केलात. दुसऱ्या महालांत गेला असतां तर तुमचें आयुष्य आजच संपुष्टांत आलें असतें. आतां घाबरण्याचें कारण नाहीं. मी आपल्याला मदत करीन. पण प्रथम मला हें सांगा, मोतीशीं तुम्हांला काय कर्तव्य आहे?"

"मी खोटें सांगत नाहीं. तिला फक्त एकदां पाहूं शकलों तर मी तें आपलें अहो भाग्य समजेन!" अहमद म्हणाला.




ती एका दासीला म्हणाली—"जाऊन, मोतीला जरा मी बोलावलें आहे म्हणून सांग."

मोती आली व मला पाहून थोडी देखील चपापली किंवा भ्याली नाहीं. ती हंसत पुढें आली. त्याच वेळीं बाहेरचा दरवाजा उघडल्याचा आवाज झाला. दोघी बहिणींनीं मला एका पेटींत शिरून बसायला सांगितलें. थोड्या वेळानें स्वतः खलीफा आंत आले. ते म्हणाले—"असं! तर मग दोघी बहिणी एकाच जागीं भेटल्या म्हणावयाच्या! मोती, दोन दिवस झाले,

कोठें होतीस, दिसली नाहींस ! तुझें गाणें ऐकून पुष्कळ दिवस झाले. एक गाणें म्हण बघूं !"

मोती त्या दिवशीं खूप खूष होती. त्या दिवशीं तिनें पुष्कळ गाणीं म्हणून खलीफांना खूष केलें. खलीफांनीं तिच्या गोड कंठाची प्रशंसा करीत म्हटलें—"बुल-बुलानें तुझाच आवाज चोरून घेतला आहे कीं काय याची मला शंका वाटते. मग काय वाटेल तें मागून घे ! पाहिजे तर मी आपलें अर्धे राज्य देखील देईन."

ती म्हणाली—"मालक ! माझ्यावर व माझ्या बहिणीवर आपली मेहरबानी असावी एवढेंच मागतें. आणखी कांहीं नको मला."

"मी देणार आहें. कांहींतरी मागून घे मोती ! मी तुझ्या गाण्यावर इतका खूष आहें !" खलीफा म्हणाले.

"तसेंच असेल तर मला दास्य मुक्त करावें व या खोलींतलें सर्व कांहीं मला द्यावें." मोती म्हणाली.

"दिलें !" खलीफा म्हणाले.

खलीफा निघून गेले. मोतीनें नोकरांना बोलावून त्या खोलींतलें सर्व सामान बाहेर काढवलें व त्या पेटी समवेत मला व सामान माझ्या घरीं पोंचतें केलें. त्याच दिवशीं मोतीशीं माझा विवाह झाला हें सांगण्याची गरजच नाहीं.

आपल्या आजोबांच्या नांवाच्या वस्तु माझ्या घरीं कशा आल्या त्याची हकीकत अशी आहे. मी सर्व कांहीं खरें तें सांगितलें आहे. यांत लपवालपव केलेली नाहीं."

ऐकून खलीफा मुतसिद बिल्ला खूष झाले व त्यांनीं अहमदवर लागणारे सर्व कर माफ केले व त्याला आपला एक मित्र म्हणून त्याचा आदर करूं लागले.





# गदाधरसिंह

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. त्याला एक मुलगा होता. त्याचें नांव त्यानें दगडू ठेवलें होतें. त्याचें अंग खरोखरीच दगडासारखं टणक होतें. त्याच्या शक्तीची किंवा शौर्याची कोणाला कल्पना नव्हती. एकदां त्याच्या बापानें शेतांतल्या मजुरांना प्यायला देण्यासाठीं घरून पेज तयार करून घेऊन यायला त्याला घरीं पाठविलें. दगडू घरीं गेला व आईकडून पेज तयार करवून ती एका मडक्यांत घालून शेतावर निघाला. परंतु त्याला ठेंच लागली व डोक्यावरचें मडकें जमिनीवर पडून फुटलें. त्या दिवशीं बिचाऱ्या मजुरांना प्यायला पेज मिळाली नाहीं.

बापानें दगडूला खूप झाडलें व म्हणाला—"तूं चालता हो माझ्या घरून. फुकटाच्या भाकऱ्या तुला खायला घालायला माझ्याकडे नाहींत."

दगडू म्हणाला—"बाबा ! मी जातों, पण मला एक गदा करून द्या. मला आणखी कांहीं एक नको !"

शेतकरी लोहाराकडे गेला व त्याच्याकडून अर्ध्या मणाची एक गदा करून घेतली. दगडूनें ती एकदां फिरवून पाहिली. तिचे दोन तुकडे होऊन पडले. म्हणून लोहारानें एका मणाची गदा केली. ती त्यानें दोनदां फिरवल्यावर तिचे दोन तुकडे झाले. म्हणून लोहारानें दोन मणाची गदा केली. ती मोडली नाहीं, पण तीनदां फिरवल्या वर वांकली. दगडूनें ती आपल्या मांडीवर वांकवून सरळ केली "ठीक आहे ! मला ही पुरे !" ती गदा घेऊन दगडू नोकरीच्या शोधार्थ निघाला. तो एका जहागीरदाराकडे गेला.

"तूं काय काम करणार रे ?" जहागीरदारानें विचारलें.

सौ. शांता कदम



"गुराख्याचें एकच एक काम मला येत आहे." दगडू म्हणाला.

"मला सुद्धां एका गुराख्याची गरज आहे. काय पगार घेणार?" जहागीरदारानें विचारलें.

"दोन वेळचें खायला व वर्षाचे शंभर रुपये पगार!" दगडू म्हणाला.

"तुझा पगार थोडा जास्तच आहे. पण एका अटीवर कबूल करतों. रात्री एक गाय देखील नाहींशी होता कामा नये! एक गाय जरी नाहींशी झाली तरी तुझे शंभर रुपये कापून घेईन." जहागीरदार म्हणाला.

"सगळ्या गाई सुरक्षित घरीं पोंचत्या करणें माझ्याकडे लागलें." दगडू म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं तो गाई घेऊन रानांत चरायला घेऊन गेला. गदा बरोबर होतीच. गाई चरूं लागल्यावर तो काटक्या गोळा करूं लागला.

इतक्यांत जमीन हादरल्यासारखी दगडूला भासली. वळून पाहतो तों एक राक्षस. त्यानें दगडूला विचारलें—"कोण रे तूं? नवा दिसतोस!"

दगडू म्हणाला—"बाबा रे! मला सोड. तुला खायला गाय हवी असेल तर एक सोडून दहा घेऊन जा. पण मला सोड. पायां पडतों."

राक्षसानें पहिल्यानेंच एका गाईचे पाय बांधून ठेवले होते. तो दगडूला म्हणाला—"ही पहा गाय! जरा हात लाव मी खांद्या-वर उचलून घेतों."

"हो पण तुझ्या खांद्यापर्यंत माझा हात कसा पोंचणार? तूं खालीं वांक. मी गाईला हात लावून खांद्यावर ठेवायला मदत करतों." दगडू म्हणाला.

राक्षस गाईला खांद्यावर घेण्यासाठीं खालीं वांकला. त्याबरोबर दगडूनें आपली





गदा त्याच्या टाळक्यांत घातली. राक्षस ठार होऊन जमिनीवर आदळला. दगडू त्याचें प्रेत फरपटत ओढून घेऊन गेला व त्याला नदींत ढकलून दिलें. नंतर तो गाई घेऊन घरीं परतला.

जहागीरदारानें गाई मोजून पाहिल्या. सर्व गाई सुरक्षित घरीं पोंचलेल्या पाहून त्याला आश्चर्यच वाटलें. त्यानें विचारलें—"काय रे, गाई कशा काय चरल्या?"

दगडू म्हणाला—"पोट भर मालक! पहा त्यांचीं पोटें तर पहा! नदीवर पाणी पिऊन देखील आल्या आहेत."

दुसऱ्या दिवशीं दगडू पुन्हां रानांत गाई चरायला घेऊन गेला. त्या दिवशीं दुसरा एक राक्षस आला. तो पहिल्या राक्षसाचा मोठा भाऊ असावा. त्याला देखील दगडूनें तीच युक्ती करून ठार केलें व त्याचें प्रेत नदींत टाकून संध्याकाळच्या सुमारास घरीं परतला. त्या दिवशीं जहागीरदार त्याला वाटेंत भेटला. त्यानें त्याला विचारलें—"काय रे, कांहीं विशेष? सर्व गाई आहेत बरोबर ना?" असें विचारून त्यानें स्वतः सर्व गाई मोजून पाहिल्या. सर्व गाई होत्या.

दगडू म्हणाला—"आज देखील गाई खूप चरल्या मालक. दुपारीं ऊन कडक होतें म्हणून वडाच्या सावलींत बसल्या होत्या. संध्याकाळीं नदीवर पाणी दाखवून त्यांना घेऊन आलों आहें."

"आणखी कांहीं झालें नाहीं म्हणतोस?" जहागीरदारानें विचारलें.

"काय होणार! कांहीं झालेलें मला तरी माहीत नाहीं मालक!" दगडू म्हणाला.

तिसऱ्या दिवशीं आणखी एक राक्षस आला. तो पहिल्या दोघांहून मोठा व



भयंकर होता. पण दगडूनें तीच युक्ती करून त्याला देखील वाटेला लावलें. रोज एकेका राक्षसाचा संहार करण्याचें काम ह्या मालकानें दिलें आहे असें वाटलें दगडूला.

चौथ्या दिवशीं तो गाईंना चरायला सोडून काटक्या गोळा करूं लागला तेव्हां त्याला वाटलें होतें तसा राक्षस आला नाहीं. पण त्यानें ज्या तीन राक्षसांना यमसदनास पाठविलें होतें त्यांची आई त्या दिवशीं आली. ती म्हणाली—"तूं माझ्या मुलांना एकेक करून ठार केलेंस!" असें सांगून ती दगडूला खायला धांवली. पण दगडूनें गदा फेंकून तिचे दोन्ही पाय मोडले. ती जमिनीवर आदळली व दगडूला शिव्या देत मोठमोठ्यानें रडूं लागली. म्हणाली—"आतां मला तरी कशाला जिवंत ठेवतोस. मलासुद्धां माझ्या मुलांना भेटायला कां नाहीं पाठवीत?"

"तुझे पाय दुखत असतील तर ते मी बरे करून देईन. पण तूं मला काय बक्षिस देशील?" दगडूनें विचारलें.

"माझे पाय दुखायचे थांबले तरी मला हिंडतां फिरतां येणार नाहीं. म्हणून तूं माझ्यावर उपकार कर व मला देखील ठार कर. या बद्दल माझ्या गुहेंत जें सोनें व चांदी आहे तें तूं घे." असें सांगून राक्षसिणीनें तिच्या गुहेची वाट दगडूला सांगितली.

दगडूनें त्या राक्षसिणीच्या इच्छेप्रमाणें तिला ठार करून तिचें प्रेत देखील नदींत फेंकून दिलें.

दगडू त्या दिवशीं नित्याप्रमाणें जहागीरदार वाटेंत भेटेल अशा समजुतीनें घरीं निघाला. पण तो न भेटलेला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तो घरीं पोंचला तेव्हां जहागीरदाराच्या घरची सर्व मंडळी रडत असलेलीं पाहून तो जास्तच चकित झाला.

त्या दिवशीं दुपारीं उत्तरेकडील गुहेंतला एक त्रिशिर नांवाचा राक्षस जहागीरदाराकडे येऊन म्हणाला—"सूर्यास्ताच्या आंत आपल्या मुलीला माझ्या गुहेंत पोंचती कर. नाहींतर मी तुम्हां सर्वांना खाऊन टाकीन." दगडू घरीं येण्यापूर्वींच सैपाकी जहागीरदाराच्या आज्ञेनें घरावरचें तें संकट टळावें म्हणून जहागीरदाराच्या मुलीला घेऊन गुहेकडे निघाला होता.

दगडूला तें सर्व कळलें. तो गदा घेऊन पाठोपाठ निघाला.

तो पोंचला तेव्हां गुहेच्या बाहेर जहागीरदाराची मुलगी एका दगडावर बसून रडत होती. सैपाकी तेथें नव्हता. तो कोठें तरी दगडाआड लपून बसला होता. दगडूला आलेला पाहून तिला थोडा धीर आला. कारण तो गदा घेऊन आला होता व सैपाक्यासारखा पळून गेला नव्हता. दगडू तिच्याजवळ येऊन उभा राहिला व म्हणाला—"तूं भिऊं नकोस! मी घेतों त्या त्रिशिराचा समाचार."

संध्याकाळ झाली. राक्षस गुहेंतून गुरगुरत बाहेर आला. तो काळोखांतून एकदम



उजेडांत आला म्हणून त्याचे डोळे दिपून गेले व आपोआप बंद झाले. दगडूनें त्या संधीचा फायदा घेऊन आपली गदा जोरानें फिरवून असा तडाखा दिला कीं तो राक्षस 'ओय ओय' करून ओरडत जमिनीवर आदळला व रक्त ओकून तेथल्या तेथें ठार झाला. गदा फेंकीत असतांना झोंक जाऊन दगडू तोंडघशी पडला. त्याच्या नाकाला लागलें व सर्व तोंड रक्तबंबाळ झालें. जहागीरदाराच्या मुलीनें आपला पदर फाडून त्याला पट्टी बांधली.

दगडू सरळ गोठ्याकडे गेला. त्या दिवशीं दोघांचा संहार केल्यानें त्याला विश्रांतीची गरज होती. सैंपाकी जहागीरदाराच्या मुलीला परत घरीं घेऊन आला. त्यानें आपल्या बहादुरीच्या फुशारक्या मारून राक्षसाचा वध केल्याचें सांगितलें, व म्हणाला—"तुम्ही सांगितल्याप्रमाणें राक्षसाला ठार केल्याबद्दल आपल्या मुलीशीं माझा विवाह करून द्या."

जहागीरदारानें वचन दिल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं लग्नाची तयारी केली. पण मुलीनें घडलेली गोष्ट सांगून या भित्र्या भागूबाईशीं माझें लग्न करून देण्यापेक्षां त्या गुराख्याशीं करून द्या असें वडिलांना म्हणाली.

जहागीरदारानें दगडूला आदरपूर्वक बोलाविलें. दगडूनें नोकरीला लागल्यापासून राक्षसांचा वध कसा केला हें सांगितलें. नंतर त्यानें गुहेंतलें सोनें व चांदी जहागीरदाराला दाखविली.

जहागीरदारानें असल्या शूर बहाद्दराशीं आपल्या मुलीचें लग्न करून दिलें व त्याला घरजावई करून घेतलें. त्यानें दगडूला गदाधर सिंह हें नवीन नांव देऊन त्याचा सत्कार केला.





# अयोध्याकांड

लक्ष्मणानें भावा-भावजयीचें बोलणें ऐकलें.

तो नम्रपणें रामाला म्हणाला—"दादा! तूं रानांत जायचा पक्का निश्चय केला आहेस, तर मलासुद्धां बरोबर घेऊन चल."

रामाला तें बरोबर दिसलें नाहीं. तो म्हणाला—"तूं सुद्धां जर माझ्याबरोबर गेलास तर वृद्ध बाबा व आई यांची काळजी कोण वाहणार. तुला त्यांच्यासाठीं तरी अयोध्येला रहावेंच लागेल.

पण लक्ष्मण का तें कबूल करणार? तो म्हणाला —"मला हें कांहीं कळत नाहीं. ही जबाबदारी ज्याची त्यानें घ्यावी. मी अयोध्येला राहणार नाहीं. जिथें तूं तिथें अयोध्या!"

राम निरुत्तर झाला. त्यानें वशिष्ठ यांच्याकडे जाऊन दिव्य अस्त्रें, अक्षय भाता धनुष्य वगैरे मागून घेऊन यायला सांगितलें. लक्ष्मण त्याचे सखा-मित्र सर्वांचा निरोप घेऊन व वशिष्ठ मुनींकडून शस्त्रास्त्रें घेऊन आला.

नंतर रामानें वनयात्रेस निघण्यापूर्वी दानधर्म केला. वशिष्ठ मुनींचा मुलगा सुमंत्र व त्याची पत्नी यांना बोलावून सीतेकडून तिचीं रत्नें व आभूषणें, पलंग गाद्या-गिर्द्या यांचें दान करविलें व स्वतः शत्रुंजय नांवाचा आवडता हत्ती व अनेक हत्ती दान केले. अगस्त्य, कौशिक वगैरे ब्राह्मणवृंदाला, कौशल्येच्या सेवेस असलेल्या एका वृद्ध पुरोहिताला, दशरथ राजाच्या विश्वासपात्र



चित्ररथ नांवाच्या सारथ्याला व ब्रह्मचाऱ्यांना, असंख्य गाई, सोनें, चांदी, मणि माणिक्यें व वस्त्रें दान केलीं.

अयोध्येपासून जवळ रानांत त्रिपक नांवाचा एक वृद्ध ब्राह्मण रहात असे. त्याचें कुटुंब फार मोठें होतें. आपल्या या कुटुंबाचा भार त्याला कठीण वाटूं लागला होता. कंद-मुळें आणि फळें खाऊन तो मोठ्या कष्टानें रहात होता.

राम वनगमनास निघाल्याचें ऐकून तो रामाकडे आला व म्हणाला—"युवराज! मी गरीब आहें. माझें कुटुंब मोठें आहे. बायका-पोरें उपाशीं मरण्याची पाळी आली आहे. तूं दया केलीस तर कदाचित वांचतील!"

रामानें त्याच्या हातांत एक काठी दिली व म्हणाला—"ही काठी फेंका! ही जितक्या दूर जाऊन पडेल तितक्या अंतरावर जितक्या गाई मावतील तितक्या मी तुम्हांला देईन."

म्हाताऱ्या त्रिपकानें काठी फेंकली. ती सरयू नदीच्या पैल तिरावर जाऊन पडली. रामानें प्रणाम करून स्मित केलें व म्हणाला—"तुमच्या तपश्चर्येची शक्ती किती आहे हें पाहण्यासाठीं मी ती सूचना केली होती. मी शब्द दिल्याप्रमाणें तितक्या गाई देईनच व जास्त देखील देईन. आणखी कांहीं मागा-वयाचें असेल तर मागून घ्या!"

त्रिपकानें रामाला आशीर्वाद दिला व रामानें दिलेल्या गाई घेऊन तो आपल्या घरीं परत गेला. अशा प्रकारें दानधर्म करून राम, सीता व लक्ष्मणासह वडिलांचा निरोप घ्यायला निघाला.

त्या तिघांना पायीं चालत जात असलेले पाहून लोक गच्चींत व सज्जांत उभे राहून दशरथ व कैकेयी यांची निंदा करूं लागले.

ते म्हणत होते—"तो पहा राम, बायको-बरोबर व धाकट्या भावाबरोबर पायीं चालला आहे. या दशरथ राजाच्या मानेवर भूत बसलें आहे कीं काय म्हणावें कळत नाहीं. राजा किती दुष्ट व अत्याचारी झाला तरी निरपराध प्रजेला इतकी कडक शिक्षा देणार नाहीं; पण ह्यानें तर स्वतःच्या मुलालाच वनवास दिला आहे! चला, आपण सुद्धां जाऊं रानांत! असल्या राजाच्या राज्यांत कशाला रहा!"

प्रजेचे हे शब्द रामलक्ष्मणांच्या कानांवर पडत होते. परंतु रामानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यानें सुमंत्राकरवीं निरोप घ्यायला आलों आहें असें कळविल्यावर दशरथानें रामाला आंत बोलावून घेऊन यायला सांगितलें.

राम, लक्ष्मण व सीतेसह आल्यावर राजा दशरथ व अंतःपुरांतील स्त्रिया सर्व उठून उभे राहिले. दशरथ रामाला भेटायला म्हणून पुढें गेला. पण दुःखावेगानें भोंवळ येऊन खालीं पडला. रामानें त्याला हात देऊन पलंगावर बसविलें.

दशरथ राजाला शुद्ध आल्यावर राम म्हणाला—"महाराज, मी वनांत जात आहें, आपला आशीर्वाद घ्यायला आलों आहें. मी पुष्कळ समजावून सांगितलें, पण सीता



व लक्ष्मण दोघांनीं हट्ट धरला आहे कीं मी त्यांनाबरोबर न्यावें. त्यांना सुद्धां परवानगी द्यावी."

दशरथ रामाला म्हणाला—"बाळा! मी कैकेयीला वर देण्याचें वचन देऊन फसलों. पण तूं माझी आज्ञा भंग करून राज्याभिषेक करून घ्यावा."

"महाराज! दिलेलें वचन मोडण्याचें व असत्याचरणाचें पाप करणें बरोबर होणार नाहीं. रानांत जायला मी तयार आहें. चौदा वर्षें रानांत राहून तुमची सेवा करण्यास मी पुन्हां परत येईन." राम म्हणाला.



"पण आजच गेलें पाहिजे असें कोठें आहे? आजचा दिवस रहा. उद्यां सकाळीं जायचें तर जा!" दशरथ म्हणाला.

"बाबा! तुमच्या आशीर्वादानें मला काय नाहीं मिळालें? व पुढें तरी काय मिळणार नाहीं? आशीर्वाद द्या. रानांत आम्हांला कष्ट वगैरे कांहीं होणार नाहीं. उलट दऱ्या-खोऱ्यांत निसर्गाचें सौंदर्य पहात आम्ही आनंदानें हिंडू फिरूं!" राम म्हणाला.

राम वनांत जाणार व दशरथ पुत्रविरहानें मरणार हें ओळखून सुमंत्राला अत्यंत राग आला. दांत ओठ चावून रागानें तो कैकेयीला म्हणाला—"दुष्टे! तुला प्राणापेक्षां जास्त मानत येणाऱ्या आपल्या पतीला दुःखी करून स्वतः त्याला मृत्युमुखांत ढकलीत आहेस, तुला लाज ,वाटत नाहीं का? या कुळाचा नाश करून तुला काय सुख मिळणार आहे हें तरी कळूं दे. राम सर्वांत मोठा आहे. तो युवराज आहे. तो राजा झाला तर तुझ्या पोटांत कां दुखावें? भरत गादीवर बसला तर, तुला काय वाटतें कोणी या अयोध्येंत राहील? अयोध्या ओसाड होऊन जाईल. शेवटीं तूं आपल्या आईचें नांव राखलेंस म्हणावयाचें. जशी आई तशी मुलगी! तुझे वडील अश्वपति यांना एका मुनींकडून एक मंत्रशक्ति प्राप्त होती. त्या शक्तीमुळें त्यांना पशुपक्ष्यांची भाषा कळूं लागली. एकदां अश्वपति पलंगावर झोंपला असतां जृंभ नांवाची मुंगी कांहींतरी बोलली व तें ऐकून अश्वपति हंसला. तुझ्या आईनें हंसण्याचें कारण विचारलें. पण तुझे वडील म्हणाले—"मी कारण सांगून टाकलें तर मला मरण येईल." तेव्हां तुझी आई हट्ट करून म्हणाली—"मला तें कांहीं माहीत नाहीं. तुम्ही मला पाहून हंसला नाहीं कशावरून? म्हणून मला कारण सांगितलेंच पाहिजे. तेव्हां



ज्या मुनींनीं ती मंत्र शक्ति दिली होती त्या मुनींकडे जाऊन तुझ्या वडिलांनीं विचारलें. मुनी म्हणाले, तुझ्या बायकोनें प्राण दिला तरी तूं हंसण्याचें कारण सांगूं नकोस. तेव्हां तुझ्या वडिलांनीं तुझ्या आईलाच निघून जायला सांगितलें. पुढें त्याला कधीं त्रास झाला नाहीं. तुझें हें काम तरी तसेंच आहे. राम वडिलांना सोडून वनांत गेला तर राज्या-वर केवढें मोठें संकट येईल, सांगता येईल का? म्हणून तूं हा हट्ट सोडून दे व रामाचा राज्याभिषेक करायला कबूल हो!"

परंतु तें ऐकून कैकेयीला लाज तर नाहींच वाटली उलट तिला राग आला व ती तोंडाला आलें तें बोलली. म्हणून तिचा नाद सोडून सुमंत्र दशरथाकडे वळला. दशरथ म्हणाला—"बाबा रे! एकदां माणसाची बुद्धी फिरली कीं त्याबरोबर त्याची माणुसकीपण जाते. लाजलज्जा, दया, संकोच, प्रेम हे मानवोचित गुण नाहींसे होतात. तूं रामाबरोबर माझी चतुरंग सेना, दासदासी सर्वांना पाठव. रामाला राज्याभिषेक न झाल्याची जाणीव होतां कामा नये."

सुमंत्राच्या बोलण्याकडे कैकेयीनें दुर्लक्ष केलें होतें व तिला त्यांचा रागपण आला



होता. त्यानंतर राजाचें तें बोलणें ऐकून ती म्हणाली—"मी सांगून ठेवतें, मला हें सर्व नाटक आवडत नाहीं. हें सर्व रानांत पाठवून तुम्ही सुद्धां रानांत जाल. मला तें खपणार नाहीं. भरताला असल्या राज्याची गरज नाहीं. तो गादीवर बसणार नाहीं. मी सांगून ठेवतें!"

राजा म्हणाला—"दुष्टे! तूं वर मागितलेस ते मी दिले. राम वनांत जायला तयार झाला. तूं भरताचा राज्याभिषेक कर आणि रहा सुखानें! मी रानांत जायचें नाहीं हा वर कां नाहीं मागून घेतलास? एकदां माझा



गळा दाबून जीव घे! म्हणजे तुझ्या मनासारखें होईल."

कैकेयी त्याहून जास्त रागानें म्हणाली— वनांत जायचा अर्थ आहे, सर्व सोडून जाणें. जर चतुरंग सेना रामाबरोबर जाणार असेल व तुम्ही पण जाणार असाल तर? भरताला राज्य देण्याचें नुसतें सोंग कशाला? तुमचे पूर्वज सगर महाराज यांनीं आपला मुलगा असमंज याला रानांत पाठविलें तेव्हां बरोबर सैन्यपण पाठविलें होतें वाटतें?"

तें ऐकून सिद्धार्थ नांवाचा मंत्री म्हणाला— "त्या असमंजाची गोष्ट येथें कशाला सांगतां? तो दुष्ट होता. तो मुलांना उचलून नेत असे व सरयू नदींत फेकून देत असे. मुलें बुडूं लागलीं कीं त्या राक्षसी आनंदांत तो हंसत असे. म्हणून प्रजेनें सगर राजाकडे तक्रार केली. प्रजेनें सांगितलें कीं तुम्ही असमंज याला तरी राज्याबाहेर काढा, नाहींतर आम्हांला राज्य सोडून जायला परवानगी द्या. म्हणून सगर राजानें आपल्या दुष्ट व समाजद्रोही मुलाला त्याच्या बायकोबरोबर सर्व नोकरांचाकरांसह राज्याबाहेर काढलें. तो प्रजाद्रोही होता आणि राम प्रजाप्रिय आहे!"

परंतु तें सर्व पालथ्या घागरीवर पाणी पडल्यासारखें होतें. दशरथ म्हणाला—"तुझें हिताहित कळण्याची शक्ति तुझ्यांत उरली नाहीं. तूं काय वाटेल तें कर, मी रामाबरोबर वनांत जातों."

राम दूर उभा राहून सर्व ऐकत होता. तो म्हणाला—"बाबा! मी स्वतः सर्व सोडून जायला तयार असतां ही सेना कशाला माझ्याबरोबर? आम्हांला वल्कलवस्त्रें द्या. त्यांवर रानांत आमचें काम भागेल."

कैकेयीला लाजलज्जा उरलीच नव्हती. ती म्हणाली—"ही पहा घेऊन येतें वल्कल वस्त्रें!" आणि एका तवकांत आणून दिलीं.





राम लक्ष्मणांनीं वल्कल वस्त्रें परिधान केलीं. सीतेनें पण वल्कल वस्त्रें उचललीं. पण तीं कशी नेसायचीं तिला कळलें नाहीं. फक्त खांद्यावर ठेवून ती उभी राहाली. तेव्हां रामानें हंसत जवळ जाऊन तिच्या रेशमी साडीवरच तीं गुंडाळून घ्यायला सांगितलें.

तें पाहून कौशल्या व सुमित्रा पुढें येऊन म्हणाल्या—"रामा! वडिलांच्या आज्ञेनें तूं रानांत निघालास हें कबूल! पण सीतेला बरोबर जायची काय गरज? तिला वनवास झेंपायचा नाहीं. तिला आमच्याजवळ ठेवून जा. तिच्याकडे पाहून तरी आम्ही चार दिवस जगूं!"

इतका वेळ वशिष्ठ मुनि कांहींच बोलले नव्हते. ते पुढें येऊन म्हणाले—"तूं आपल्या हातांनीं सीतेला वल्कल वस्त्रें देतेस? तुला जनाची नाहीं तर मनाची तरी कांहीं लाज आहे कीं नाहीं? सीतेला रानांत पाठविण्यास तुझा दुजोरा? तिला रानांत कां पाठवतेस?"

"रामाचा राज्याभिषेक करण्याची जी तयारी झाली आहे ती तयारी सीतेचा राज्याभिषेक करायला पुरी आहे, हें तुला कळलें नाहीं वाटतें? सीतेला या वल्कल वस्त्रांची जरूर नाहीं. एवढेंच नव्हें तिच्याबरोबर वाहनें, वस्त्रें आभूषणें दासदासी तिला जें हवें तें वनांत पाठवतां येईल.

"आणखी तुला वाटत असेल कीं तूं राज्य मिळवून दिलेंस म्हणून भरत तुझे गोडवे गाईल व आभार मानील. पण त्याचा स्वभाव मी ओळखतों. त्याला हें बिलकुल पसंत पडणार नाहीं. एकाच बापाचीं हीं मुलें परस्परविरुद्ध कधीं उलटणार नाहींत." वशिष्ठ मुनि एवढें बोलून गप्प झाले.

दशरथानें पाहिलें कीं, राजवाड्यासमोर प्रजेची गर्दी जमा झाली आहे. त्यांनीं सीतेला जवळ बोलावून म्हटलें—"बाळे!

तूं का रानांत जाणार? या वयांत मुनि पत्नींसारखीं वल्कल वस्त्रें धारण करून तुला कसें राहवेल मुली?" नंतर कैकेयीला म्हणाला—"नाहीं नाहीं! सीता वल्कल वस्त्रें धारण करणार नाहीं."

राम वडिलांना म्हणाला—"बाबा, आतां मी येतों!" आणि पायां पडून निघाला. दशरथानें सुमंत्राला जवळ बोलावलें आणि म्हणाला—"मित्रा! या सर्वांना रथांत बसवून गांवाबाहेर रानांत पोंचवून ये." आणि कोशाधिकाऱ्याला बोलावून म्हणाला—"सीतेला चौदा वर्षें पुरतील इतक्या साड्या व दागिने बरोबर दे!"

कौसल्या व सुमित्रा यांनीं सीतेला सर्व दागिने घातले व म्हणाल्या—"बाळ! तुझा पति आज गरीब झाला आहे. त्याची काळजी घे." रामानें आपल्या वडिलांना व आईला नमस्कार केला. राम आईला म्हणाला—"आई! तूं माझी किंवा सीतेची अगदीं काळजी करूं नकोस. चौदा वर्षें संपतांच मी परत येईन. तूं बाबांची मात्र काळजी घे. चौदा वर्षांचा काळ म्हणजे मोठा नाहीं. तो सुखांत जाईल."

लक्ष्मणानें पण आपल्या आईला, कौशल्येला व वडिलांना नमस्कार केला. सुमित्रा त्याला म्हणाली—"बाळ! रामच आतां तुझा पिता व सीताच तुझी माता. त्यांची सेवा हाच तुझा या पुढचा धर्म आहे! अरण्यच अयोध्या आहे."

तिघे बाहेर आले. सीतेला रामाबरोबर वनवासास जायला मिळाल्याचा इतका आनंद झाला कीं ती सर्वांच्या आधीं रथांत जाऊन बसली. नंतर राम लक्ष्मण रथांत बसल्यावर सुमंत्रानें सीतेसाठीं राजानें दिलेलीं वस्त्राभूषणें आणि रामानें सांगितलेलीं शस्त्रास्त्रें वगैरे ठेवलीं व रथ हांकला.





ब्रह्मपुर नांवाच्या गांवाजवळ रानांत महादू नांवाचा शेतकरी रहात असे. त्याला लखू नांवाचा एक मुलगा होता. लखू रोज गाई चरायला घेऊन जात असे. बाप उठल्या-बरोबर धार काढी व गाईला चारा घालून लखूला उठवी. लखू शेणगोठा करून न्याहरी करी व गाई घेऊन रानांत जाई.

लखूची आई लवकर वारली. म्हणून बापलेक सैंपाक व घरचीं कामें करीत. त्यांचें घर म्हणजे एक झोंपडें होतें. तें रानांत एका बाजूला होतें.

रानाला लागूनच पलीकडे डोंगराळ प्रदेश होता. लखू गाई घेऊन तिकडेच जात असे. गाई कुरणांत चरत व लखू कधीं झाडावर चढून पावा वाजवी नाहींतर गुणगुणत कोठें तरी हिंडे फिरे. पण महादूनें त्याला ताकीद केली होती कीं, डोंगरांतल्या गुहेंत वाघ, सिंह व इतर श्वापदें आहेत असें लोक सांगतात. तेव्हां त्या बाजूला जाऊं येऊं नकोस.

एकदां लखू गमतीखातर तीर कमान घेऊन गुरांना रानांत चरायला घेऊन निघाला. गुरें चरायला सोडून तो एका झाडाच्या बुंधाला टेंकून उभा राहिला. खेळाखेळांत दूर कोणी पक्षी दिसला कीं तो नेम धरून तीर सोडीत होता.

तो तीर सोडीत होता व गंमत पहात होता. मध्येंच डोंगरापलीकडून दरींतून त्याला

आला! असल्या घोड्याचें वर्णन त्यापूर्वी त्यानें कधीं ऐकलें नव्हतें. त्या घोड्यावर बसल्यानंतर तो डोंगराकडे धांवला यावरून त्याच्या राहण्याची जागा त्या डोंगरा पलीकडच्या दरींत असणार. मी घरीं निघालों आणि हा घोडा माझ्याबरोबर आला तर एक गंमत करतां येईल. या विचित्र घोड्याला ब्रह्मपुराच्या बाजारांत विकून खूप पैसे मिळवितां येतील.

असा विचार करीत लखू झाडाखालीं उभा असतां तो शिंगी घोडा गाई बरोबर चरूं लागला. प्रथम गाई त्याला पाहून बुजल्या. पण तो निरुपद्रवी आहे हें कळल्यावर त्या शांतपणें चरूं लागल्या व तो घोडा पण चरूं लागला.

लखूला वाटलें, कदाचित संध्याकाळ पर्यंत येथें चरत राहून नंतर तो घोडा परत आपल्या दरीकडे जाईल. पण संध्याकाळ झाली तरी घोडा तेथून हलला नाहीं. लखूनें गाईंना घराकडे वळवल्यावर तो घोडासुद्धां त्यांच्याबरोबर लखूच्या झोपड्यापर्यंत आला.

लखूनें सर्व गुरांना एकत्र केलें आणि त्या घोड्याला पण त्यांच्याबरोबर सोडून दिलें. चारी बाजूला मोठें कुंपण होतें. म्हणून कोणी आंत जाणें किंवा आंतून बाहेर येणें शक्य नव्हतें.

या विचित्र घोड्याविषयीं वडिलांना सांगावें कीं सांगूं नये हें तो कांहींच ठरवूं शकला नाहीं व खाऊनपिऊन झोपीं गेला. सकाळीं त्याच्या बापानें त्याला उठविलें आणि म्हणाला—"अरे लखू उठ! पहा आपल्या गुरांना खावला एक रानटी जनावर आंत शिरलें आहे. चारी बाजूला कुंपण होतें आणि हें आंत कसें काय शिरलें बुवा!"



लखू उठून उभा राहिला. त्याला त्या शिंगी घोड्याची आठवण झाली. आपण रात्रीं ह्या घोड्या विषयीं कांहीं बोललों नाहीं. रात्रीं उठून तो घोडा काय करतो हें पाहिलें देखील नाहीं. तेव्हां काय नेम एक दोन गाईंना त्यानें मारून देखील टाकलें असेल. तो म्हणाला—"बाबा! आपल्या गाई सर्व आहेत कीं त्यांना ठार करून तें जनावर पळून देखील गेलें?"

"देवाच्या कृपेनें सर्व गाई जिवंत आहेत व मला पाहिल्याबरोबर तो पट्टेवाला वाघ कुंपणावरून उडी मारून पळून गेला." बाप म्हणाला. लखूच्या जिवांत जीव आला. म्हणाला—"बाबा! मी तुम्हांला रात्रीं सांगितलें नाहीं. तो पट्टेवाला वाघ नसून एक विचित्र घोडा आहे. त्याच्या अंगावर वाघासारखे पट्टे आहेत व कपाळावर एक शिंगपण आहे. काल आपल्या गाईंबरोबर तो चरत होता. मी गाईंना घेऊन घरीं आलों तेव्हां त्यांच्याबरोबर तो पण आला. मी त्याला निरुपद्रवी समजून कुंपणांत गाईंबरोबर सोडलें होतें."

"मी तें कांहीं पाहिलें नाहीं. मला तो वाघासारखा दिसला. त्या भयानक दरींत निरनिराळ्या तऱ्हेचीं विचित्र जनावरें आहेत. त्यांच्यापैकींच तो असावा. हीं जनावरें मायावी आहेत. त्यांच्या वाटेला कशाला तूं गेलास?" बाप त्याला रागावला.

"बाबा! अहो तें अगदीं निरुपद्रवी जनावर आहे. तें मायावी असतें तर मला ठार करणें त्याला अशक्य नव्हतें. पण तें गाईंच्यापेक्षां जास्त निरुपद्रवी व मुकें आहे." लखू म्हणाला.

"तूं काय मला सांगतोस! अरे, मी या डोळ्यांनीं पाहिला, तो वाघ होता. तुला घोडा वाटला. मला वाघ दिसला. तो मायावी

राक्षस देखील असेल." महादू म्हणाला. नंतर धार काढून तो ब्रह्मपुराकडे निघाला.

लखू उठला. तोंड धुऊन त्यानें शेणगोठा केला आणि गुरांना घेऊन रानांत निघाला. तो गुरांना कुरणांत चरायला सोडून निल्या-प्रमाणें धनुष्य बाण घेऊन झाडाला नेम मारूं लागला. तो त्या खेळांत गर्क होऊन गेला होता. कोण आलें कोण गेलें हें देखील त्याला कळलें नाहीं. घोड्याच्या टापाचा आवाज ऐकून व घोड्याचें खेंकाळणें ऐकून तो मागें वळून पाहूं लागला तर तो शिंगी घोडा अगदीं जवळ येऊन पोंचला होता. दोन पायावर उभा राहून खेंकाळून त्यानें लखूला जणूं सलामी दिली.

"अरे! पुन्हां आलास वाटतें तूं! मी तर पार विसरून गेलों होतों तुला?" लखू अगदीं जवळच्या ओळखीच्या माणसाशीं बोलावें अशा तऱ्हेनें बोलत होता.

त्या शिंगी घोड्यानें त्याला कळल्यासारखें डोकें हलविलें. लखूला आश्चर्य वाटलें. त्याच्या बापानें सांगितलेली गोष्ट त्याला आठवली. हा मायावी राक्षस तर नसेल. तो घोडा लखूच्या मनांतले विचार जणूंकांहीं त्याला कळले अशा तऱ्हेनें त्याच्याजवळ




आला व लखूला दुखापत होणार नाहीं इतक्या काळजीपूर्वक त्यानें आपल्या डोक्यानें लखूचें अंग खाजवलें. मी तुला वाटतें तसा मायावी नाहीं, एक इमानदार व स्वामिभक्त असा तुझा नोकर आहे, असें जणुं सुचवीत गाई चरत होत्या तिकडे तो निघून गेला आणि चरूं लागला.

लखूला त्या घोड्याची भीति वाटेनाशी झाली व तो पुन्हां खेळांत गुंगून गेला.

कांहीं वेळानें त्याला दुरून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. वळून पाहिलें, तर कित्येक स्वार येत असलेले त्याला दिसले.

जवळ आल्यावर त्यांच्यापैकीं एकजण आपल्या सरदाराला म्हणाला—"कोणी तरी एकलव्य दिसतो आहे, सरदार!"

"एकलव्य! मग पाहतोस काय? त्याचा अंगठा टाक कापून!" असें म्हणत एक स्वार लखूच्या जवळ येऊन उभा राहिला.

"ए! उभा रहा! ओळखलें नाहींस का ब्रह्मपुराच्या सरदारांना? उठून मुजरा करायचें सोडून असा बसून काय राहिलास? ऊठ!" तो स्वार दरडावून म्हणाला.

लखू उठून उभा राहिला व त्यानें लवून मुजरा केला. सरदारानें त्याचा धनुष्य-बाण व भाला लक्षपूर्वक पाहून त्याला विचारलें—"कोण रे तूं? तूं क्षत्रिय आहेस वाटतें! कोणाशीं युद्ध करण्यासाठीं ही धनुर्विद्या शिकतो आहेस?"

"मी! एका शेतकऱ्याचा मुलगा आहें! मला कोणाशीं युद्ध करण्याची काय गरज! वेळ जायला म्हणून मी धनुष्य बाण घेऊन बसतों. मी गुराखी आहें. त्या पहा माझ्या गाई!" लखू म्हणाला.

लखूनें ज्या गाईकडे बोट दाखविलें होतें तिकडे पहात तो स्वार म्हणाला—"सरदार! तो पहा, पंचकल्याणी घोडा!" असें म्हणत त्यानें त्या शिंगी घोड्याकडे बोट दाखविलें.

सरदार कांहीं वेळ त्या विचित्र घोड्याकडे पहात उभा राहिला व म्हणाला—"तो पंच-कल्याणी घोडा नाहीं. देवांचा घोडा पण नाहीं. तें तर एक रानटी गाढव दिसतें आहे. पण गाढव इतकें उंच नसतें. आणि याला तर शिंग आहे. असलें जनावर कोणी कधीं पाहिलें नसेल किंवा ऐकलें देखील नसेल! इकडे हाकलून घेऊन ये जा त्याला." त्यानें आपल्या सैनिकांना हुकूम केला.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# देवी कंटाळली

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर घेऊन पुन्हां स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"मला एक शंका येत आहे. कोणी तरी तुझी फसवणूक केली आहे. कारण मनुष्यस्वभाव असाच आहे. दुसऱ्याला फसविण्यांतच त्याला आनंद वाटतो. मनुष्याच्या या स्वभावासमोर देव देखील हात टेंकतो. खात्री पटावी म्हणून तुला मी एक गोष्ट सांगतों. ऐक." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

एका गांवांत एक देवीचें जुनें देऊळ होतें. देवीचा महिमा जवळ पासच्या सर्व खेड्या पाड्यांत लोकांना माहीत होता. म्हणून लोक देवीला नवस करीत.

त्या देवळाचा एक धर्मकर्ता होता. पिढ्यान् पिढ्या देवळाची देखरेख त्याच्या घरीं चाले होती. देवीच्या सेवेंत कधीं कांहीं



अंतर पडूं नये अशी प्रत्येक धर्मकर्त्यानें काळजी बाळगली. पुजारी नेमणें, नैवेद्य, प्रसाद वगैरेचा हिशोब ठेवणें सर्व धर्मकर्त्यालाच पहावें लागे.

एकदां रात्रीं धर्मकर्त्याला स्वप्नांत एक दृष्टांत झाला. देवी स्वप्नांत येऊन म्हणाली—"तूं जो पुजारी नेमला आहेस तो नीट पुजा करीत नाहीं. त्याला नोकरीवरून कमी कर व दुसऱ्या कोणाला तरी नेम."

धर्मकर्त्यानें विचार केला, स्वप्नांत दिसेल तें सत्य समजून वागलों तर लोक हंसतील. म्हणून त्यानें स्वप्नांत पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टीकडे दुर्लक्ष केलें. परंतु दुसऱ्या दिवशीं रात्रीं व पुन्हां तिसऱ्या दिवशीं रात्रीं देवीनें स्वप्नांत त्याला विचारलें—"मी तुला सांगितलें तसें तूं कां नाहीं केलेंस ?" आतां मात्र धर्मकर्त्याला वाटूं लागलें कीं देवीनें सांगितलें तें केलें पाहिजे. पुजारी मनोभावें पुजा करीत नाहीं हें त्याला देखील आढळून आलें. म्हणून त्यानें दुसऱ्या पुजाऱ्याला नेमलें.

पण कांहीं दिवसांनीं देवीनें पुन्हां स्वप्नांत येऊन दुसऱ्या पुजाऱ्याविरुद्ध पण तक्रार केली. म्हणाली—"तुझा पहिलाच पुजारी याच्या पेक्षां बरा होता. ह्याला काढून टाक व तिसऱ्याला नेम."

देवीनेंच आज्ञा केल्यावर ती मोडण्याची त्याची प्राज्ञा नव्हती. धर्मकर्त्यानें त्या दुसऱ्या पुजाऱ्याला पण काढून टाकलें व तिसऱ्या एकाला नेमलें. पण तो देखील तीन चार दिवसच काम करूं शकला असेल. देवीनें पुन्हां स्वप्नांत येऊन त्याच्या विरुद्ध पण तक्रार केली. म्हणाली—"अरे थोडी तरी भावना असावी कीं नाहीं माणसाला ? समोरचा नैवेद्य देखील मला उष्टा झाल्याशिवाय मिळेल तर शपथ ! अशा माणसाला पुजारी नेमल्याचें पाप लागेल तुला !"

देवीचा कोप झाला तर पुजारी व मीच काय, सारें गांवच रसातळाला जायचें. छेः छेः ! तसें नकोच. धर्मकर्त्यानें पुष्कळ विचारपूस करून स्वतःची खात्री करून घेतल्यावर एका पुजाऱ्याला नेमलें. त्यानें त्याला बजावून सांगितलें कीं, देवीच्या सेवेंत कांहीं कमतरता झाल्यास दंड होईल. परंतु त्याचा तो प्रयत्न देखील यशस्वी ठरला नाहीं. देवीनें पुन्हां कांहीं दिवसांनीं स्वप्नांत येऊन सांगितलें कीं पुजारी समोर ठेवलेले पैसे उचलून घेतो. नैवेद्य देखील दाखवीत नाहीं. हा पुजारी पहिल्या तिघां पेक्षांहि निरुपयोगी आहे."

अशा प्रकारें एका मागून एक आठ पुजारी बदलले. कोणी पुजाऱ्याची नोकरी करायलाच पुढें येईना.

जवळ पासच्या खेड्या पाड्यांत देखील दर चार आठ दिवसांनीं पुजाऱ्याची बदली होत असल्याचें ऐकून सर्वांना आश्चर्य वाटूं लागलें होतें. कोणी तें काम करायला पुढेंच येईना. धर्मकर्त्याच्या बोलण्यावर कोणाचा विश्वासच बसेना. लोक म्हणत, आम्ही आपलें घरदार सोडून तुमच्या गांवीं यायचें आणि तुम्हीं आम्हांला दोन दिवस



कामावर नेमून काढून टाकावयाचें. त्यापेक्षां आम्हांला ही नोकरीच नको.

धर्मकर्ता धर्मसंकटांत पडला. देवीच्या पुजेंत अंतर पडला तर देवीचा कोप होणार. कोणी पुजारी नेमावा तर तो देवीला पसंत पडत नाहीं. पुजारी न नेमावा तर पुजेला खंड पडल्याचें पाप लागणार.

त्यानें दोघां तिघांचा सल्ला घेतला तेव्हां सर्व म्हणाले—"बाबा रे ! तुला काय स्वप्न पडतें तें आम्ही डोळ्यांनीं पाहिलें नाहीं. तूं म्हणतोस तें खरें असूं शकेल कदाचित. पण या कलियुगांत देवाची पुजा होते

आहे एवढें पुरें आहे, एवढें समजून गप्प बैस म्हणजे झालें. आम्हांला वाटतें कीं, तूंच संशयीवृत्तीचा माणूस आहेस. देवीचें नांव आपलें उगीच."

या गोष्टीची चर्चा दूर दूरच्या गांवीं होऊं लागली. सर्व चकित होऊन ऐकत व म्हणत—"देवीच सांगते आहे तेव्हां खरें असेल! पण हा धर्मकर्ता देवीला कां नाहीं सांगून टाकीत कीं, असला पुजारी या युगांत मिळणें शक्य नाहीं."

शेवटीं एका हुशार माणसानें विचार केला, नशिबाची परीक्षा करून पहावी. पुजाऱ्याला चांगला पगार मिळेल व नैवद्यां-तला वांटापण मिळेल असें धर्मकर्त्यानें सांगितलें होतें. म्हणून तो एके दिवशीं त्या गांवीं गेला व धर्मकर्त्याला भेटून म्हणाला—"काल रात्रीं या गांवची देवी माझ्या स्वप्नांत आली व म्हणाली, 'अरे ऊठ! येऊन माझी पुजा कर. आतां पर्यंत आलेले पुजारी एकाहून एक लबाड निघाले. मी धर्मकर्त्याला कितीदां सांगितलें. पण त्यानें जितक्या पुजाऱ्यांना नेमलें ते एकाहून एक बस्ताद निघाले. म्हणून तूं स्वतःच धर्म-कर्त्याकडे जा आणि त्याला जाऊन सांग कीं मी स्वतः तुझी निवड केली आहे! देवीच्या आज्ञेनें तूं आला आहेस!"

तें ऐकून धर्मकर्त्याला फार आनंद झाला. सुटलों एकदाचा. देवीनें स्वतःच याची निवड केली आहे तेव्हां पुजा नीट होईल व देवीच्या मनाला त्रास होणार नाहीं. आपल्यावरचा भार हलका झाला.

धर्मकर्त्यानें त्या पुजाऱ्याला आदरपूर्वक देवळांत नेऊन त्याच्या हातांत सर्व किल्ल्या दिल्या. देवीचीं सर्व वस्त्रें व दागिने त्याला दाखविले व पुष्कळसे पैसे देऊन सर्व देऊळच त्याच्या स्वाधीन केलें.

पण तो पुजारी लबाड होता, नास्तिक होता. त्याला देवाची भीतीच नव्हती म्हणा ना! त्यानें देवीचे दागिने हळूहळू लांबविले व ते मोडून त्यानें नवीन दागिने करून आपल्या बायकोच्या अंगा-वर घातले. देवीच्या पैठण्या त्याची बायको नेसूं लागली व देवीच्या नशिबीं फाटकी फडकीं येऊं लागलीं. त्यानें पुजा अर्चा सर्व गुंडाळून ठेवली. नैवेद्य, देवापुढचे पैसे सर्व उचलून घरीं घेऊन जाऊं लागला. देवीसमोर दिवा सुद्धां लागायचा बंद झाला. गांवांतला कोणी भक्त येऊन दिवा लावी





तेव्हां दिवा. नाहीं तर देवीच्या गाभाऱ्यांत काळोख.

दिवसामागून दिवस व महिन्यामागून महिने गेले. देऊळ ओसाड पडलें. लोकांचें जाणें येणें बंद झालें. पण देवी कधीं स्वप्नांत आली नाहीं. तिनें त्या पुजाऱ्याविरुद्ध तक्रार केली नाहीं व त्याला काढून टाकायला आग्रह केला नाहीं.

गांवकरी येत व धर्मकर्त्याला म्हणत—"काय रे! तूं तर देवी स्वप्नांत येऊन पुजाऱ्याविरुद्ध तक्रार करते म्हणून सांगत होतास. एका मागून एक दहा जणांना तूं नेमलेंस आणि काढलेंस. आणि हा लबाड मात्र सर्व गडप करीत चालला आहे व तूं कांहींच बोलत नाहींस!"

धर्मकर्ता उत्तर देई—"देवीनेंच त्याची निवड केली आहे, त्याला आतां मी तरी काय करूं?"

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा! ज्या देवीनें दहा दहा वेळां धर्मकर्त्याच्या पाठीस लागून पुजाऱ्यांना काढविलें ती या नास्तिक पुजाऱ्याविरुद्ध एक चकार शब्द देखील कां बोलली नाहीं हें मला नाहीं कळलें. या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर आदळतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"त्यांत आश्चर्य काय? नव्या पुजाऱ्यानें देवीचे दागिने व वस्त्रें चोरी करायला सुरवात केल्यावर देवीनें त्या मूर्तींत राहण्यापेक्षां दूर निघून जायचें ठरविलें असावें."

राजाचें मौन अशा प्रकारें भंग होतांच वेताळ प्रेतांतून अदृश्य झाला पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.





# भुतांनीं लावलेलें लग्न

कायरोच्या सुलतानाच्या पदरीं दोन वजीर काम करीत असत. एकाचें नांव होतें शम्स उल दीन व दुसऱ्याचें नूर उल दीन. दोघांपैकीं एक खास सुलतानाबरोबर राही, तेव्हां दुसरा राज्याचीं इतर कामें पाही. दोघे पाळी पाळीनें हीं कामें करीत असत.

त्या दोघांना एका जागीं नोकरी मिळाली होती एवढेंच नव्हे, तर दोघांची मैत्रीपण फार जुनी होती. त्यांनीं लहानपणापासून विद्याभ्यास एकत्र केला होता. दोघे तासन् तास बसून त्यांच्या आयुष्यांतल्या सुख-दुःखाच्या गोष्टी करीत. एकदां दोघे आपल्या लग्नाविषयीं बोलत होते. दोघांनीं असें ठरविलें कीं लग्न करावें. नंतर त्यांनीं विचार केला कीं समजा एकाला मुलगी झाली व दुसऱ्याला मुलगा, तर त्यांचें लग्न करून देऊन मैत्री नात्यांत बदलेल असें कांहीं तरी करावें.

नूरनें विचारलें—"समज मला मुलगा झाला व तुला मुलगी, तर तूं मुलगी देण्यासाठीं माझ्या मुलाकडून हुंडा काय घेशील?"

"कां? कमीत कमी तीन हजार दीनार व तीन गांवें घेईन तेव्हां देईन आपली मुलगी!" शम्स थट्टे थट्टेंत म्हणाला.

"वा रे वा! आपल्या मुलीचा भाव असा वाढवला आहेस कीं जव्हेऱ्याकडलें जणुंकांहीं रत्नच! विकायचें नसलें म्हणजे व्यापारी काय वाटेल ती किंमत सांगतो. अरे तुझ्या मुलीला माझ्या मुलासारखा पति मिळाला तर तिचें तें केवढें भाग्य ठरेल! ही लटपट नाहीं चालायची माझ्या जवळ!" नूर म्हणाला.

तूं वजीर झालास म्हणून तुझा तोरा वाढलेला दिसतो आहे. पण मी तुला वजीर करायला सुलतानांना सांगितलें म्हणून तूं












वजीर झालास. नाहीं तर पडला असतास कोठेंतरी घोड्याची मालिश करीत. तुझ्या मुलानें आपल्या वजनाचें सोनें दिलें तरी माझी मुलगी तुझी सून म्हणून तुझ्या घरीं येणार नाहीं ?" शम्स रागानें म्हणाला.

थट्टेनें सुरू झालेलें बोलणें एकाएकीं एकेरीवर आलें. "प्राण गेला तरी तुझ्या मुलीशीं मी आपल्या मुलाचें लग्न होऊं देणार नाहीं." नूर म्हणाला.

"ठीक आहे, पाहतों. उद्यां सकाळीं मी सुलतानांबरोबर पिरॅमिडच्या बाजूला फिरायला जाणार आहें. परत आल्यावर तुझी वजीरी कोठवर राहते, पाहूं या." शम्स म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं सुलतान शम्सबरोबर नील नदीच्या काठानें पिरॅमिडच्या दिशेनें फिरावयास निघाले. नूरला रात्रभर झोंप लागली नाहीं. सकाळीं उठून त्यानें नमाज प्रार्थना केली. शम्स जें कांहीं म्हणाला तें त्याला भाल्यासारखें बोंचलें. त्यानें कायरो नगर सोडण्याचें मनाशीं ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं पहाटे नूर उठला व आपल्या नोकरांना म्हणाला—"मी तब्येत बरी नाहीं म्हणून बाहेर जात आहें. चार दिवसांनीं परत येईन. कोणी बरोबर येण्याची गरज नाहीं. मात्र एक चांगलें खेचर खोगीर वगैरे घालून तयार ठेवा. मी त्यावर बसून जाणार आहें." त्यानें एका पिशवींत एक हजार दीनार घेतले व प्रवासाला निघाला. त्यानें पुष्कळ दिवस प्रवास केला. कित्येक लहानमोठ्या गांवीं मुक्काम करीत तो बसऱ्याला पोंचला. तेथें तो एका धर्मशाळेंत उतरला. पण तो बसऱ्याला येऊन पोंचल्याचें त्याला देखील कळलें नाहीं. कारण तो राज्याच्या कामानें येई तेव्हां नोकर चाकर बरोबर असत. पण आतां त्याला तोंड लपवीत यावें लागलें होतें.



तो ज्या धर्मशाळेंत उतरला होता ती धर्मशाळा बसऱ्याच्या सुलतानाची होती व ठीक सुलतानाच्या महालासमोर होती. सुलतानानें दुरून खेचर पाहिलें व त्याची जात व खोगीर वगैरे पाहून विचारपूस करावयास सांगितलें कीं धर्मशाळेंत कोण उतरला आहे. कारण त्या जातीच्या खेचरावर बसून सामान्य मनुष्य येणें शक्य नव्हतें. त्या खेचराचा मालक कोणी तरी सुलतान नाहीं तर वजीर तरी असला पाहिजे.

चवकशी केल्यावर बसऱ्याच्या वरिष्ठ वजिराला कळलें कीं नूर कायरोचा वजीर आहे व जगाचा प्रवास करावयास निघाला आहे. तो स्वतः नूरला भेटायला आला. त्यानें त्याचें रूप व तरुण वय पाहून त्याला विचारलें—"मुला, तुझें वय तर अगदीं लहान दिसतें. या वयांत जगाची सफर करण्याची इच्छा तुझ्या मनांत उत्पन्न व्हावी याचें मला आश्चर्य वाटतें. चल, आमच्या घरीं. मला मुलगा नाहीं. आहे ती एकुलती एक मुलगी. तिच्याशीं तूं लग्नाला तयार झालास तर मी सुलतानांकडे जाऊन सांगेन कीं तूं माझा दूरचा नातेवाईक आहेस आणि माझ्या मुलीला मागणी घालण्यासाठीं आला आहेस. माझ्यानंतर सुलतान तुलाच वजीर नेमतील."

नूरनें कांहीं वेळ विचार केल्यावर म्हाताऱ्या वजिरानें केलेली सूचना मान्य केली.

म्हाताऱ्यानें बसऱ्याच्या सर्व श्रीमंत व्यापाऱ्यांना व मानकऱ्यांना आपल्या घरीं मेजवानी दिली व नूरची ओळख करून देत म्हणाला—"हा माझा दूरचा नातेवाईक आहे व याच्याशीं माझ्या मुलीचें लग्न ठरलें आहे."

पुढें वजिराच्या मुलीशीं नूरचें लग्न झालें.

तिकडे कायरोला शम्स, जें भांडण झालें होतें तें दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावर पार विसरून गेला. तो सुलतानाजवळ कांहीं एक बोलाला नाहीं.

घरीं परत आल्यावर त्यानें नूरच्या घरीं निरोप पाठविला तेव्हां त्याला कळलें कीं नूर पहाटे उठून कोठें तरी निघून गेला आहे. आपल्या मूर्खपणामुळें आपल्या जिवलग मित्राला विना कारण किती त्रास झाला याचा विचार करून त्याला वाईट वाटलें. त्यानें राज्यभर नूरचा शोध काढण्यासाठीं दूत पाठविले. पण नूर कोठें गेला आहे हें कोणाला कळलें नाहीं. शम्सला आपल्या चुकीबद्दल फार फार पश्चात्ताप वाटला.

कांहीं काळानें शम्सचें कायरोच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या मुलीशीं लग्न झालें. पण त्याला किंवा नूरला दोघांना कल्पना नव्हती कीं दोघांचीं लग्नें एकाच दिवशीं झालीं. कालांतरानें नूरला मुलगा आणि शम्सला मुलगी झाली. दोघे आपापल्या घरीं हळहळले.

नूरचा मुलगा गुणी व रूपवान निघाला. त्याचें नांव हसन होतें. त्याचा नामकरण संस्कार थाटामाटानें झाला. दुसऱ्या दिवशीं



बसऱ्याच्या सुलतानानें नूरला त्याच्या सासऱ्याच्या जागीं वजीर नेमलें. नूरचें ऐश्वर्य व मानमरातब वाढत गेला. हसन चार वर्षांचा असेल तेव्हां नूरचा सासरा वारला. नूरनें हसनच्या शिक्षणाचा भार एका वृद्ध मौलवीवर टाकला.

हसन हुशार निघाला. पंधरा वर्षांचा असतांनाच त्यानें सर्व विद्याभ्यास पुरा केला. तों पर्यंत तो घराबाहेर कधीं पडला नव्हता. शिक्षण संपल्यावर नूर आपल्या लाडक्या मुलाला बरोबर घेऊन सुलतानाचा आशीर्वाद घेण्यासाठीं गेला. हसनचें रूप व बुद्धिमत्ता पाहून सुलतान खूष झाला. इतक्या लहान वयांत त्यानें सर्व विद्या शिकून घेतलेल्या पाहून सुलतानाला आश्चर्य वाटलें. तो नूरला म्हणाला—"आपल्या मुलाला रोज दरबारांत घेऊन येत जा." सुलतानानें हसनला अनेक वस्तू उपहार म्हणून दिल्या. नंतर तो हसनला बोलावून आपल्या जवळच्या नातेवाइकासारखा त्याला वागवूं लागला.

हसन वीस बावीस वर्षांचा झाला असेल, नूर आजारी पडला. त्याचा आजार वाढतच गेला. औषधपाणी करून सुलतान देखील निराश झाला. आतां या आजारांतून उठणें





शक्य नाहीं असा विचार करून नूरनें आपल्या मुलाला बोलवून आपल्या मित्राची गोष्ट सांगितली व त्याच्या मुलीशीं तुझें लग्न करून द्यायचें ठरलें होतें हें देखील सांगितलें. नंतर एक कागद हसनला देत तो म्हणाला— "बाळा! ही चिठ्ठी नीट जपून ठेव. समज तुझ्या नशिबानें पाठ फिरविली तर तुझ्या वाडवडिलांचें शहर कायरो येथें जा. तेथला वजीर शम्स याला भेट व त्याला माझी आठवण करून दे. तेथें तुला कोणत्याहि गोष्टीची उणीव भासणार नाहीं. सुखानें राहतां येईल. हा कागद संभाळून ठेव."

हसननें तो कागद आपल्या पागोट्यांत नीट शिवून खुपसून ठेवून दिला. पुढें कांहीं दिवसांनीं नूर परलोकीं गेला. सुल्तान व इतर वजिरांनीं येऊन हसनला धीर दिला. म्हणाले—"या जगांत कोणी कायमचा राहिला आहे का? अल्लाचा हुकूम आला कीं प्रत्येकाला जावें लागतें." हसन दोन महिने घराच्याबाहेर पडला नाहीं. बाप वारल्याचें त्याला अत्यंत दुःख झालें. सुलतानाला भेटायला देखील गेला नाहीं.

सुलतानांची मेहरबानी आणि राग बदलायला किती वेळ लागतो. हसन कित्येक दिवस आला नाहीं याचा सुलतानाला मनस्वी राग आला. बाप वारल्यामुळें तो दुःखी आहे हें देखील सुलतान विसरून गेला. त्याला गर्व चढला असावा असा विचार करून सुलतानानें हसनला नोकरीवरून काढून टाकलें व त्याच्या जागेवर दुसऱ्याला वजीर नेमलें. पण एवढ्यानें देखील सुलतानाच्या मनाचें समाधान झालें नाहीं. त्यानें हसनचें घर त्याचा जमीन जुमला, सर्व सरकारजमा करून त्याला कैद करून समोर हजर करण्यास हुकूम सोडला.

परंतु सुलतानाच्या महालांत काम करणाऱ्या एका गुलामानें येऊन वेळींच हसनला सावध केलें. "एक क्षणभर देखील येथें राहलांत तर तुम्हांला आयुष्यभर बंदीवास भोगावा लागेल!" तो म्हणाला.

हसन लगेच वेश पालटून घराबाहेर पडला. लोक आपसांत बोलत होते— "सुलतानाचा स्वभाव तरी काय लहरी आहे! त्या बिचाऱ्यावर केवढा कहर केला आहे सुलतानांनीं!" नूर लोकांचें बोलणें ऐकत कबरस्तानाकडे निघाला व बापाच्या कबरी जवळ येऊन उभा राहिला. तेथें बसून तो बराच वेळ रडला. ती रात्र त्या कबरीजवळच घालवायची असें त्यानें मनाशीं ठरविलें. तो तेथें बसला असतां बसऱ्याचा एक व्यापारी कबरस्तानांत आला. हसनला तेथें रडत बसलेला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. सुलतानाच्या नवीन हुकुमाची त्याला माहिती नव्हती. म्हणून त्यानें विचारलें—"बाप वारल्यानंतर आणखी कांहीं विशेष झालें आहे का?"

"कांहीं नाहीं! मी दुपारीं जरा झोंपलों होतों. अब्बाजान स्वप्नांत येऊन रागावले. दोन महिने झाले कधीं येऊन कबरीवरचा केर पाचोळा झाडलास का? त्यांनीं मला विचारलें. मी उठून इकडे निघून आलों." हसन म्हणाला.



तो म्हणाला—"हें पहा, तुमच्याशीं व्यापाराच्या बाबतींत कांहीं बोलावें म्हणून मी म्हणत होतों. तुमच्या वडिलांशीं माझा व्यापाराचा संबंध होता. त्यांचीं जहाजें माल घेऊन परत येत आहेत. चार पांच दिवसांनीं बंदरांत लागतील. एका जहाजांतील पुरा माल मी घ्यायला तयार आहें आणि अगाऊ एक हजार दीनार पण द्यायला तयार आहें."

हसनला कांहींच माहिती नव्हतें. तो बोलणार तरी काय? कबूल झाला. त्यानें त्या व्यापाऱ्याकडून एक हजार दीनार घेतले



व त्याला एक रुका लिहून दिला कीं जें जहाज सर्वांत आधीं बंदरांत लागेल त्यावरचा माल त्या व्यापाऱ्याला मिळेल.

संध्याकाळ झाली. चंद्रोदय झाला. हसन तेथेंच कबरीवर झोंपला. थोड्या वेळानें एक पिशाचीण सर्व कबरी पहात हसन झोंपला होता तेथें आली. हसनच्या तोंडावर स्वच्छ चांदणें पडलें होतें. ती म्हणाली—"किती सुंदर आहे हा! चंद्र देखील याच्यासमोर फिका पडेल." ती थोडी पुढें गेली तेव्हां तिला एक भूत भेटलें. ती भुताला म्हणाली—"किती सुंदर आहे! किती सुंदर आहे!"

"किती सुंदर असला म्हणून काय झालें उद्यां एका कुबड्याशीं तिचें लग्न होणार!"

"काय बोलतो आहेस तूं? कोण कुबडा? आणि ती मुलगी कोण?" पिशाचिणीनें विचारलें.

"कायरो नगरीं शम्सची मुलगी सित्तल हसन आहे ना? काय पण सुरेख मुलगी आहे! तिचें लग्न एका कुबड्याशीं होणार आहे. आपापलें नशीब!" भूत म्हणालें.

"कायरोची गोष्ट तूं म्हणत आहेस होय! हा पहा मुलगा किती सुंदर आहे. अगदीं चंद्रासारखा!" पिशाचीण म्हणाली.

दोघांनीं झोंपलेल्या हसनला पाहिलें. भूत म्हणालें—"खरोखरच याच्याहून सुंदर मुलगा मी पाहिला नाहीं." थोड्यावेळानें तें भूत म्हणालें—"याच्याशीं शम्सच्या मुलीचें लग्न लावून दिलें तर!"

"ठीक आहे! चल याला घेऊन आपल्या पाठीवर कायरोला!" पिशाचीण म्हणाली.

भुतानें हसनला पाठीवर घेतलें व दोन्हीं भुतें कायरोला निघालीं.

सित्तल हसन लग्नाला झाल्याचें ऐकून कायरोच्या सुलतानानें स्वतः तिला मागणी घातली.

शम्स घाबरला. या थेरड्याशीं लग्न करून देऊन आपल्या मुलीच्या आयुष्याचें मातेरें झालेलें शम्सला कसें आवडणार? तो म्हणाला—"मालक! माफ करा! माझा बालमित्र नूर वीस बावीस वर्षांपासून कोठें तरी नाहींसा झाला आहे. आम्ही परस्परांना वचन दिलें आहे. माझ्या मुलीचें लग्न त्याच्या मुलाशींच होणार आहे. मी तें वचन कसें मोडूं? माझा मित्र बसऱ्याला आहे व त्याला एक मुलगा आहे हें मला नुकतेंच कळलें आहे. आपल्याशीं लग्न करायला एकीहून एक सुंदर मुलगी मिळेल!"

पण तें उत्तर ऐकून सुलतानाला राग आला. म्हणाला—"मूर्खा! तुझ्या मुलीला मी मागणी घातली हें तुला आपलें व तुझ्या मुलीचें भाग्य उदयाला आलें असें वाटायला पाहिजे होतें तुला. तूंच स्वत: मला विचारायला हवें होतेंस. पण मी मागणी घातल्यावर नकार देण्याची तुझी हिंमत कशी काय झाली? ठीक आहे, पहा तुझ्या डोळ्या देखत एका थेरड्या कुबड्याशीं तुझ्या लेकीचें लग्न लावून देतों. पाहतों कोण अडवितो."

एक म्हातारा कुबडा सुलतानाच्या घोड्याला मालिश करीत असे. सुलतानानें त्याला बोलावून त्याच्याशीं लग्न करून द्यायचें ठरविलें. तो म्हणाला—"मालक आतां या वयांत मी लग्न काय करणार?" पण सुलतानाची लहर.

सुलतानानें लग्नाची तयारी केली. जेथें लग्न करावयाचें ठरलें होतें त्या जागेच्या सभोंवती सुलतानानें पहारेकरी नेमले होते. कोणाला हि आंत प्रवेश करण्यास मज्जाव होता. लग्न झालें. व वधूला ज्या महालांत ठेवण्यांत आलें होतें त्या महालांत म्हाताऱ्या कुबड्याला पोंचविण्यांत आलें.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# उपकाराची फेड

**चो**रांना पकडून देण्यासाठीं म्हणून त्याला जें बक्षीस मिळालें होतें तें घेऊन भीमू आजीला आपला पराक्रम वर्णन करून सांगण्यासाठीं घरीं निघाला. आपल्याला इतकें मोठें धन मिळालेलें पाहून आजी चकितच होईल. पुढें कधीं आपल्याला मूर्ख अडाणी म्हणणार नाहीं. याच विचारांत गर्क होऊन तो रस्त्यानें चालत होता.

वाटेंत त्याला एक ओढा लागला. ओढ्याचें पाणी खोल होतें. ओढा पार करण्यासाठीं वर एक पूल होता. तो पूल एक तात्पुरता जुन्या फळ्यांचा होता. भीमू आनंदानें उड्या मारीत पुलावरून चालला होता. मधोमध पोंचल्याबरोबर पूल मोडला. अर्धा पूल पाण्यांत पडला व अर्धा वर अधांत्री राहून गेला. भीमू पण पाण्यांत खालीं पडणार होता. पण त्यानें वर लोंबकळत असलेलें पुलाचें टोक घट्ट धरून ठेवलें व त्याला धरून लोंबकळूं लागला.

त्याला वर चढतां येईना कीं खालीं उतरतां येईना. कर्म धर्म संयोगानें त्याच वेळीं तिकडून एक वारकरी टाळ कुटींत व आपली एकतारी वाजवीत त्या जागीं आला. त्यानें भीमूला त्या असहाय स्थितींत पाहिलें व तो त्याला मदत करण्यासाठीं धांवला.

तो भीमूला म्हणाला—"ए मुला! घाबरूं नकोस. जोरानें पकडून ठेव ती फळी. मी तुझे पाय धरून तुला अलगद खालीं उतरवितो."

तो वारकरी एका दगडावर उभा राहिला. तेथून त्याचा हात भीमूच्या पाया-पर्यंत पोंचत होता. दोन्ही पाय धरून त्यानें ओढले असते तर भीमू किनाऱ्यावर येऊन



पडला असता व त्याला विशेष लागलें नसतें. त्यानें भीमूला पाय जरा पुढें करायला सांगितलें. भीमूनें तसें केल्यावर त्यानें त्याचे पाय धरले. पण तो पाय धरून ओढणार तेवढ्यांत भीमूला गुदगुल्या होऊं लागल्या व त्यानें स्वतःचे पाय ओढले. वारकऱ्यानें भीमूचे पाय घट्ट धरले होते म्हणून भीमूनें पाय ओढल्याबरोबर त्याचे पाय दगडावरून सुटले व तो भीमूचे पाय धरून लोंबकळूं लागला.

तो ओरडला—"तुला सोडवायला मी निघालों आणि स्वतःच फंसलों! फळी घट्ट धरून ठेवलीस तर ठीक, नाहीं तर दोघांना कपाळमोक्ष मिळणार!"

भीमू खालीं वांकून वारकऱ्याची एकतारी पाहून विचारूं लागला—"तुझ्या गळ्यांत तो भोपळा व काठी कसली आहे?"

"ती एकतारी आहे!" वारकरी म्हणाला.

"आणि ती दोरी व त्या वाट्या कसल्या?" भीमूनें विचारलें.

"अरे! त्यांना टाळ म्हणतात!" वारकरी म्हणाला.

"गाणें म्हण बघूं एक!" भीमूनें त्या परिस्थितींतहि वारकऱ्याला विनंति केली.

"कर्म माझें! अरे आतां कसलें गाणें?" वारकरी म्हणाला.

"गाणें म्हणतोस कीं सोडूं हात?" भीमूनें धमकी देत विचारलें.

"नको बाबा! म्हणतों गाणें!" असें सांगत तो गाणें म्हणूं लागला.

"पण टाळ वाजवीत नाहींस ते!" भीमूनें विचारलें.

"तुझे पाय धरले आहेत ना मी दोन्ही हातांनीं? मग वाजवूं कसा?" त्यानें विचारलें.

"तुझा हात रिकामा नसेल तर मला दे!" असें म्हणत भीमूनें एक हात सोडून पुढें केला. पण एका हातानें दोघांचें वजन उचलणें शक्य नव्हतें म्हणून हात सुटले व दोघे पाण्यांत पडले. परंतु बुडाले नाहींत. वारकऱ्याला थोडें लागलें. कारण भीमू त्याच्यावरच आदळला होता.

भीमूनें हात दिल्यावर वारकरी काठावर आला. गुडघे मोडले बघ माझे! दोन्ही गुडघ्यांना थोडें तेल चोळ!" वारकरी म्हणाला. पण भीमूजवळ किंवा वारकऱ्या-जवळ तेल कोठें होतें. त्यानें भीमूला दोन आणे व एक तपेली देऊन शेजारच्या



गांवांतून तेल विकत घेऊन यायला सांगितलें.

भीमू त्या प्रमाणें गांवांत बाजारांतून तेल घेऊन यायला गेला.

दुकानदारानें तपेलींत तेल घातलें व म्हणाला—"थोडें तेल उरलें आहे. बाटली किंवा दुसरें भांडें असेल तर दे. त्यांत घालून देतों."

भीमूनें तपेली जवळ घेऊन पाहिली. थोडी रिकामी दिसली. म्हणाला—"तपेलींत थोडी जागा अजून आहे ना? घाला उरलेलें त्यांतच. थोड्याशा तेलाकरितां दुसरी बाटली कोठें मिळणार?" त्यानें तपेलींतलें तेल थोडें खालीं ओतलें व तपेलींतच उरलेलें तेल घालायला सांगितलें.

दुकानदारानें मूर्ख वल्ली दिसते आहे असा विचार करून तेल घेतलें. भीमू परत निघाला.

वाटेंत त्यानें तपेली दोन तीनदां गर्रकन फिरवून पाहिली. तेल सांडत नाहीं हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. मग हळू हळू फिरवून पाहूं लागला तर तेल सांडून गेलें. तळाला थोडें उरलें तें घेऊन आला. वारकन्यानें त्याला विचारलें—"कायरे! दोन आण्याचें तेल एवढेंच का?"

"तसें नव्हे हो! मी दोन तीनदां तपेली फिरवून पाहिली व तेल सांडत नाहीं हें पाहून मला गंमत वाटली. मग असे हळूं धरून पाहिलें, तेल सांडतें का तें." असें सांगत त्यानें तपेली उलटी धरली. त्या बरोबर तळाला जें तेल उरलें होतें तें देखील सांडून गेलें.

वारकन्यानें "कर्म माझें!" असें म्हणत भीमूला निरोप दिला. "कैलास उपकार तो पुरे!" त्यानें जमीनीवर सांडलेलें तेल घेऊन तेंच थोडें चोळलें.

भीमू आनंदानें उड्या मारीत घरीं निघाला.







# शिव साक्षी

जेजुरी जवळच एका गांवीं खंडू नांवाचा एक रामोशी रहात असे. चोरी ही त्याची पैतृक वृत्ति म्हणजे धंदा होता.

खंडूला एक बहीण होती. तिला एक मुलगा होता. त्याचें नांव शिवू. त्याला त्याच्या आईनें मामाच्या घरीं पाठविलें होतें. मामाकडून त्या धंद्यांत चांगलें शिक्षण मिळेल हा हेतू होता.

शिवू आपल्या धंद्यांत स्वतःच कमी नव्हता. मामाच्या घरीं गेल्यावर चोर विद्येत तो प्रवीण झाला, मामाच्याहून कांकणभर जास्तच. त्याचा मामा त्याला नेहमीं बरोबर घेऊन जाई. भाचा नांव काढील असें वाटे त्याला.

एकदां खंडू शिवूला बरोबर घेऊन एका गांवीं चोरी करायला गेला. ते गांवांत शिरले तेव्हां चांगला काळोख पडला होता. त्या गांवचा पाटील श्रीमंत होता. म्हणून त्याच्या घरींच चोरी करायचें खंडूनें ठरविलें.

पाटलाला मूलबाळ कांहीं नव्हतें. दोघें नवरा-बायको देव-धर्म व व्रतें-अनुष्ठानें करीत. त्यांतच त्यांचा सर्व दिवस जाई. पाटील उशिरां रात्रीं घरीं परत येत असे. म्हणून खंडूनें तो परत येण्यापूर्वीच सर्व काम उरकून घ्यायचें ठरविलें. तो व शिवू पाटलाच्या घरांत शिरले.

"मामा, मला भूक लागली आहे. मी आंत कांहीं खायला आहे का, पहिल्यानें पाहून येतो." असें सांगून शिवू सैंपाकघरांत शिरला.

"मी वर माडीवर जातों. वर जें कांहीं मिळेल तें खालीं घेऊन येतों. माझें काम झाल्यावर मी बाहेर आंब्याच्या झाडाखालीं तुझी येऊन वाट पाहीन. तूं लवकर आलास



तर माझी वाट पहा. आटप!" असें सांगून खंडू माडीवर गेला.

दोघे परसाच्या भिंतीवरून उडी मारून आंत शिरले. बाहेरचा दरवाजा आंतून बंद होता. तो त्यांनीं उघडला नाहीं. कोणी आलें तर कळेल. असा विचार करून त्यांनीं आंतून दरवाजा बंदच राहूं दिला.

शिवू सैंपाकघरांत अगदीं मांजराच्या पावलांनीं शिरला. पाटलाची बायको नवऱ्याची वाट पहात जमिनीवर आडवी झाली ती छान झोंपी गेली. सैंपाकघरांतच एका बाजूला देव घर होतें. पाटील शंकराचा भक्त होता. सर्व पदार्थ देवघराजवळ आणून ठेवले होते. छान वास सुटला होता. शिवूच्या तोंडाला पाणी सुटलें.

त्या दिवशीं सोमवार होता. नवराबायको दिवसभर उपास करीत असत. रात्रीं जेवणाची खूप तयारी करून नवऱ्याची वाट पहात बिचारी झोंपी गेली होती. थोडा थकवा आल्यानें डोळा लागला. नाहींतर नवऱ्याची वाट पहात ती रात्रभर जागे.

शिवूनें प्रथम खिरीवर हात मारला. पुऱ्या फस्त केल्या. भूक लागली होती व पाटलीण बाईनें पंचपक्वान्नाचें जेवण तयार करून ठेवल्यावर त्याचा समयोचित मान न करणें त्याला बरें वाटलें नाहीं. त्यानें पाटलीण बाईंचे मनांतल्या मनांत आभार मानले व देवाला नमस्कार केला.

शिवूचा अंतरात्मा शांत झाला. आतां उचलून नेण्यासारखें काय आहे हें पहात होता. पण तेवढ्यांत दरवाज्यावर थाप ऐकून तो दचकला. परसांतून बाहेर उडी मारून जायला भिंत उंच होती. म्हणून सरळ दरवाज्यानेंच बाहेर जाण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. तो कांहीं वेळ बाजूला दडून उभा राहिला व नंतर माळ्यावर जाऊन बसला.

पाटलांनी जोर जोरानें दरवाजा ठोठावला. पाटलीण झोंपली होती म्हणून नुसती दरवाज्यावरची थाप ऐकून उठली नाहीं. पण दरवाजा ठोठावल्यावर घाबरून उठली व कडी काढून दरवाजा उघडला.

पाटलाला कडकडून भूक लागली होती. पाय धुवून सरळ सैंपाकघरांत आला. पण तेथें बायकोला नुसती उभी पाहून त्याला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"वाढ ना! उशीर का?"

"मी इतका वेळ वाट पहात होतें. खीर-पुरी करून ठेवली होती देवासमोर. पण आतां पाहतें तर पुरी-खीर कांहीं नाहीं. काय झालें कोणास ठाऊक?" बायको म्हणाली.

पाटील भुकेनें तापला होता. त्याला बायकोचें तें सरळ बोलणें चतुराई असेल असें वाटलें. म्हणाला—"काय होणार? भूक लागली असेल आणि स्वतःच खाऊन टाकलें असशील! आणखी कोण येऊन खाणार!"

तिनें इतक्या प्रेमानें सैंपाक केला होता व नवऱ्याचें तें बोलणें ऐकून तिला मनस्वी राग आला. म्हणाली—"बाई बाई! काय हें बोलणें! मालकांचें जेवण झाल्याशिवाय मी



कधीं अन्नाला हात तरी लावला आहे का? मी खाल्लें कीं आणखी कोणी याला तो शंकर शिव साक्षी!"

"या सर्व गप्पा माझ्याजवळ नाहीं चालणार? तूं नाहीं खाल्लेंस तर कोण आला ग खायला येथें!" पाटील काठी घेऊन पत्नीला मारायला धांवला.

शिवू हें सर्व माळ्यावर बसून पहात होता. त्याला पाटलाचा राग आला. तो माळ्यावरून एकदम उडी मारून खालीं आला आणि म्हणाला—"पाटील साहेब! पाटलीण बाईनीं शिव साक्षी खरें सांगितलें

आहे. मीच शिवू म्हणजे तुमचा देव शिव. मीच खाल्लें तें. देवाला पावलें. त्या बिचारीला मारायला काय धांवतां !"

इतक्यांत बाहेरून आवाज ऐकूं आला– "शिवू !"

"आलों !" असें म्हणत शिवू बाहेर निघून गेला.

सर्व प्रसंग अगदीं अनपेक्षितपणें घडल्यामुळें पाटलाला काय करावें हें सुचलें नाहीं व शिवूचें काम भागलें.

खंडूनें माडी हुडकून काढली. पण त्याला कांहीं नेण्यासारखें हातीं लागलें नाहीं. थोडा वेळ त्यानें झाडाखालीं भाच्याची वाट पाहिली. थोड्या वेळानें त्याला सैंपाकघरांत कोणी जोरजोरानें बोलत असल्याचा भास झाला. जवळ जाऊन ऐकलें तेव्हां त्याला शिवूचा आवाज देखील ऐकूं आला. त्याला घर मालकानें पकडलें असावें असें समजून त्यानें हळूच हांक मारली. पण शिवूनें आलों म्हणून आंतूनच उत्तर दिलेलें ऐकून त्याला आश्चर्य वाटलें.

बाहेर दोघे भेटले व गांवीं परत निघाले. वाटेंत शिवूनें घडलेलें वृत्त सांगितलें. खंडू म्हणाला–"अरे चोरा ! चोरी तर केलीसच आणि वर मी चोरी केली म्हणून सांगून पण आलास. अट्टल चोर निघालास बुवा !"

शिवू निघून गेल्यावर कांहीं क्षणांनंतर नवराबायको भानावर आलीं. बायको म्हणाली–"अहो, बघतां काय ? तोच चोर आहे ! धरा त्याला."

पाटील काठी घेऊन बाहेर धांवला. पण तोंपर्यंत शिवू व खंडू दूर निघून गेले होते व काळोखांत दिसत देखील नव्हते.

त्यानंतर पाटलीण बाईंनीं पुन्हां भाकऱ्या बडवल्या व तो सोमवार भाकरीवरच सोडावा लागला.



# एवढाच फरक

[स्वामी रामतीर्थ कथा]

दोघां भावांचें आपसांत भांडण झालें. ते न्यायाधिशाकडे न्याय निवाडा करून घेण्यासाठीं गेले. दोघां पैकीं एक लक्षाधीश होता व दुसरा अगदीं गरीब.

न्यायाधिशानें त्यांना विचारलें– "तुम्ही दोघे सख्खे भाऊ आहां. मग एक लक्षाधीश व दुसरा इतका गरीब कां झाला कीं त्याला दोन वेळचें जेवण देखील मिळण्याची मारमार व्हावी ?"

श्रीमंत भाऊ हात जोडून म्हणाला– "आतां कारण मी काय सांगूं ? पांच वर्षांपूर्वी आम्ही आमच्या वडिलांची इस्टेट वांटून घेतली. सारखे वांटे करून घेतले. प्रत्येकाला पन्नास हजार रुपये मिळाले. माझ्या भावानें पन्नास हजार रुपये पाहून विचार केला. आपण श्रीमंत, तो नोकरांना सांगे, "तुम्ही जाऊन अमुक काम करा." माझ्याकडे सुद्धां नोकर होते व आजहि आहेत. मी त्यांना कामें देत नाहीं असें नाहीं. मी म्हणतों "चला आपण अमुक काम करूं या ! मी कधीं 'जा करा' असें सांगितलें नाहीं "या करूं या" असेंच सांगितलें व त्यांच्याबरोबर काम करीत आलों. एवढाच फरक आहे. दुसरें कांहीं कारण नाहीं. मला आणखी कांहीं सांगावयाचें नाहीं."





# सत्यमेव जयते

सत्यशील नवनीतपुराचा राजा होता. आपल्या सत्यशील व्यवहारानें त्यानें स्वतःचें नांव सार्थक केलें. ‘जिथें धर्म तिथें जय’! धर्माचा पाया सत्यावर उभारलेला असतो, या गोष्टीवर त्याचा अढळ विश्वास होता. म्हणूनच लक्ष्मी, कीर्ति, पवित्रता व धर्म त्याच्या घरीं सतत वास करीत.

आपल्या राज्याचें वैभव वाढावें, व्यापाराची भरभराट व्हावी व सुख आणि शांति नांदावी या हेतूनें राजद्वारासमोर उजाडतांच कोणतीहि वस्तु विकावयास आली तर राजा स्वतः विकत घेई. यामुळें राजानें जो माल विकत घेतला तो चांगला, असें समजून लोक तो विकत घेऊं लागले. राजाकडे जो माल नेऊन विकायचा तो उत्तम असावा म्हणून उत्तम माल तयार होऊं लागला. अशाप्रकारें देशांत अन्नधान्य वाढलें, नवनवीन उद्योग धंद्यांना प्रोत्साहन मिळालें, व्यापार वाढला आणि प्रजा सुखी झाली.

राजधानींत एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याचें दारिद्य हात धुऊन त्याच्या पाठीस लागलें होतें. त्यानें विचार केला माझें हें दारिद्य विकायला काढलें तर आयुष्य भराची कटकट नाहींशी होईल. या निमित्तानें राजाला कळेल कीं त्याच्या राज्यांत माझ्यासारखे गरीब दरिद्र देखील आहेत. त्यानें त्याच्याकडे जे जुने फाटके कपडे घोंगडी, घावळी वगैरे होती सर्वांचें एक गाठोडें बांधून तें विकायला निघाला. राजद्वारासमोर उभा राहून “दारिद्य घ्या, दारिद्य!” असा ओरडूं लागला.

राजानें त्याला बोलावून आणायला सांगितलें. राजानें त्याला विचारलें—“तुम्ही काय विकतां?” तो म्हणाला—“माझ्याजवळ जें कांहीं आहे तें सर्व मी विकत आहें.” असें सांगून त्यानें आपलें गाठोडें सोडलें.

“हें सर्व काय?” राजानें विचारलें.

“कां? माझें दारिद्य!” ब्राह्मण म्हणाला.

राजा क्षणभर विचारांत पडला. त्यानें आपला धर्म ओळखला. ब्राह्मणाला जास्त वेळ वाट पहात बसावें लागलें नाहीं. राजानें विचारलें “ह्याची काय किंमत?”

ब्राह्मण म्हणाला—“पांचशें सुवर्णमुद्रा!” राजानें विचार केला कीं मी या ब्राह्मणाला जर पांचशें सुवर्णमुद्रा दिल्या तर त्याचें दारिद्य तर जाईलच, त्या भांडवलाचा उपयोग करून ब्राह्मणाला थोडी फार मिळकत देखील होईल. म्हणून त्यानें ब्राह्मणाला पांचशें सुवर्णमुद्रा खजिन्यांतून देवविल्या व त्या ब्राह्मणाचें ‘दारिद्य’ विकत घेऊन खजिन्यांत ठेवायला सांगितलें.

रात्रीं राजा झोंपल्यावर त्याला स्वप्नांत एक देवी घराबाहेर निघून जात असलेली दिसली. राजानें तिला विचारलें—“बाई कोण तुम्ही? माझ्या घरीं केव्हां आलांत व कोठें निघालांत?”



“माझें नांव लक्ष्मी आजपर्यंत मी तुझ्या घरांत सुखासमाधानानें रहात आलें. पण या पुढें येथें माझा निभाव लागणें शक्य नाहीं. कारण तूं दारिद्य स्वतः विकत घेऊन घरांत बाळगलें आहेस. तेव्हां मी कशी राहूं?” ती देवी म्हणाली.

“तुझी मर्जी!” सत्यशील राजा म्हणाला.

लक्ष्मी निघून गेल्यावर राजाला आणखी एक देवी बाहेर जात असलेली पाहून राजानें तिला विचारलें.

ती म्हणाली—“माझें नांव कीर्ति! लक्ष्मी निघून गेल्यावर मला या घरांत कसा काय थारा मिळणार म्हणून मी देखील जात

आहें. लक्ष्मी होती म्हणून मला तुझ्या घरांत राहतां आलें."

लक्ष्मी व कीर्तीच्या पाठोपाठ राजनीति पण निघाली राजानें तिला अडविलें नाहीं.

नंतर न्याय गेला, धर्म गेला व राजा विचार करूं लागला ज्यांची मी आजवर मनोभावें सेवा केली तीं सर्व मला सोडून निघून जात आहेत. पण तो तिळमात्र देखील मनांत कचरला नाहीं. तितक्यांत एक देव दिसला. राजानें त्याला विचारलें—"कोण रे बाबा तूं? तुम्ही सर्व माझ्यावर रागावून कां निघालांत?" तो देव म्हणाला—"माझें नांव सत्य! धन, मान, न्याय धर्म सर्व निघून गेल्यावर तूं माझा आदर करणार नाहींस असा विचार करून मीच निघालों आहें."

"तूं राहिलास तरी पुरे. त्यांतच मी समाधान मानून स्वस्थ राहण्याचें ठरविलें व इतरांना जाऊं दिलें. पण तूंच निघून गेलास तर मला हें जिणें व्यर्थ व भार रूप भासेल. मी म्हणत आहें त्यांत सत्याचा अंश किती आहे हें प्रत्यक्ष सत्याजवळ मी काय सांगूं?" असें सांगून राजा आकाशाकडे पहात बसून राहिला.

"तुझ्याकडे राहल्यानें माझा कधीं अनादर झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं म्हणून मी येथेंच रहावयाचें ठरविलें आहे. असें सांगून सत्य परतलें.

थोड्या वेळानें राजाला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं कांहीं वेळापूर्वी निघून गेलेले देव व देवी घरांत येत आहेत. राजानें त्यांना "आतां परत कां आलांत," असें विचारलें. त्यांनीं उत्तर दिलें—"जेथें सत्य वास करतें तेथें आम्ही राहतों. पाठोपाठ सत्य न आलेलें पाहून आम्हांलाच परतावें लागलें."







# अवीक्षित

एक राजा होता. त्याचें नांव करंध. त्याचें

वीर्यचंद्र नांवाच्या राजाच्या मुलीशीं लग्न झालें. मुलीचें नांव वीरांगना होतें. त्यांना एक मुलगा झाला. मुलाची जन्मकुंडली पाहून ज्योतिष्यांनीं उत्तम नक्षत्रावर मुलगा झाल्याबद्दल राजाचें अभिनंदन केलें. राजानें आपल्या मुलाचें नांव अवीक्षित असें ठेवलें.

अवीक्षित मोठा झाला. त्यानें सर्व विद्या शिकून त्यांत प्राविण्य मिळविलें. जवळपासच्या राज्यांत कोठें स्वयंवर असल्याचें कळलें कीं तो जात असे. प्रत्येक राजकन्या त्याचीच निवड करी. त्यानें अनुक्रमें गौरी, सुभद्रा, लीलावती, कुमुद्वती वगैरे एकंदर सात राजकन्यांशीं विवाह केला.

पुढें विशाला नामक राजकन्येच्या स्वयंवराची तयारी सुरू झाल्याचें ऐकून अवीक्षित तिच्या स्वयंवरांत भाग घेण्यासाठीं आला. अनेक राजकुमार पण हजर होते. अवीक्षित त्यांच्या डोळ्यांत सलत होता. विशाला देखील याच्याशींच विवाह करणार असें त्यांना वाटलें. म्हणून त्यांनीं अवीक्षितला एकटा पाहून त्याला चारी बाजूंनीं घेरलें व कैद केलें. विशालानें स्वतः डोळ्यांनीं तें दृश्य पाहिलें. तिनें त्या राजकुमारांपैकीं एकाशीं देखील विवाह न करण्याचें सर्वांना कळविलें.

करंधला कळलें कीं त्याच्या मुलाला राजकुमारांनीं कैद केलें आहे. तो एक मोठें सैन्य घेऊन त्यांच्यावर चालून आला. सर्व राजकुमारांनीं आपापलीं सैन्यें एकत्र करून करंधशीं युद्ध केलें. पण त्या युद्धांत करंधनें त्यांचा विमोड केला व अवीक्षितला सोडविलें. राजकन्या विशाला त्याच्याशीं



लग्नास तयार झाली. पण अवीक्षित लग्नास तयार झाला नाहीं. विशालावर त्याचें प्रेम नव्हतें असें नाहीं. पण तिच्यासमोर त्याच्या प्रतिद्वंद्वी राजकुमारांनीं त्याला कैद केलें होतें व तिच्या बापानें त्या राजकुमारांना तो अन्याय करूं दिला होता. म्हणून अवीक्षितनें तिच्याशीं लग्न करण्याचें नाकारलें. शेवटीं पितापुत्र आपल्या राजधानींत परतले.

अवीक्षितचा हट्ट एवढ्यावर थांबला नाहीं. त्यानें घरीं आल्यावर ब्रह्मचर्यव्रत घेण्याचें ठरविलें. तिकडे विशालानें पण अवीक्षित शिवाय इतर कोणाशीं लग्न करण्याचें कबूल केलें नाहीं. या जन्मीं नाहीं तर पुढल्या जन्मीं तरी त्याच्याशीं विवाह व्हावा या हेतूनें तप करण्याचें ठरवून व आपल्या आई बापांचा निरोप घेऊन ती रानांत निघून गेली.

करंधचें उतारवय झालें होतें. अवीक्षित हा एकुलता एक मुलगा त्याला होता. त्यानें लग्नें झाली असूनहि ब्रह्मचर्य व्रत घेतलें होतें. वंश खुंटतो कीं काय ही भीति त्याला वाटूं लागली. त्याची राणी वीरांगना हिला एक युक्ति सुचली. ती आपल्या मुलाला म्हणाली—"युवराज, मी 'किमिच्छत' व्रत घेण्याचें ठरविलें आहे. तें व्रत चालू असतां कोणी कांहीं मागितलें तर तूं तें दान कर. नाहीं तर माझें व्रत मोडेल." अवीक्षितनें तें कबूल केलें. तिनें व्रत सुरू केल्यावर राज्याच्या मुख्य पुरोहितानें धार्मिक विधि उरकून घोषणा केली कीं ज्याला जें कांहीं मागावयाचें असेल त्यानें तें युवराज अवीक्षित याच्याकडे मागून घ्यावें.

तेव्हां करंध अवीक्षितकडे आला व म्हणाला—"बाळ, मला एक नातू हवा आहे!" अवीक्षितनें आपल्या आईला वचन दिलें होतें. म्हणून त्याला आपलें ब्रह्मचर्य सोडावें लागलें.



पुढें कांहीं दिवसांनीं तो रानांत शिकारीस गेला असतां त्याला तेथें एका स्त्रीची किंकाळी ऐकूं आली—"वांचवा! धांवा!" अवीक्षितला आश्चर्य वाटलें. त्यानें जवळ जाऊन पाहिलें तर एका तपस्विनीला एका राक्षसानें धरलें होतें. अवीक्षितनें त्या राक्षसाचा वध करून त्या तपस्विनीला सोडविलें. त्याच वेळीं तेथें पुष्पवृष्टी झाली व तीन देव प्रगट झाले. त्यांनीं अवीक्षितचें अभिनंदन करून त्याला त्या तपस्विनीशीं विवाह करण्यास सांगितलें. तेव्हां अवीक्षित म्हणाला—"मी विशालाशीं लग्न करण्याचें ठरविलें आहें. तिच्या शिवाय मी इतर कोणाशीं लग्न करणार नाहीं."

देव म्हणाले—"हीच तर विशाला आहे!" तें ऐकून त्यानें त्या तपस्विनीकडे जास्त लक्षपूर्वक पाहिलें. त्यानें विशालाला ओळखलें. तो विशाला बरोबर राजधानीस परत येत असतां वाटेंत एका गंधर्वराजाची गांठ पडली. गंधर्वराजा म्हणाला—"ही विशाला पूर्व जन्मीं माझी मुलगी होती. तुम्ही दोघांनीं माझ्या राजधानींत यावें."

दोघें गंधर्वराजा बरोबर गंधर्व लोकांत गेलीं व कांहीं काळ गंधर्व लोकांतच राहिलीं.

कालक्रमानें विशालाला एक मुलगा झाला. त्याचें नांव दोघांनीं मरुत असें ठेवलें. नंतर अवीक्षित बायको व मुलासह स्वदेशीं परत आला.

एके दिवशीं करंध आपल्या मुलाला म्हणाला—"आतां मी वानप्रस्थाश्रम घ्यावयाचें ठरविलें आहे. तुझा राज्याभिषेक करून मी जाणार आहें."

पण अवीक्षित म्हणाला—"बाबा! मला राजकुमारांनीं कैद करून अपमानित केलें आहे. मी राज्याभिषेकास योग्य नाहीं." अवीक्षितनें आपला हट्ट सोडला नाहीं.

पण तो म्हणाला—"पाहिजे तर तुम्ही माझा मुलगा मरुत याचा राज्याभिषेक करून त्याच्यावर राज्यभार टाकावा."

म्हाताऱ्यानें नाइलाजानें मरुतचा राज्याभिषेक केला व वानप्रस्थाश्रम स्वीकारला. पुढें कांहीं दिवसांनीं अवीक्षितनें देखील वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला.

मरुत राज्य करीत असतां राज्यांत नाग वाढलेले त्याला आढळून आले. ऋषीमुनी त्रस्त होऊन रक्षणासाठीं राजाकडे धांवले. मरुतनें नागलोकावर संवर्तास्त्राचा प्रयोग केला. त्यामुळें नागजातीचा नाश होऊं लागला. त्यांनीं येऊन विशालाकडे तक्रार करून तो संहार थांबविण्यास सांगितलें.

लग्नापूर्वी ती तपश्चर्या करीत असतां एकदां ती गंगेवर आंघोळीला गेली होती. तेव्हां नागराज तिला भेटला व आदरपूर्वक आपल्या देशांत बोलावून घेऊन गेला. त्यानें आतिथ्य सत्कार उत्तम केला होता. म्हणून विशालानें त्यांचें रक्षक करण्याचें वचन दिलें. तिनें रानांत जाऊन अवीक्षितला विनंति केली कीं त्यानें मरुतला बोलावून हा नागजातीचा संहार थांबवावा. अवीक्षितनें मरुतला बोलावून तो संहार थांबविण्यास सांगितलें. परंतु मरुत हट्टाला पेटला होता. त्यानें तें कबूल केलें नाहीं.

त्यावर अवीक्षितला राग आला व तो मुलाशीं युद्ध करण्यास तयार झाला. तें ऐकून ऋषी व मुनी आले व म्हणाले—"आतां आम्हांला नागांचें भय राहिलें नाहीं व त्यांना देखील मृत्यु भय राहिलें नाहीं." त्यांनीं पिता पुत्रांचें युद्ध थांबविलें.

मरुतनें आपल्या अविनीत वागणुकी बद्दल पित्याजवळ माफी मागितली.





# अयोध्याकांड

अयोध्येहून रामलक्ष्मण सीतेसह निघाले तें करुण दृश्य हृदयाला विदीर्ण करणारें होतें. सारी अयोध्या नगरी रडत होती. दुतर्फा लोक उभे होते. कांहीं लोक रथामागून धांवत होते. कांहीं रथासमोर येऊन सुमंत्राला म्हणत होते—"सुमंत्रा, रथ सावकाश, हाक रे! ह्या तिघांना पाहण्याचें भाग्य पुन्हां या जन्मीं मिळतें कीं नाहीं कोणास ठाऊक!"

तिकडे राजवाड्यांत दशरथ एकदम जागा झाल्यासारखा उठला व म्हणाला—"मला रामाला भेटावयाचें आहे." असें म्हणत तो राजवाड्यांबाहेर आला. कौशल्या व सुमित्रा, अंतःपुरांतील सर्व स्त्रिया दशरथापाठोपाठ राजवाड्याबाहेर आल्या. राजा दशरथ ओरडून म्हणाला—"सुमंत्रा, रथ थांबव!"

रामानें पित्याचा आवाज ऐकून मागें पाहिलें. त्याचें हृदय कळवळून आलें. पण हृदय कठोर करून म्हणाला—"सुमंत्रा! मला हें दृश्य पाहवत नाहीं. जोरानें रथ हाक!"

सुमंत्रानें रथाचा वेग वाढवण्याचा यत्न केला. पण घोडेच पुढें पाऊल टाकीत ना. त्या जनावरांना सुद्धां रामाचा वियोग असह्य वाटूं लागला.

दशरथ राजाला त्याचे मंत्री म्हणाले—"महाराज! रामानें लवकर परत यावें असें वाटत असेल तर आमच्या मतें महाराजांना निरोप द्यायला जास्त पुढें जाऊं नये."



दशरथ राजा उभा होता तेथेंच बसला. सर्व मंत्री पण बसले. रथ दृष्टीआड होईपर्यंत सर्व तेथेंच बसून राहीले.

राम वनवासाला निघून गेल्यानंतर अयोध्या नगरी ओसाड पडल्यासारखी झाली. सर्व नगरावर जणुं कांहीं प्रेतकळा दिसूं लागली.

दशरथ कांहीं अंतर रामाच्या मागें चालत गेला व हताश होऊन परतला. राजवाड्याच्या दरवाज्यांतच तो बसून राहिला. कौशल्या व कैकेयीनें त्याला हात देऊन उभें करण्याचा प्रयत्न केला. दशरथ कैकेयीला म्हणाला—

"माझ्या अंगाला तूं स्पर्श देखील करूं नकोस. आजपासून तूं माझ्याशीं बोलूं नकोस व आपलें तोंड दाखवूं नकोस. तुझा माझा संबंध कायमचा तुटला. डोळ्यासमोरून चालती हो. तुझ्या मुलानें माझें श्राद्ध केलें तरी मी त्यानें केलेल्या पिंडदानाला हात देखील लावणार नाहीं." असें सांगून दशरथ कौशल्येच्या महालांत निघून गेला.

सूर्यास्ताच्या सुमारास रामाचा रथ तमसा नदीच्या काठीं येऊन पोंचला. अयोध्येचे नागरिक रथामागोमाग तेथपर्यंत येऊन पोंचले. रामानें त्यांना अनेक प्रकारें समजावून सांगितलें. पण त्यांनीं रामाबरोबर रानांत राहण्याचा हट्ट सोडला नाहीं. ते म्हणाले— "जेथें राम तेथें अयोध्या!"

सुमंत्रानें रथाचे घोडे सोडले व त्यांना पाणी दाखविलें. तथापि ते घोडे चरत नव्हते कीं पाणी पीत नव्हते. जनावरांच्या मनाचीच ही स्थिति झाली होती तर रामाचे आप्तेष्ट व नागरिक यांच्या मनाची काय स्थिति झाली असेल हें सांगायलाच नको.

लक्ष्मण व सुमंत्र दोघांनीं मिळून सीतारामांसाठीं पानांचा बिछाना तयार केला. दोघें झोपल्यावर सुमंत्र व लक्ष्मण एका बाजूला बसून रात्रभर बोलत बसले.

रामाबरोबर जे नागरिक आले होते ते दमून भागून गेल्यामुळें नदी काठीं झोंपी गेले. पहाटे रामानें उठून सुमंत्राला बोलाविलें आणि म्हणाला—"लोक उठण्याच्या आधीं रथ दूर घेऊन चल. नाहींतर हे सर्व रानांत येतील. त्यांच्या हालअपेष्टा मला पाहवणार नाहींत."

सुमंत्र रथ तैयार करून आला. राम रथांत बसल्यावर त्याला म्हणाला—"बाबा रे! रथ पाचोळ्यावरून हांक. म्हणजे रथ कोठें गेला हें कळणार नाहीं. नाहीं तर लोक पाठोपाठ येतील."

रामानें सांगितल्या प्रमाणें सुमंत्रानें केलें. रथ कोठें गेला हें कळणें शक्य नव्हतें.

उजाडल्यावर लोकांना कळलें कीं राम त्यांना सोडून निघून गेला. आपल्या भाग्याची निंदा करीत ते अयोध्येला परतले.

उजाडण्याच्या सुमारास रथ पुष्कळ दूर निघून गेला. कोशल राज्याच्या दक्षिणेकडील प्रदेश पार करून गंगा नदीच्या काठावर येऊन पोंचला. शृंगवेरपुरानजिक एका वडाच्या झाडाजवळ सुमंत्रानें रथ



थांबवला. घोडे सोडले. त्यांचें दाणापाणी उरकून राम, लक्ष्मण व सीता वडाच्या झाडाखालीं बसले होते तेथें आला.

इतक्यांत रामाचा सखा व गंगे काठच्या रानाचा निषादराजा गुह राम आल्याचें कळल्यावर त्याला भेटण्यासाठीं आला. त्याला येत असलेला पाहून राम आनंदानें त्याला भेटायला सामोरा गेला.

गुह रामाला गद्गद् कंठानें म्हणाला— "रामा, माझ्या या गरीब वनालाच अयोध्या मानून तूं सुखानें रहा. आज माझें केवढें भाग्य कीं तूं माझा पाहुणा म्हणून आलास!"



नंतर गुहानें रामलक्ष्मण व सीतेसाठीं रैंपाक करावयास सांगितलें. गुह रामाला म्हणाला—"रामा, तूं तेथेंच रहा. माझ्या या राज्याचें तूंच रक्षण कर. हें तुझेंच राज्य आहे व माझी प्रजा ही आजपासून तुझी आहे."

राम गुहाला गाढ आलिंगन करून म्हणाला—"सख्या मित्रा! तूं मला भेटण्या-साठीं पायीं चालत आलास. याहून जास्त मला काय हवें. आपलें हें राज्य तूंच संभाळ. मला वल्कल वस्त्रें धारण करून वनवास करावयाचा आहे.



रात्रीं लक्ष्मण व निषाद राजा गुह दोघांनीं मिळून सीता रामांची शैया कोंवळीं पानें अंथरून तयार केली व दोघे एका बाजूला जाऊन बोलत बसले. कांहीं वेळानें गुह म्हणाला—"बाळा लक्ष्मणा, तूं सुद्धां आतां झोपलास तरी चालेल. मी रात्रभर पाहारा देतो. आम्हांला रात्रभर जागण्याची संवय आहे." पण लक्ष्मण म्हणाला—"मी व्रत म्हणून सीता रामांच्या रक्षणाची जबाबदारी स्वतःवर घेतली आहे. तेव्हां मी झोपणार नाहीं." म्हणून गुह लक्ष्मणाच्या सोबतीला रात्र भर त्याच्याशीं बोलत बसला. अयोध्येला जें कांहीं घडलें तें ऐकून गुहाला फार वाईट वाटलें.

सकाळीं पक्ष्यांचा कलरव ऐकून सीता व राम जागे झाले. रामानें लक्ष्मणाला बोलाविलें आणि म्हणाला—"चला, गंगे पार लवकर गेलें पाहिजे." लक्ष्मण निषाद राजा गुह व सारथी सुमंत्र दोघांना बोलावून घेऊन आला. राम गुहाला म्हणाला—"सख्या मित्रा! गंगा पार करून जावयाचें आहे." गुहानें आपल्या साथी मित्रांना बोलावून नावा तयार करण्यास सांगितलें.

रामानें सुमंत्राला बोलावून म्हटलें—"तुम्ही मला वडिलांसारखे आहां. तुम्हांला अयोध्येला



परत जायला सांगतांना मला फार वाईट वाटतें. पण तुम्ही गेला नाहीं तर बाबांना आमची जास्तच काळजी वाटेल. त्यांना आमचा सर्वांचा साष्टांग प्रणाम सांगून आमच्या वतीनें सांगा कीं आम्हांला रानांत कसला देखील त्रास नाहीं. आम्ही सर्व खुशाल आहों. चवदा वर्षे पुरी होतांच आम्हीं त्यांच्या दर्शनास धांवत येऊं. भरताला आजोळाहून बोलवून घ्या व त्याचा राज्याभिषेक करून टाका. कारण कोणा राजा नसेल तर प्रजेला फार कष्ट सोसावे लागतील."

सुमंत्र म्हणाला—"हा रिकामा रथ परत आणतांना पाहून मला राजा व प्रजा पाहतील व मला नावें ठेवून तोंड फिरवून बसतील. त्यांना मी काय उत्तर देऊं? सारथी रणांगणावरून रथ रिकामा घेऊन आला तर त्याचा मान राहील का? कौशल्या मातेला मी कोणत्या तोंडानें जाऊन सांगूं कीं मी रामाला सुखरूप रानांत पोंचवून आलों? त्यापेक्षां रामा, मला आपल्याबरोबर घेऊन चल. मी शिकार करून घेऊन येत जाईन व तुला देत जाईन."

"सुमंत्रा! तूं परत गेला नाहींस तर मी रानांत गेलों आहे कीं नाहीं हें कैकेयी मातेला तरी कसें कळणार? बाबांनीं दिलेलें वचन पुरें झालें कीं नाहीं याची खात्री नको का पटवून घ्यायला?" राम म्हणाला.

शेवटीं सुमंत्राला परत जावें लागलें. तो गेल्यावर रामाच्या सांगण्यावरून गुह वडाचा चीक घेऊन आला. रामानें बैराग्यां-सारखा केसांना तोचीक लावून जटा बांधून घेतल्या.

नंतर रामलक्ष्मण व सीता नावेंत बसलीं. रामानें गुहराजाचा निरोप घेतला व नाव सोडण्यास सांगितलें. नाव चालूं लागली. सीतेनें नावेंत बसूनच गंगेला नमस्कार केला व म्हणाली—"गंगे भागीरथी! मी चवदा वर्षे रानांत राहून परत येईन तेव्हां तुझ्या नांवानें ब्राह्मणांना एक लक्ष गाई व अन्नवस्त्र दान करीन. तुझ्या तिरावर जीं जीं देवळें आहेत त्यांचें दर्शन करून दान धर्म करीन. आम्हांला सुखरूप परत येण्यास आशीर्वाद दे."

नाव दुसऱ्या तिरावर पोंचली. रामानें, लक्ष्मण व सीते सह वत्स देशांत पाऊल टाकलें. तिघें पायीं चालूं लागलीं. पुढें लक्ष्मण होता, त्याच्या मागें सीता व शेवटीं राम चालत होता.

गंगे पलीकडे उभा राहून सुमंत्र उभा राहून तिघांकडे पहात होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह चालू होता. तिघे दृष्टी आड होईपर्यंत तो टक लावून पहात होता.

रामलक्ष्मण शिकार करीत पुढें जात होते. त्या रात्रीं ते एका झाडाखालीं उतरले. वन-वासांतली ती पहिली रात्र होती. कारण बरोबर सुमंत्र देखील नव्हता. दोघांनीं मिळून सीतेचें रक्षण करावयाचें होतें. राम व लक्ष्मण दोघांच्या मनांत निरनिराळ्या विचा-



रांनीं काहूर माजविला. बाबा किती दुःखी असतील? आणि कैकेयी माता! मुलाला राजा करण्याच्या प्रयत्नांत पतीचा घात करायला तयार झाली. धर्म, अर्थ व काम यांपैकीं काम हाच सर्वांत सामर्थ्यशाली आहे असें म्हटलें पाहिजे. नाहींतर बाप स्वतःच्या मुलाला कधीं रानांत धाडील का? भरताला तरी राज्याचें सुख लाभेल का? कैकेयी मातेच्या हट्टामुळें राज्यावर केवढें हें संकट! तिच्यामुळें पिता-पुत्रांची माता-पुत्रांची ही ताटातूट झाली. हें अयोध्येचें राज्यच काय सारें जग स्वतःच्या पराक्रमानें जिंकणें शक्य

आहे. वडिलांच्या इच्छेकरितां सिंहासनाला लाथ मारली.

रामाला झोंप आली नाहीं. त्याच्या डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह चालू होता. लक्ष्मणानें तें पाहिलें व त्याचें सांत्वन केलें. तेव्हां रामाच्या मनाला धीर आला. वनवास करण्याचें त्यानें स्वत: कबूल केलें ही गोष्ट त्याला आठवली.

सकाळीं तिघांनीं गंगेवर स्नान केलें व गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांच्या पवित्र संगमावर येऊन पोंचले. जवळच भरद्वाज मुनींचा आश्रम होता. ते आश्रमांत पोंचले तोपर्यंत काळोख पडूं लागला होता. रामानें थोडक्यांत वनवास करण्याचें कारण सांगून विनंति केली कीं, कोणाला त्रास होणार नाहीं व ऋषी मुनींची सेवा होऊं शकेल असें रानांत राहण्यास सोयिस्कर स्थान सांगावें.

"तुला तुझ्या वडिलांनीं निष्कारण रानांत पाठविलें, हें मला पूर्वीच कळलें आहे. पण त्यामुळें अनायास तुझें दर्शन घडलें. या आश्रमांतच तूं एक पर्णकुटी करून चौदा वर्षें राहिलास तर मला आनंदच होईल."

राम म्हणाला—"मुनिवर! आम्ही आपल्या आश्रमांत आहों हें कळलें तर सारी अयोध्या नगरी येथें येईल. म्हणून दूर कोठें तरी रहायला स्थान सांगावें. सीता सुद्धां बरोबर आली आहे. ती जनक राजाची लाडकी कन्या आहे. तिचें मनलागेल असें रमणीय स्थान सांगावें."

भरद्वाज म्हणाले—"रामा, येथें राहणें तुला पसंत नसेल तर येथून दहा कोसावर चित्रकूट नांवाचा एक सुंदर पर्वत आहे. तेथें जाऊन तूं रहा. त्या पर्वतावर सहस्रावधि वर्षांपासून मुनींचा वास होत राहिला आहे. तेथें आश्रम करून तूं रहावें."





# भयानक दरी

[ २ ]

[ब्रह्मपुर गांवाच्या नजीकच्या रानांत लखू या नांवाचा एक गुराखी रहात असे. तो आपलीं गुरें चारायला घेऊन गेला असतां डोंगरापलीकडून एक विचित्र एकशिंगी घोडें आलें व गुरांबरोबर चरूं लागलें. त्याच वेळीं ब्रह्मपुराचा सेनापति तेथें आला. त्यानें तें विचित्र घोडें पाहून त्याला धरून घेऊन यायला आपल्या सैनिकांना पाठविलें. पुढें वाचा.]

सेनापतीच्या आज्ञेप्रमाणें एका सैनिकानें आपला घोडा, तें एकशिंगी घोडें हांकून आणण्याच्या हेतूनें त्याच्यावर सोडला. तें घोडें सेनापति होता त्या बाजूला येऊं लागलें.

सेनापतीनें दुरूनच त्या घोड्याचा विचित्र रंग व कपाळावरचें शिंग पाहिलें व म्हणाला—"हें तर एक विचित्र जनावर दिसतें आहे. असलें जनावर कोणी पाहिल्याचें मी कधीं ऐकलें नाहीं. हें नेऊन राजाला नजराणा म्हणून दिलें तर राजा खूष होऊन मोठें बक्षिस देईल."

नंतर त्यानें लखूकडे वळून विचारलें—"काय रे, कोठून आणलेंस रे हें चोरून! राज्यांतल्या प्रत्येक वस्तूवर व प्राण्यावर राजाची मालकी असते, ही राजाची आज्ञा तुला माहीत नाहीं वाटतें?"

सेनापतीनें घमेंडखोरपणानें विचारलेला तो प्रश्न लखूला आवडला नाहीं. त्याला थोडा राग



पण आला. तरी त्यानें तो दाखविला नाहीं. म्हणाला—“ मालक! मी चोरून नाहीं आणला हा घोडा. तोच डोंगरापलीकडून आपल्या पायानें चालत आला आणि माझ्या गुरां-बरोबर चरत आहे. मला काय माहीत तो कोणाचा आहे हें! मी तुम्ही म्हणतां त्या राजाचें कधीं तोंड देखील पाहिलें नाहीं. कायदा म्हणाल तर आम्ही गुराखी! आम्हांला लिहितां वाचतां येत नाहीं. म्हणून राजानें काय आज्ञा काढली आहे ती आम्हांला काय कळणार!”

“तुला माहीतच नाहीं म्हणून मी या खेपेस माफ करतो!” असें सांगून त्यानें एका सैनिकाला आज्ञा केली कीं या घोड्याला बांधून राजधानींत घेऊन चला.” असें सांगत एकशिंगी घोड्याकडे जाऊं लागला,

एका सैनिकानें दोरीचा फांस तयार केला व त्या शिंगी घोड्याच्या गळ्यांत बांधून दुसरें टोक हातांत धरलें. नंतर तो सेना-पतीकडे शिंगी घोड्याला घेऊन जाऊं लागला.

दुसऱ्या सैनिकानें लखूजवळ जाऊन त्याला दरडावून सांगितलें, हें पहा, एका महिन्यानें मी पुन्हां येईन. तोंपर्यंत तूं असलाच एक घोडा धरून तयार ठेवला नाहींस तर लक्षांत ठेव. माझ्याशीं गाठ आहे.” असें सांगून तो देखील पहिल्या सैनिकाच्या पाठोपाठ निघाला.

सेनापतीचें व त्याच्या सैनिकांचें तें उर्मट-पणाचें बोलणें व वागणें लखूला आवडलें नाहीं. त्यानें भात्यांतून एक बाण काढून धनुष्यावर ठेवला देखील. नंतर शत्रूवर का होईना भित्र्यासारखा पाठीमागून बाण सोडणें रास्त नाहीं असा विचार करून त्यानें हळूच तो बाण खालीं जमीनीवर सोडला.

सेनापति पुढें पुढें रानांतून जात होता व सैनिक पाठीमागून शिंगी घोड्याला घेऊन येत होते. सेनापति राज्यच जिंकून आलों आहों अशा ऐटींत चालला होता.

तो मनांतले मांडे खात चालला होता, मी हा घोडा राजाला नजराणा म्हणून भेट करीन. सांगेन, ह्या घोड्याला धरण्यासाठीं केवढें मोठें साहस दाखवावें लागलें. किती युक्त्या लढवाव्या लागल्या वगैरे वगैरे. राजा मला मोठं बक्षिस देईल व मोठी पदवी बहाल करील.

पण गांवांत कोणाला कळतां कामा नये कीं मी हा घोडा एका गुराख्याकडून बळ-कावून आणला आहे. म्हणून प्रथम तिघां सैनिकांना पण बजावून सांगितलें पाहिजे. नाहींतर सारा प्रयत्न फुकट जायचा.

असा विचार करून सैनिकांना तें सांग-ण्यासाठीं म्हणून तो मागें वळला. पण त्याला एकाएकीं एका सैनिकाचा आवाज ऐकूं आला—“ सेनापति हा घोडा नसून कोणीतरी मायावी राक्षस दिसतो आहे. माझ्या घोड्याला शिंग मारून ठार केलें व मला देखील.” म्हणत तो जमिनीवर आद-ळला. सेनापतीनें तें दृश्य पाहिलें. एक सैनिक आणि त्याचा घोडा रक्ताच्या डबक्यांत निश्चेष्ट पडला होता. दुसरा सैनिक घोडा घेऊन दुसऱ्या बाजूला आपला जीव वांच-



तें दृश्य पाहून सेनापतीची गाळणच उडाली. तो पुढें येणार तोंच शिंगी घोड्यानें आपलें शिंग सेनापतीच्या घोड्याच्या पोटांत खुपसून त्याला वर आकाशांत उडविलें आणि सेनापति जमिनीवर आदळ-ण्याच्या आंत त्याच्या बरगड्यांत आपलें शिंग खुपसून त्याला देखील जमिनीवर लोळविलें. दोघे बराच वेळ जमिनीवर तडफडत होते.

“वांचवा, वांचवा!” असें ओरडून एक सैनिक ब्रह्मपुराकडे धांवला. तो ओरडत होता—“ राक्षस घोडा! राक्षस घोडा!”



तो रस्त्यावरून ओरडत चालला असतां लोकांना वाटलें, वेड लागलें असावें याला. तो राजवाड्याच्या फाटकापर्यंत आला तेव्हां पाहारेकऱ्यांनीं त्याला अडविलें. तो विनवण्या करूं लागला—"सोडा मला. आपल्या सेनापतींना त्या राक्षस घोड्यानें ठार केलें. दोघां सैनिकांना व त्यांच्या घोड्यांना पण ठार केलें. मी आलों आहे वर्दी द्यायला पळत !"

पाहारेकऱ्यांचा नायक धांवत दिवाणांकडे गेला व म्हणाला—"हा कोणीतरी वेडा दिसतो आहे. ओरडतो आहे कीं सेनापतींना कोणी राक्षस घोड्यानें शिंग मारून ठार केलें आहे."

"त्याला घेऊन या माझ्याकडे" असें सांगत मंत्री आपल्या खोलींत जाऊन बसला.

सैनिक दरवाज्यांत पोंचल्याबरोबर ओरडूं लागला—"वांचवा ! मंत्री ! घात झाला. आपले सेनापति व दोन सैनिक सर्वांना एका शिंगी घोड्यानें ठार केलें."

सेनापति शांतपणें म्हणाला—"घाबरूं नकोस. जें झालें तें सर्व शांतपणें सांग."

सैनिकाला थोडा धीर आला. रानांत त्यांना गुराख्याचा पोर कसा दिसला.



शिंगी घोडा पाहून त्याला धरून आणायला कसें सांगितलें. सैनिकानें फांस टाकून त्याला धरून आणल्यावर ते राजधानीकडे येत असतां वाटेंत त्या घोड्यानें प्रथम एका सैनिकाला व नंतर स्वतः सेनापतींना कसें ठार केलें व तें दृश्य पाहून एक सैनिक कोठें तरी पळून तरी गेला नाहींतर त्याला देखील शिंगी घोड्यानें ठार केलें असेल असें सांगून म्हणाला—"मी ही बातमी द्यायला त्या घोड्याची नजर चुकवून आलों आहें."

मंत्री कांहीं वेळ विचारांत पडला. नंतर



ठार केलें तेव्हां तूं काय गंमत पहात उभा राहिलास! कीं मिळून पळालास?"

"भीति म्हणतां! हा जीव वरचा वर आणि खालचा खालीं राहून गेला. एका सैनिकाला ठार करून सेनापतींवर तो घोडा धांवल्या-बरोबर मी मागें वळून पाहिलें नाहीं आणि राजधानीकडे पळत आलों." सैनिक म्हणाला.

"म्हणजे तूं स्वतःच्या डोळ्यांनीं सेना-पतींना किंवा त्या सैनिकाला मरतांना पाहिलें नाहींस म्हणावयाचें!" मंत्र्यानें विचारलें.

"मालक! डोळ्यांनीं नाहीं पाहिलें. पण माझे कान उघडे होते. सेनापतींचा आवाज मी ऐकला—"मेलों, वांचवा, धांवा!" सैनिक म्हणाला.

सैनिकाचें तें उत्तर ऐकून मंत्री हंसूं लागला. म्हणाला—"तें ऐकल्याबरोबर तूं धांवलास, पण सेनापतींच्या मदतीला नाहीं; स्वतःचा जीव वांचवायला! तूं पिऊन आलेला दिसतो आहेस, नाहीं तर कांहीं तरी रानटी फळ खाल्लें असशील. कारण शिंग असलेला घोडा आम्ही कधीं ऐकला नाहीं. गुराख्याच्या पोराला धरून आणायला मी पाठवतों सैनिकांना. झालें काय हें तरी कळलें पाहिजे."

सैनिक मुजरा करून बाजूला उभा राहिला. रानांतलें तें दृश्य आठवून त्याच्या अंगावर शहारे उभे रहात होते. सैनिकांना तेथें वाट दाखवायला जावें लागणार याचा विचार करून तर तो जास्तच घाबरला. मंत्र्यानें आज्ञा केली तर त्याला जावेंच लागणार.

मंत्र्यानें नायकाला बोलावून सेनापति व दोन सैनिक कोठें गेले आहेत हें पाहून येण्यासाठीं सैन्याची एक तुकडी पाठ-विण्यांत यावी, अशी आज्ञा केली.

गांवांत ती बातमी पसरली. सेनापति कसा मेला यावर लोकांनीं कपोल कल्पित



बातम्या सांगायला सुरवात केली. रस्त्यावरून तो सैनिक ओरडत गेला होता, व तें सर्वांनीं ऐकलें होतें. एक विचित्र घोडा आहे व त्याच्या कपाळावर शिंग आहे, हें देखील लोक सांगूं लागले. कांहीं लोक म्हणाले—"त्याला पंख आहेत, म्हणे." आणखी एक जण म्हणाला—"तो घोडा सेनापतींना उचलून घेऊन आकाशांत उडाला व अदृश्य झाला."

गांवांत महादू नियमाप्रमाणें दूध घेऊन गेला तेव्हां त्याच्या कानावर या सर्व बातम्या येऊन आदळूं लागल्या. त्याला त्याच्या मुलानें त्या दिवशीं पहाटे जें कांहीं सांगितलें होतें तें सर्व आठवलें. त्या क्रूर घोड्यानें स्वतः सेनापतींच्या चिंधड्या उडवल्या आहेत तर माझ्या मुलाच्या जिवाला तर कांहीं अपाय झाला नसेल ना! या गोष्टीचा विचार करून तो मनांतल्या मनांत फार घाबरून गेला. तो सरळ रानांत आपल्या झोंपडीकडे मुलाची काळजी करीत धांवला.

किल्ल्याच्या दरवाज्यावर त्याला आणखी एक विचित्र गोष्ट ऐकायला मिळाली. लोक म्हणत होते—"शत्रूकडचा कोणी मनुष्य वेष पालटून गुराख्यासारखा रानांत येऊन रहात



आहे व त्यानेंच सेनापती व दोघां सैनिकांना ठार केलें आहे. त्याला धरून आणण्यासाठीं मंत्री कांहीं शिपायांना पाठवीत आहे. ते रानांत जाण्यासाठीं निघाले आहेत कीं निघणार आहेत.

तें ऐकून म्हाताऱ्या महादूला वाटलें कीं मुलाला धरून आणण्यासाठींच शिपाई जात आहेत. त्यानें त्या घोड्याला आतापर्यंत ठार केलें नसल्यास शिपाई मुलाला धरून आणतील व तुरुंगांत टाकतील. मला वेळींच जागेवर जाऊन मुलाला सावध केलें पाहिजे.

तो धांवतच रानांत गेला व झोपड्याजवळ पोचला. पण तेथें कोणी नव्हतें. त्याचा मुलगा पण नव्हता.

त्यानें विचार केला, कसा प्रसंग येतो कोणास ठाऊक? त्यानें खुंटीवरून तलवार काढून घेतली आणि त्याचा मुलगा गुरें चरायला घेऊन जात असे त्या वाटेनें निघाला. ती तलवार त्याच्या बापाच्या वेळेपासून त्याच्या घरांत होती.

मुलाला ठरल्या जागीं बसलेला पाहून महादूच्या जिवांत जीव आला. तो धांवतच मुलाजवळ गेला व त्याला प्रेमानें कुरवाळून त्याच्याकडे पाहूं लागला. लखूला बापाचें तें विचित्र वागणें पाहून आश्चर्य वाटलें. पण रानांत घडलेली गोष्ट बापाच्या कानावर गेली असावी असा विचार करून तो कांहीं बोलला नाहीं.

महादू म्हणाला—"तुझी भेट होते कीं नाहीं या काळजींत मी येथवर आलों आहे. गांवांत अफवांवर अफवा ऐकल्या. झालें काय कळूं तर दे!"

बापाला घाबरलेला पाहून व त्याच्या हातांत तलवार पाहून लखूला आश्चर्य वाटलें. गांवांत कसल्या अफवा बापानें ऐकल्या असतील, लखूला कळलें नाहीं. त्यानें शांतपणें बापाला विचारलें—"बाबा! काय ऐकलेंत तुम्ही? आणि ही तलवार कशाला घेऊन आलांत?"

"ब्रह्मपुराच्या सेनापतीला रानांत एका विचित्र जनावरानें ठार केलें आहे, म्हणें! ही एक अफवा आहे. आणखी कांहीं लोक असेंहि म्हणाले कीं शत्रूचा कोणी हेर गुराख्याचा वेष करून रानांत येऊन राहिला आहे व त्यानेंच सेनापतींची कत्तल केली!" बाप घाबरून म्हणाला. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# भुतांनीं लावलेलें लग्न

[२]

भुतानें हसनला कायरोच्या राजवाड्याच्या उद्यानांत एका चौथऱ्यावर आणून ठेवलें. गार वारा लागल्यामुळें त्याची झोंप मोडली. पण तो त्याच्या बापाच्या कबरीवर नव्हता, एका उद्यानांत होता. त्याला तें सर्व स्वप्ना-सारखें वाटलें. आपण बसल्याला आहों कीं आणखी कोठें हें देखील त्याला कळलें नाहीं. तो क्षणभर घाबरून गेला. समोर एक वयस्क मनुष्य चालत येत असलेला दिसला. त्याचें रूप पाहून हसन जास्तच घाबरला व तो ओरडणार इतक्यांत तो मनुष्य म्हणाला—

"मी एक भूत आहें. पण मी तुझा हितैषी आहें. तुझ्या रूपाला साजेल अशा एका रूपवतीशीं तुझें लग्न लावून देण्यासाठीं मी तुला या कायरो नगरीं घेऊन आलों आहें. मी सांगेन तसें करशील तर त्यांत तुझें हित आहे. तूं स्नानागारांत जा. तेथें तुला एक कुबडा दिसेल त्याच्याबरोबर पुष्कळ गाणारे व नाचणारे आहेत. त्यांच्या हातांत जशी मेणबत्ती आहे तशीच तूं देखील एक पेटवून हातांत घे. ही घे मेणबत्ती. एका तरुणीशीं त्या म्हाताऱ्या कुबड्याचें लग्न ठरलें आहे. हा कुबडा नवरदेव वधूच्या घरीं निघाला कीं तूं देखील या नाचणाऱ्या व गाणाऱ्यांबरोबर जा. हे लोक वांकून नवर-देवाला सलाम करतील तेव्हां त्यांच्यासमोर या पिशवींतल्या मोहरा फेंकीत जा. ही घे मोहरांची पिशवी. या पिशवींतल्या मोहरा कधीं संपणार नाहींत, तूं किती वाटल्यास तरी चालेल. अशा तऱ्हेनें त्या गर्दींतल्या

सौ. रमाबाई देसाई



लोकांना तुला स्वतःकडे वळवून घेतां येईल. लग्न घरीं तूं इतर लोकांबरोबर जा."

असें सांगून भूत निघून गेलें. हसनला कांहींच कळलें नाहीं. काय करावें हें देखील सुचलें नाहीं. शेवटीं त्यानें भुतानें सांगितल्याप्रमाणें करण्याचें ठरविलें. मेणबत्ती घेऊन तो स्नानागारांत गेला. तेथें त्याला लोकांची गर्दी दिसली. सर्वांच्या हातांत एकेक मेडबत्ती होती.

कुबडे नवरदेव स्नानागारांतून बाहेर निघाले. तेव्हां नाचणाऱ्या गाणाऱ्यांसह

त्या कुबड्याजवळ येऊन चालूं लागला. त्या गर्दींतील प्रत्येक माणसाचें लक्ष त्याच्याकडेच होतें. हसनचें रूप पाहून सर्व चकित झाले. त्यांत कुबड्याजवळ तो उभा होता. म्हणून तें जास्त वठून दिसत होतें. या शिवाय त्याचा पोशाख नवरदेवांच्या कपड्यापेक्षां जास्त मूल्यवान होता.

मिरवणूक चालू असतां नवरदेवाला सलाम करण्यासाठीं कोणी लवून सलाम केला कीं हसन दोन दोन चार चार मोहरा त्यांना देऊं लागला. भुतानें सांगितल्याप्रमाणें त्याची पिशवी रिकामी होतांच नव्हती. त्यानें पुष्कळ सोनें काढलें, पण पिशवी जशीच्या तशी भरलेली.

मिरवणूक वधूच्या घरीं पोंचली. तोंपर्यंत हसननें इतक्या मोहरा वाटल्या कीं त्याच्या सौंदर्याबरोबर त्याच्या श्रीमंतीचें कौतुक प्रत्येकजण आपल्या मनांत करूं लागला. दरवाज्यांत जे नोकर उभे होते त्यांनीं नवरदेवाला व स्त्रियांनाच आंत प्रवेश दिला. इतरांना बाहेर रहावें लागलें.

परंतु नर्तकींनीं व गाणारींनीं हट्ट केला कीं हसनला देखील आंत सोडावें. त्यांनीं

नाहीं तर आम्ही देखील आंत येणार नाहीं. त्यांनीं हसनला ओढूनच आंत नेलें.

आंत बायकांची गर्दी होती. वधूनें नवरदेवाबरोबर एका अनोळखी तरुणाला आंत येतांना पाहिलें. पण तो कोण व तेथें कां आला आहे हें तिला कळलें नाहीं.

करमणुकीचा कार्यक्रम संपल्यावर बायका वधूला एकटी नवरदेवाजवळ सोडून निघून गेल्या. त्या दालनांत म्हाताऱ्या कुबड्याबरोबर फक्त हसन व वधू होती.

कुबडा हसनला म्हणाला—"तूं सुद्धां जा. इथें कशाला उभा आहेस ?"

तें ऐकून हसन उठून बाहेर जाऊं लागला. पण दरवाज्यांत त्याला भूत दिसलें. त्यानें त्याला खुणावलें—"इकडे नाहीं तिकडे जा !" वधू बसली होती तिकडे बोट दाखवलें. नंतर तो कुबड्याला उचलून घेऊन गेला.

वधू पाठ फिरवून बसली असल्या कारणानें तिला तें कांहींच कळलें नाहीं.

भुताला पाहून कुबडा बेशुद्ध झाला होता. त्याला शुद्ध आली, तेव्हां तो एका अंधार कोठडींत पडून असल्याचें त्याला कळलें. त्यानें बाहेर येण्याचा पुष्कळ प्रयत्न केला



भुतानें सांगितल्याप्रमाणें हसन वधू बसली होती तिकडे भीतभीत गेला. पण त्याचें पाऊल पुढें पडेना. पुन्हां भुतानें येऊन त्याला खुणावलें, तेव्हां तो वधूच्या मागें जाऊन उभा राहिला. भुतानें त्याला कानांत सांगितलें कीं तूं सांग कीं खरा वर तूंच आहेस. वधूची परीक्षा घेण्यासाठींच तिच्या वडिलांनीं हें सर्व नाटक रचलें होतें. तिचा तुझ्या बोलण्यावर विश्वास बसेल.

वधू डोकें खालीं करून एका कोपऱ्यांत बसली होती. हसन जवळ आल्याची चाहूल

करून बसली. नंतर धीर करून तिनें म्हटलें– "निघून जा, येऊं नको इकडे. तुला पाहिल्यावर मला ओकारीच आली."

"मी इतका का कुरूप आहें?" हसननें विचारलें.

आवाजांत गोडी होती व तो अनोळखी पण होता. घोगऱ्या आवाजाची तिला कल्पना होती. पण तो गोड आवाज ऐकून ती चकित झाली. तिनें वळून पाहिलें. "कोण तुम्ही? तो कुरूप कुबडा कोठें आहे? त्याच्याशींच तर माझें लग्न झालें आहे!"

"तें सर्व नाटक होतें. तुझ्या वडिलांनींच तुझी परीक्षा घेऊन पाहिली!" हसन म्हणाला.

हसन म्हणाला तें सर्व सित्तल्ला खरें वाटलें. ती मनांतल्या मनांत वडिलांवर किती रागावली होती व आपल्या भाग्याला दोष देत होती. पण आतां वडिलांविषयीं तिच्या मनांत आदर वाढला. ती रात्र हसननें सित्तल बरोबरच घालवली. उजाडण्यापूर्वी भुतानें हसनला झोपेंतच पलंगावरून उचललें व बसऱ्याला निघाला. पण बसऱ्याला पोंचण्यापूर्वींच छान उजाडलें म्हणून त्यानें हसनला डेमास्कस येथेंच सोडलें आणि तें निघून गेलें.



"हसन उठला तेव्हां तो पलंग व सित्तल कोणीच नव्हतें. तो राजवाडापण नव्हता. तो कोठेंतरी परक्या अनोळखी गांवच्या धर्मशाळेंत होता. तें गांव कायरो किंवा बसरा नाहीं हें त्यानें ओळखलें.

हसनला एक परदेशी समजून लोक त्याला पहायला धर्मशाळेसमोर जमा झाले व हसनला तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न विचारूं लागले. त्याच्या अंगावरच्या कपड्यांवरून तो प्रवास करून आला असावा असें दिसत नव्हतें.

"ह्या गांवाचें नांव काय?" त्यानें लोकांना विचारलें.

"अरे आमच्या सुंदर देशाचें व गांवाचें नांव देखील तुला माहीत नाहीं तर! मग आलास तरी कसा येथें? आमच्या गांवाचें नांव डेमास्कस आहे."

"म्हणजे मी सीरियाच्या राजधानींत आहें. तर! रात्रभर कायरो गांवांत होतों आणि उजाडतांच डेमास्कसला कसा काय पोंचलों?" त्यानें चकित होऊन विचारलें.

लोकांनीं त्याला विचारलें–"तर मग तुम्ही कायरोचे राहणारे आहां तर?"

"छे छे! मी बसऱ्याचा राहणारा आहें. काल रात्रीं काळोख पडल्यावर बसऱ्याला














झोपलों, पण उठलों कायरोला. काल रात्रीं कायरोला झोपलों आणि उठतों आहे डेमास्कसला. ही सर्व भुताटकी आहे !" हसन स्वतःशीं बडबडत होता.

त्याची ती बडबड ऐकून लोकांना वाटलें कीं स्वारीचें डोकें ठिकाणावर दिसत नाहीं. नाहींतर रात्रीं खूप झिंगून तरी आली असेल.

हसनला त्याच्या गाठोड्याची आठवण झाली. त्याचे कपडे, ती मोहरांची पिशवी आणि पगडी कांहींच जागेवर नव्हतें आणि त्याला त्या वस्तू मिळणार तरी कशा? कारण त्या तर कायरोला सित्तलच्या पलंगावर राहून गेल्या होत्या.

आतां मात्र तो वेडा असल्याची शंका कोणाला उरली नाहीं. तो निघाल्यावर लोक त्याच्या पाठोपाठ त्याची थट्टा करीत चालूं लागले. हसन पळूं लागल्यावर लोक पण त्याच्या पाठोपाठ पळूं लागले. शेवटीं कंटाळून तो एका मिठाईवाल्याच्या दुकानांत शिरला व तेथें जाऊन बसला.

तें दुकान अब्दुल्ला नांवाच्या एका मिठाई-वाल्याचें होतें. त्याला हसनची स्थिति पाहून दया आली. त्यानें त्याच्याशीं सहानुभूतिपूर्वक बोलून त्याच्या मनांतून सर्व काढून घेतलें व म्हणाला—" बाळ! तुझ्या प्रत्येक शब्दावर माझा विश्वास बसला आहे. पण यांतला एक शब्ददेखील दुसऱ्या कोणाजवळ बोलूं नकोस. कारण लोक तुझी थट्टा उडवितील. मला मूळबाळ कांहीं नाहीं. तुला आईवडील नाहींत. आपण दोघे पिता पुत्रासारखे या घरांत राहूं. हें दुकान आतां तुझें आहे असें समज!"

हसनचा कंठ गहिंवरून आला. त्यानें अब्दुल्लाचे आभार मानले व त्याच्याबरोबर राहण्याचें कबूल केलें.

अब्दुल्ला बाजारांत जाऊन हसनसाठीं चांगले कपडे घेऊन आला व काजीला बोलावून हसनला दत्तक घेतलें.

*  *  *

सित्तल सकाळीं उठून पाहते तर पलंगावर ती एकटीच. हसन केव्हां निघून गेला हें तिला कळलें नाहीं. तिनें बराच वेळ वाट पाहिली. तो कोठें बाहेर गेला असला तर येईल असें तिला वाटलें. पण तो बराच वेळ न आलेला पाहून तिला काळजी वाटूं लागली.

तेवढ्यांत शम्स आपल्या मुलीच्या समाचारास आला. आपण स्वतःच्या हातांनीं मुलीला विहिरींत ढकललें असें त्याला वाटत होतें. तो मुलीची समजूत घालण्यासाठीं आला. पण येऊन पाहिलें तर सित्तलच्या चेहऱ्यावर त्याला दुःखाची रेषा दिसली नाहीं. त्याला तें सर्व खरेंच वाटेना. त्यानें विचारलें—" बाळ सित्तल! माझ्या मनाविरुद्ध हें लग्न झालें. पण तुला हें सर्व कसें काय पसंत पडलें?"

" कां बाबा? त्यांत तुम्ही गैर तें काय केलेंत?" तिनें उलट चकित होऊन शम्सलाच प्रश्न केला.



" म्हणजे तो कुबडा आवडला तुला?" शम्सनें विचारलें.

मुलगी स्मित करून म्हणाली—" बाबा, कशाला थट्टा करतां माझी. तुम्ही हें सर्व नाटक थट्टेखातर केलें होतें हें मला कळलें नाहीं म्हणतां?"

सित्तल काय म्हणत आहे, शम्सला कळलें नाहीं. म्हणून त्यानें जास्त चवकशी केली. तेव्हां त्याला कळलें कीं, कुबड्याऐवजीं कोणी तरी सुंदर तरुण त्याचा जावई झाला आहे. कुबड्याची पण चवकशी झाली तेव्हां तो एका अंधारकोठडींत आढळला.

शम्सनें त्याला विचारलें—" कोठें होतास रे रात्रभर भटकत ? तुझें लग्न मी माझ्या मुलीशीं करून दिलें तें एवढ्यासाठींच का ?"

तुमच्या लेकीशीं माझ्या लग्नाचें नुसतें नाटक झालें आणि मला उचलून त्या अंधार कोठडींत नेऊन टाकलेंत ! आणि आतां वर विचारतां रात्रभर कोठें होतास ? तुम्हांला व तुमच्या लेकीला सलाम !" असें म्हणत कुबडा निघून गेला.

शम्सनें विचार केला, सुलतानाच्या मनांत एक करायचें होतें पण त्या परवरदिगार अल्लाच्या मनांत कांहीं दुसरेंच होतें. त्यानें पुन्हां येऊन आपल्या मुलीला विचारलें—"तर मग तो तरुण कोठें आहे ? त्याचें नांव गांव कांहीं सांगशील कीं नाहीं ?"

"ते परत आल्यावर त्यांनाच विचारून घ्या !" सित्तल म्हणाली. नंतर तिनें हसनचा पोशाख, पगडी, मोहरांची थैली वगैरे सामान आपल्या बापाला दाखविलें.

कित्येक दिवस आपल्या जावयाची वाट पाहिल्यावर शम्सनें जावयाचे कपडे तपासून पाहिले, कदाचित कांहीं कागद पत्र सांपडेल व त्यावरून पत्ता लागेल. तसें झालेंहि. हसनच्या पगडींत त्याला एक चिठ्ठी सांपडली. ती वाचून त्याला अल्लाच्या कृपेची कल्पना आली. त्याचा जावई कोणी परका नसून नूरचा मुलगाच आहे हें कळल्यावर त्यानें दहा वेळ अल्लाला सलाम केला. दोघां मित्रांची इच्छा अल्लाच्या मेहरबानीनें नकळत पूर्ण झाली.

परंतु नूरचा मुलगा हसन कोठें आहे हें कळलें नाहीं. कालक्रमानें सित्तलला नऊ महिन्यांनीं एक मुलगा झाला. तो आपल्या आईबापांसारखाच सुंदर निघाला. त्याचा जन्म विचित्र परिस्थितींत झाल्यामुळें त्याचें नांव अजीब असें ठेवण्यांत आलें.

सात वर्षांचा झाल्यावर अजीब शाळेंत जाऊं लागला. वजिराचा नातू म्हणून लाडावलेला. मुलांना मारहाण करून त्रास देई. शेवटीं मुलांनीं मौलवीसाहेबांकडे तक्रार केली. मौलवीसाहेब म्हणाले—" मी सांगतों, तसें करा. तुमच्यापैकीं एक जणानें सांगावें कीं चला आपण एक गमतीदार खेळ खेळूं या. पण या खेळांत सामील होण्यापूर्वी प्रत्येकाला आपल्या आईचें किंवा बापाचें नांव सांगावें लागेल. जो सांगणार नाहीं त्याला खेळायला येणार नाहीं."

दुसऱ्या दिवशीं मुलांनीं तसेंच केलें. आपापल्या आईबापांचें नांव सांगितलें.
















अजीबची पाळी आली तेव्हां तो म्हणाला— "माझ्या आईचें नांव आहे सिताल हसन व बाबांचें नांव आहे शम्स उल दीन वजीर !"

"वजीर तुझ्या आजोबांचें नांव आहे. बाबांचें नांव सांग." एक मुलगा म्हणाला.

दुसरा म्हणाला—"बाल। आपल्या बापाचें नांव देखील माहीत नाहीं तर !" सर्व मुलें अजीबच्या चारी बाजूला घोळका करून खदखदां हंसूं लागलीं.

अजीब रडत रडत घरीं गेला व आईला जाऊन घडलेलें वृत्त सांगितलें. तिनें मुलाची समजूत घातली. पण स्वतःची समजूत घालणें तिला अशक्य वाटलें. आपल्या पतीची आठवण काढून ती रडूं लागली.

आईला रडत असलेली पाहून अजीब देखील रडूं लागला. मायलेक दोघं रडत असतां शम्स तेथें आला. त्याला सर्व कळलें. त्याला देखील वाईट वाटलें.

तोंपर्यंत लहरी सुलतानाचा राग नाहींसा झाला होता. शम्स सुलतानाकडे गेला व जावयाच्या शोधार्थ जाण्याची परवानगी मागितली. सुलतानानें स्वतः जाण्याऐवजीं राज्याच्या अधिकाऱ्याकरवीं शोध काढण्यास सांगितलें. पण त्यानें फार आग्रह केल्यावर सुलतानानें त्याला परवानगी दिली.

शम्सनें प्रवासाची तयारी केली. तो बसऱ्याच्या वाटेनें मुलीला व नातवाला बरोबर घेऊन निघाला. कित्येक दिवस प्रवास केल्यावर ते डेमास्कसच्या वेशीवर पोंचले. नगराबाहेर तंबू टाकून त्यांनीं दोन दिवस मुक्काम करण्याचें ठरविलें.

डेमास्कस एक सुंदर नगर होतें. म्हणून नगर पाहण्यासाठीं शम्सबरोबर आलेले लोक निघून गेले. अजीब देखील आपल्या नोकराबरोबर गांव पाहण्यास निघाला. ते दोघे फिरत फिरत हसनच्या दुकानासमोर आले.



हसनच आतां मालक होता. म्हाताऱ्या अब्दुल्लानें त्याला दत्तक घेतल्यानंतर दुकानाचें सर्व काम त्याच्या अंगावर टाकलें. म्हातारा वारल्यावर त्याचा वारस म्हणून दुकान हसनलाच मिळालें.

अजीबला पाहिल्याबरोबर हसनला नकळत त्याच्या विषयीं एक तऱ्हेचा ओढा वाटला. तो जवळ गेला व त्याला प्रेमानें कुरवाळून म्हणाला—"कोण रे बाळ तूं ! ये आंत ये, बस. मी केलेली मिठाई तर पहा. तुला फार आवडेल."

अजीबला देखील हसनला पाहिल्याबरोबर एक तऱ्हेचा ओढा वाटला. तो आपल्या नोकराला म्हणाला—"तो पहा किती प्रेमानें बोलावीत आहे. चल आंत."

सैयद म्हणाला—"छे छे ! तुमच्यासारख्या श्रीमंतांनीं असल्या दुकानांत जायचें नसतें. मालकांना कळलें तर मालक रागावतील."

"बाळ, मी गरीब आहें हा माझा अपराध आहे का ? श्रीमंत किंवा गरीब हा भेद प्रेम ओळखत नाहीं. ये आंत ये." हसननें जास्तच आग्रह केला.

हसन दोघांना दुकानांत बोलावून घेऊन गेला. त्यानें दोन ताटल्यांत स्वादिष्ट मिठाई



आणून ठेवली. बदामाचा शिरा व डाळिंबाचा मुरब्बा चाखल्यावर अजीबला फार आनंद वाटला.

शिरा खात असतांना हसननें अजीबला विचारलें—"तूं कोण ? कोणाचा मुलगा" वगैरे. पण अजीबनें डोळ्यांतून टिपें काढीत उत्तर दिलें—"मी आपल्या वडिलांचा शोध काढण्यासाठींच निघालों आहें. माझे आजोबा पण माझ्या वडिलांचा शोध काढायला निघाले आहेत." इतकें सर्व बोलणें चालू असतां हसनला सुचलें नाहीं कीं त्याच्या शोधार्थंच ते सर्व निघाले आहेत.











शिरा व मुरब्बा दोन्ही इतके स्वादिष्ट होते कीं अजीव व सैयद दोघांनीं आणखी मागून घेतला. उशीर झाला होता म्हणून दोघे आपल्या पडावाच्या जागीं घाईघाईनें निघाले.

अजीव निघून गेल्यावर हसनला चुकल्या चुकल्यासारखें वाटूं लागलें. त्या मुलाला पाहिल्यापासून त्याच्या मनाला चुटपुट वाटूं लागली होती. लोहचुंबकासारखा तो मुलगा हसनला जणुं कांहीं आपल्याकडे ओढीत होता. त्यानें दुकान बंद केलें व अजीवच्या मागून धांवूं लागला.

सैयदनें मागें वळून पाहिलें. दुकानदार धांवत येत असलेला पाहून त्याला भीति वाटली. म्हणाला–"तो पहा, दुकानदार आपल्या पाठीमागून येत आहे. तो तुमच्या आजोबांना जाऊन भेटला तर त्यांना सर्व कळेल व मला शिव्या खाव्या लागतील." उगाच त्याला भिण्याचें एवढें कारण काय? आपण आपल्या वाटेनें चालत आहों तो आपल्या वाटेनें चालेल. त्यांत एवढें भिण्याचें कारण काय? तो आंत पडावांत शिरला तर जें कांहीं करावयाचें तें करूं."

परंतु हसन नगराबाहेर देखील दोघांचा पाठलाग करीत येत आहे असें दोघांना वाटलें. तो पडावांत देखील शिरला तर वजिरांना सर्व कांहीं कळेल व ते रागावतील या भीतीनें सैयदनें एक दगड उचलला व तो हसनला मारला. तो नेमका त्याच्या कपाळाला लागला व तो घेरी येऊन जमिनीवर पडला. त्याचें सर्व तोंड रक्त बंबाळ झालें होतें.

कांहीं वेळानें हसनला शुद्ध आली. त्यानें आपल्या पगडीची एक चिंधी फाडून ती कपाळाला बांधली. त्या मुलाच्या पाठीमागें जाण्यांत आपलीच चूक होती असें मनाचें समाधान करून तो दुकानाकडे परत आला.

[पुढील अंकीं संपूर्ण]





# आण्याचें भांडवल

एका गांवीं लखू एका इनामदाराकडे कामाला लागला. तो इनामदारांच्या गोठ्याजवळ एक झोंपडी बांधून रहात असे. त्याच्या संसारांत तो, त्याची बायको व तीन मुलें होतीं. जमीनदार जो पगार देई त्या मिळकतीवर कष्टानें त्याच्या सर्व कुटुंबाचा उदर निर्वाह होई.

एकदां रात्रीं लखूला त्याची बायको म्हणाली–"या इनामदाराच्या घरीं कित्येक वर्षें आपण राबलों. पण स्वतःचें पोट भरत नाहीं व या पाटीभर पोरांचें कसें व्हायचें पुढें? आपल्या भाग्यांत आयुष्यभर ही गरीबीच लिहिली आहे का?"

लखू म्हणाला–"व्यापार करून पाहिजे तितका पैसा मिळवतां येईल. पण व्यापार करायला भांडवलच कोठें आहे आपल्याकडे? मला मूर्ख अडाणी समजूं नकोस. फक्त एका आण्याचें भांडवल जरी मिळालें तरी तें पुरेल हजार हजार रुपये मिळवायला. पण तो एक आणा कोठें आहे आपल्याजवळ?"

नवरा-बायकोचें तें बोलणें भिंती पाठीमागून इनामदार ऐकत होते. पाहूं या तर एका आण्याच्या भांडवलावर लखू हजार हजार रुपये कसे मिळवितो, असा विचार करून इनामदारांनीं एक आणा लखूच्या झोंपडीकडे फेंकला.

दुसऱ्या दिवशीं लखूची बायको केर काढीत असतां तिला तो सांपडला. तो नवऱ्याला देत ती म्हणाली–"एक आण्याचें भांडवल मिळालें तरी पुरे असें म्हणाला होता ना? हा पहा आणा, देवानेंच दिला आहे."

लखू तो आणा घेऊन इनामदाराकडे गेला व म्हणाला–"हा आणा गोठ्यांत मिळाला. तुमचाच असावा. घ्यावा."

इनामदारानें तो आणा घेऊन खालून वरून नीट पाहिला व म्हणाला—"हा आणा माझा नाहीं. तुला मिळाला आहे. ठेवून घे. याचा कधीं उपयोग होईल."

लखू इनामदारांचा निरोप घेऊन निघून गेला. तो एका सावकाराकडे गेला. तो सावकार लहान लहान रकमा लोकांना उधार देत असे. तो सावकाराला म्हणाला—"हा आणा अगाऊ व्याज म्हणून घ्या व मला एक रुपया कर्ज द्या. संध्याकाळपर्यंत आपला रुपया परत करतों."

त्याच्याकडून एक रुपया घेऊन लखू त्याच्याहून मोठ्या सावकाराकडे गेला. त्याला एक रुपया व्याजाचा म्हणून देऊन त्याच्याकडून दहा रुपये कर्ज मागून घेतले व दुसऱ्या दिवशीं परत करतों म्हणून सांगितलें.

दहा रुपये व्याज म्हणून आणखी एका सावकारानें ठेवून घेतले आणि लखूला शंभर रुपये देऊन त्याच्याकडून कागद लिहून घेतला. तो घेऊन जाऊन लखूनें एका मोठ्या सावकाराकडे नेऊन दिले व त्या व्याजावर एक हजार रुपये मागून घेतले. दहा दिवसांत गहूं विकल्याबरोबर परत करण्याचें वचन पण दिलें. अशा तऱ्हेनें त्यानें चातुर्यानें एक हजार रुपयांचें भांडवल उभें केलें.



सावकारानें लखूचें नांव गांव त्याच्या ओळखीच्या इनामदाराचें नांव वगैरे सर्व लिहून घेतलें व त्याला एक हजार रुपये दिले. त्याच दिवशीं त्यानें शंभर रुपयांचें, दहा रुपयांचें व एका रुपयाचें कर्ज फेडलें. घरीं गेल्यावर तो बायकोला म्हणाला—"पाहिलेंस एक आण्याच्या भांडवलावर किती रुपये घेऊन आलों आहे तें." असें सांगून त्यानें तिला उरलेले रुपये दाखविले व त्यानें काय काय केलें हें थोडक्यांत सांगितलें.

"ही काय मिळकत झाली? हें तर कर्ज आहे?" बायको म्हणाली.

"हें आहे भांडवल. या भांडवलावर आतां मी व्यापार करणार आहें व पैसे मिळवणार आहें." लखू म्हणाला.

सकाळीं उजाडल्यावर तो उठला व चार कोस दूर असलेल्या एका गांवीं गेला. त्या गांवांत ज्वारी उत्तम पिकत असे. पीक पण तयार होतें कापणीला. लखू शेतकऱ्यांना बोलावून म्हणाला—"या वर्षीं तुमचें उभें पीक मी विकत घेतों. तुम्हांला अगाऊ थोडे फार पैसे देऊन ठेवतों. या वर्षीं ज्वारी विकायची झाली तर प्रथम मी मला नाहींतर मी सांगेन त्याला द्यावी लागेल.











त्यानें प्रत्येकाला वीस, पंचवीस रुपये प्रमाणें पैसे वांटले व त्यांच्याकडून लिहून घेतलें. त्यानें ज्वारीची किंमत बाजारांत जी असेल ती द्यायचें कबूल केलें.

लखू शेतकऱ्यांना भेटून आल्यावर दोन तीन दिवसांनीं दुसरे व्यापारी त्या गांवीं गेले. परंतु गांवच्या सर्व पिकाची खरेदी कोणी दुसरा करून गेला आहे, हें ऐकून त्यांना आश्चर्य वाटलें. कारण त्या गांवच्या पिकावर प्रत्येकाला पुष्कळ फायदा मिळत असे.

चवकशी करतां व्यापाऱ्यांना कळलें कीं अमुक गांवचा लखूशेट नांवाचा कोणी व्यापारी अगाऊ पैसे देऊन गेला आहे. ते त्याचा शोध काढीत लखूच्या घरीं आले. ते म्हणाले—“बाबा, तूंच सर्व पीक विकत घेतलेंस आतां आमचीं पोटें कशीं भरायचीं? व्यापार आमचा वडिलार्जित धंदा आहे. तूं नवीन आहेस. म्हणून कांहीं पीक आमच्या वांट्याला पण येऊं दे.” व्यापाऱ्यांनी विनवणी केली.

“मी काय सर्व ज्वारी विकत घेऊन घरीं का ठेवणार आहें? मी तरी तें विकणारच. बाजारांत जाऊन विकण्याऐवजीं तुम्हांलाच देईन. ज्या किमतीवर माल विकत घेतां त्या किमतीवर कांहीं विकत नाहीं. तुम्हीच विचार करून जी रास्त किंमत असेल ती देऊन ज्वारी घेऊन जा.” लखुजी म्हणाला.

व्यापाऱ्यांनीं आपसांत सल्ला करून सर्व ज्वारी विकत घेतली. त्यांत लखुजीला हजार दोन हजारांचा फायदा झाला. लखुजीनें आपलें कर्ज फेडलें व एक हजार रुपयांची दोन तीन एकर जमीन खरेदी केली. एक घर बांधून सकुटुंब त्यांत राहूं लागला. इनामदारानें लखुजीची कर्तबगारी पाहून त्याला आदरपूर्वक निरोप दिला.





# शाप-मोचन

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ पुन्हां गेला व झाडावरचें प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ म्हणाला—“राजा! तुला या मध्यरात्रीच्या वेळीं इतके कष्ट सहन करीत असलेला पाहून मलयवतीचा शापग्रस्त राजा शूरसेन याची आठवण होते. कंटाळा येऊं नये म्हणून मी तुला ती गोष्ट सांगतों, ऐक!”

शूरसेन राज्य करीत असतां प्रजेला कधीं सुख लाभलें नाहीं. राजा स्वभावानें फार अत्याचारी होता. त्यानें निरनिराळ्या-प्रकारचे कर लावून प्रजेला पिळून काढलें. डोंगरी प्रदेशांत राहणाऱ्या लोकांना त्याची कारकीर्द आगदीं पसंत पडली नाहीं. त्यांनीं बंड केलें. त्यांनीं कायदेभंग सुरू केला व खजिन्यामध्यें जो कर भरावयाचा तो कर ते



प्रजेकडून स्वतः वसूल करून घेऊं लागले. राजानें त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं आपलें सैन्य पाठविलें. पण तें सैन्य बंडखोरांनाच सामील झालें. साधारण प्रजेच्या मनांत देखील बंडखोरांबद्दल सहानुभूति उत्पन्न होऊं लागली.

शूरसेन राजानें बंडखोरांची वाढती शक्ती पाहून चातुर्यानें काम करायचें ठरविलें. त्यानें बंडखोरांकडे आपले दूत पाठवून त्यांना भेटावयास बोलाविलें. बंडखोरांनीं कांहीं अटीवर राजाशीं संधी करण्याचें कबूल केलें. राजानें बंडखोरांच्या पुढाऱ्यांना एका सरोवराच्या काठीं बोलाविलें व ते आल्यावर विश्वासघात करून त्यांच्या मुसक्या बांधल्या व त्यांना त्या सरोवरांत ढकलून त्यांचा वध करविला. त्यानंतर त्यानें प्रजेचा फार छळ केला व कालक्रमानें तो वारला.

परंतु मेल्यानंतर त्याचा आत्मा त्या सरोवराच्या डोंगराळ प्रदेशांत कैदी होऊन गेला. यमदूतांनीं राजाला त्या डोंगराच्या एका गुहेंत आणून ठेवलें व गुहेचें दार बंद करून घेतलें. त्यांनीं त्याला एक मांजर दिलें. त्या मांजराची राखण करणें हीच एक करमणूक त्याला राहून गेली.

त्या घरांत यम दूतांनीं सोन्याचा सांठा करून ठेवला आणि राजाच्या कमरेला एक तलवार आणून बांधली.

नंतर यमदूत त्याला म्हणाले—"हें मांजर, हें सोनें व ही तलवार जोंपर्यंत तूं सोडणार नाहींस तोंपर्यंत तुला हा बंदीवास भोगावा लागेल. तुला कोठें जातां येणार नाहीं व या वस्तू सोडतां येणार नाहींत. कोणा साहसी माणसानें येऊन तुला या वस्तूंपासून सोडविलें तर तूं सुटशील. तोंपर्यंत येथेंच पडून खितपत रहा." असें सांगून यमदूत अदृश्य झाले.

राजाला ही शिक्षा कांहीं दिवस शिक्षा वाटली नाहीं. परंतु हळूहळू त्याला एकटेपणा नकोसा वाटूं लागला. ज्यानें राज्य केलें त्याला स्वतःचीं कामें स्वतःच करावीं लागत. अधिकार करायची संवय झाली होती, पण अधिकार कोणावर गाजवणार? म्हणून हा एकांत त्याला शिक्षेसारखा भासूं लागला. वर्षामागून वर्षे व शतकामागून शतकें गेलीं व त्या राजाची गोष्ट मात्र राहून गेली होती. ओळखीचा कोणी मनुष्य त्याला चारशें वर्षांत भेटला नाहीं. राजाचें भूत लोकांना त्या डोंगरांत दिसे. भुताचा डोंगर हेंच नांव त्या डोंगराला व भुताचें तळें हें नांव त्या सरोवराला पडलें. त्या बाजूला कोणी येत जात नसे. कोणी अजाण माणूस आलाच तर भुताला पाहून किंवा त्याचा आवाज ऐकून दूर पळून जात असे.

शूरसेनाला मुक्ति कशी मिळणार? मलयवती नगर देखील ओसाड पडलें.

त्या डोंगराशेजारीं एक खेडें होतें. त्या गांवांत एक जहागीरदार रहात असे. त्याच्या घरीं गोपू नांवाचा एक नोकर काम करीत असे. जहागीरदाराला वत्सला नांवाची एक मुलगी होती. जहागीरदार स्वभावानें एक अत्यंत गर्विष्ठ मनुष्य होता. म्हणून त्याच्याकडे कोणी येत जात नसे. वत्सलेला एकटेपणा वाटे. परंतु गोपूबरोबर गप्पा मारण्यांत तिचा वेळ निघून जाई. गप्पा गोष्टींचें रूपांतर हळूहळू प्रेमांत झालें. गोपूनें वत्सलेला विचारलें—"आपलें लग्न झालें तर तुला आपल्या बाबांचें घर सोडून रहावें लागेल."

"पण बाबा रागावले तर काय करायाचें?" वत्सलेनें विचारलें.

गोपूनें विचार केला कीं, मालकालाच विचारून पहावें. रागावतील थोडेसे. वत्सलेसाठीं एवढें केलेंच पाहिजे. थोडेंसें धाडस करून त्यानें जहागीरदाराला विचारलेंच. तें ऐकून जहागीरदाराला राग आला.












म्हणाला—"तूं लग्न करणार माझ्या मुलीशीं? मूर्खा! माझ्या डोळ्यासमोरून चालता हो नाहींतर तुझी बत्तीशीच पाडीन. पायाची वहाण पायांतच बरी! मी कोण आणि तूं कोण? माझ्या मुलीशीं लग्न करायला तुझी ऐपत काय? तिच्या वजनाचें सोनें आणून देईल त्याला मिळेल माझी मुलगी!"

वत्सलेशीं लग्नाची गोष्ट तर दूरच, त्याची नोकरी सुद्धां गेली. त्याला कित्येक दिवस काम मिळालें नाहीं. उपासमार होऊं लागली. निराश होऊन तो एकदां भुताच्या तळ्याकडे गेला. तितक्यांत त्याला कोणी तरी बोलावीत असल्याचा भास झाला. त्यानें वळून पाहिलें. तर एक विचित्र मनुष्याकृति त्याला दिसली. त्यानें भुताच्या डोंगराची गोष्ट ऐकली होती. त्यानें त्या आकृतीला विचारलें—"कोण तुम्ही? माझ्याशीं काय काम आहे?"

"मी शूरसेन राजा आहें! तूं थोडेंसें साहस करून मला मुक्त केलेंस तर तुला पाहिजे तितकें सोनें मिळेल. आपल्या पापकर्माचें फळ म्हणून मला शाप मिळाला. चारशें वर्षें तें भोगीत आलों आहें. माझ्यावर दया कर आणि मला यांतून मुक्त कर!" शूरसेन महाराजांचें भूत म्हणालें.

"ठीक आहे, मी येतों आज रात्रीं!" गोपू निश्चय करून म्हणाला. त्या दिवशीं रात्रीं गोपू डोंगराजवळ गेला तेव्हां तें भूत त्याची वाट पहात उभें होतें. गोपू आल्यावर तें त्याला म्हणालें—"तू भिऊं नकोस! थोडेंसें साहस दाखविलेंस तरी तुला यश मिळेल. पण मध्येंच तुझ्या मनानें कच खाल्ली तर मात्र तुला निराश व्हावें लागेल व मुक्ति मिळणार नाहीं. तूं धैर्य दाखविलेंस तर मला शापमुक्त केल्याचा पुण्यलाभ होईल व तुला अलोट सोनें मिळेल."

"तुम्ही सांगाल तें करायला मी तयार आहें. मला कोणाचें भय किंवा भीति नाहीं." गोपू म्हणाला.

शूरसेनानें गोपूच्या हाताला स्पर्श केल्याबरोबर दोघे डोंगराखालच्या एका विचित्र तळघरांत पोंचले. त्या घराला दरवाजे, खिडक्या वगैरे कांहीं एक नव्हतें. घरभर तलवारी, भाले, धनुष्यबाण होते. एका बाजूला एक मोठें पिंप मोहरांनीं भरलेलें होतें.

गोपाळ तें सर्व दृश्य पहात उभा होता. तेवढ्यांत एक मांजर वाघासारखें डरकाळ्या फोडीत तेथें येऊन उभें राहिलें. हळूहळू तें
















मोठें होऊं लागलें. त्याला पाहून पाहणाऱ्याला भीतिच वाटायची.

"ही माझी भाटी आहे. हिला उचलून पहिल्यानें त्या तळ्यांत नेऊन टाक. ती डरकाळ्या फोडील, चावेल, ओरबाडील. पण तूं न भितां, न कचरतां तोंडांतून एक शब्द देखील न काढतां तिला नेऊन तळ्यांत टाक. जर का तूं भ्यालास अन् ओरडलास तर मला मुक्ति मिळायची तर दूरच, तुला देखील मिळणार नाहीं. शूरसेन म्हणाला.

गोपू कांहीं एक बोलला नाहीं कीं भ्याला नाहीं. त्यानें चटकन त्या भाटीला उचललें. शूरसेनानें गोपूच्या अंगाला स्पर्श केल्याबरोबर त्या गुहेची दगडी भिंत दुभंगली व गोपूला बाहेर जायला दरवाजा दिसला. तो झपाझप पावलें टाकीत त्या तळ्यापर्यंत आला आणि काठावर उभा राहून त्यानें त्या भाटीला पाण्यांत टाकलें. ती भाटी गोपूला चावली आणि जोरजोरानें त्याचे दोन्ही हात ओरबाडून काढले. पण त्यानें कळ चेपून धरली व तोंडावाटे थोडा देखील आवाज येऊं दिला नाहीं.

त्यानें तळ्यांत जाऊन हात धुतले. पण तळ्यांत हात घातल्याबरोबर जें पाणी थंडगार होतें तें उकळूं लागलें. वाफेनें त्याचें तोंड व हात भाजले. पण त्यानें तें सर्व सहन केलें व ज्या वाटेनें तो आला होता त्या वाटेनें परत शूरसेन महाराजांजवळ आला.

"शाबास, तूं खरोखरच शूर आहेस. मला खास मुक्ति मिळणार व तुला आपल्या प्रयत्नांत यश मिळणार. आतां माझ्या कमरेला ही जी तलवार आहे ती सोडून टाक. या खेपेस देखील होतील ते कष्ट सहन करावे लागतील." राजानें बजावून सांगितलें.

गोपूला त्यांत कांहीं विशेषसें वाटलें नाहीं. तो शूरसेन महाराजांजवळ गेला व त्यांच्या कमरेची तलवार सोडण्यासाठीं दोरीला हात लावला मात्र, त्याबरोबर शूरसेन महाराज राक्षसासारखे मोठे झाले व गोपू त्यांच्या गुढग्या एवढा दिसूं लागला. पण तो भ्याला नाहीं कीं त्याचा धीर खचला नाहीं. त्यानें तलवार ज्या दोरीला बांधली होती ती पायाच्या बोटांवर उभें राहून सोडली. पण ती तलवार एकदम जमिनीवर पडून त्याच्या पायावर पडली. दोन्ही पाय रक्तबंबाळ झाले. तरी ती कळसुद्धां त्यानें सोसून घेतली.

"बाळ तूं मला चारशें वर्षांच्या या कैदेतून मुक्त केलें आहेस. हें पिंप भरून जें सोनें आहे तें सर्व तुझें. आतां मी जातों. या सर्वांचा मालक तूंच." शूरसेन म्हणाला व एकदम अदृश्य झाला.

गोपूनें, त्याला उचलून नेतां आलें तितकें सोनें उचलून घेतलें. तें सोनें त्याला मिळालें नसतें तर कदाचित तें सारें स्वप्न ठरलें असतें. गोपूनें दोन तीन खेपा करून सर्व सोनें नेऊन जहागीरदारांच्या दारांत नेऊन टाकलें व म्हणाला—"करा वजन आपल्या मुलीचें."

तुम्ही मागितलें होतें त्याच्या दहावीस पट हें सोनें आहे. आतां तुम्हांला आपल्या










मुलीशीं माझें लग्न करून द्यायला हरकत नसेल. जहागीरदार तर थक्कच झाला. त्यानें आपल्या मुलीचें लग्न गोपूशीं करून दिलें.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें– "राजा! मला हें कळत नाहीं कीं जिवाला धोका आहे हें माहीत असून सुद्धां गोपूनें त्या संकटांत डोळे मिटून उडी कशी काय घेतली? सोन्याच्या लोभानें कीं वत्सलेशीं विवाह व्हावा म्हणून? किंवा आतां वत्सलेशीं लग्न तर होणारच नाहीं. मग जगून तरी काय उपयोग असा विचार करून त्यानें स्वतः होऊन आत्महत्त्येच्या भावनेनें उडी घेतली किंवा शापग्रस्त म्हाताऱ्या शूरसेन महाराजांवर त्याला दया आली म्हणून? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्याचा परिणाम काय होईल हें मी तुला निराळें सांगण्याची गरज नाहीं डोक्याची शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील, हें तुला माहीतच आहे."

विक्रमार्क म्हणाला–"गोपू स्वभावाचा भितरा असता तर धनलोभामुळें, किंवा आपल्या प्रेमिकेच्या प्रेमामुळें किंवा शूरसेन महाराजांवर उत्पन्न झालेल्या दयेमुळें तो साहसी शूर झाला नसता. तो जात्याच शूर व साहसी होता. म्हणूनच त्यानें स्वतः होऊन आपल्या मालकाला त्याच्या मुलीवर त्याचें प्रेम बसल्याचें उघड उघड सांगितलें व तिच्याशीं लग्न करण्याची इच्छा असल्याचें पण सांगायला त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. अर्थातच त्याच्या साहसीपणास बाहेरची प्रेरणा कारण नसून त्याच्या स्वभावांतला तेजस्वीपणाच कारण झाला."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.





# भीमू भीमराव झाला

भीमू आजीच्या गांवीं जात होता. वाटेंत एक जंगल होतें. तेथें झाडाला एक सुंदर घोडा बांधलेला पाहून भीमूला वाटलें, हा घोडा आपल्याला मिळाला तर किती गंमत होईल? भीमू घोड्याच्या सौंदर्याचें कौतुक करीत जवळ उभा होता.

मागें त्यानें घोड्यावरच्या स्वारीचें स्वप्न पाहिलें होतें व ऐकलें होतें कीं घोड्याची किंमत पांचशें रुपये आहे. चोरांना धरून दिल्याबद्दल त्याला पांचशें रुपये बक्षिस मिळाले होते. घोडा विकत घेण्याचें ठरविलें.

इतक्यांत झाडींतून एक मनुष्य धांवत आला. त्यानें भीमूला दरडावून विचारलें– "काय रे? कोण तूं? असा घोड्याकडे टक लावून काय पहात आहेस?"

"तूं हा घोडा विकलास तर मी विकत घेणार आहें!" भीमू म्हणाला.

त्यानें थोडा वेळ विचार करून विचारलें– "काय किंमत देशील?"

"तुला काय वाटतें, मी फुकटांत घोडा मागितला, होय? मला घोड्याची किंमत कळत नाहीं वाटलें वाटतें तुला. पांचशें रुपये! घे हे!" असें सांगून भीमूनें त्याला पैशाची पिशवी दिली.

त्या मनुष्यानें ती पिशवी घेतली व म्हणाला–"घेऊन जा पाहिजेतर घोडा! माझी ना नाहीं."

खरें पाहिलें तर तो घोडा त्याचा नव्हताच. कोणा जहागीरदाराचा होता. त्या जहागीरदाराला लतिका नांवाची एक सुंदर मुलगी होती. तिला स्वतः घोड्यावर उत्तम स्वारी करतां येत होती.

तिच्या बापानें तिचें स्वयंवर रचलें तेव्हां ही अट घातली कीं जो कोणी या घोड्यावर



स्वारी करूं शकेल त्यालाच मी आपली मुलगी देईन. त्या घोड्यावर स्वारी करणें म्हणजे थट्टा नव्हती. कित्येकांनीं घोड्यावर बसण्याचा प्रयत्न केला. पण एकालाहि यश मिळालें नाहीं व सर्वांची मान खालीं झाली.

अपमानित तरुणांपैकीं एकानें तो घोडा चोरून नेला. त्यानें रानांत एका झाडाला त्या घोड्याला बांधून ठेवलें आणि राखण करायला एक नोकर नेमला. त्या मनुष्यानें आतां हा फुकटांत मिळालेला घोडा भीमूला विकला. भीमूनें पन्नास रुपये दिले असते तरी त्या माणसानें तो घोडा त्याला दिला असता; पण भीमूला त्याची कल्पना नव्हती. त्याच्या डोक्यांत घोड्याची किंमत पांचशें रुपये असते ही गोष्ट घर करून बसली होती. जी गोष्ट एकदां त्याच्या डोक्यांत शिरत होती ती तेथें कायमचें घर करून बसे.

घोड्याच्या राखणदारानें विचारलें—"तुला घोड्यावर बसतां येतें का? कधीं बसला आहेस का घोड्यावर?"

"मी कधीं घोड्यावर बसलों नाहीं. पण त्यांत काय मोठेंसें?" भीमूनें उत्तर देत ऐटींत विचारलें.

"पहिल्यानें घोड्यावर बस. मग सोडतों घोडा!" राखणदार म्हणाला.

भीमू घोड्यावर बसल्यानंतर राखणदारानें घोड्याची दोरी सोडली. घोडा भरधांव पळूं लागला.

भीमूच्या अंगांत बळ पुष्कळ होतें. म्हणून त्यानें लगाम घट्ट धरला होता आणि दोन्हीं मांड्यांनीं घोड्याला घट्ट धरून ठेवलें होतें. म्हणून तो जमिनीवर आदळला नाहीं.

भीमू घोड्यावरून खालीं पडला नाहीं हें खरें, परंतु घोडा त्याच्या ताब्यांत नव्हता. घोडा नेईल तिकडे त्याला जावें लागत होतें. तो घोडा कोठें चालला आहे हें त्याला माहीत नव्हतें. तो निघाला होता आजीकडे. पण या घोड्याच्या नादीं लागला व घोडा नेईल तिकडे त्याला जावें लागलें. त्यानें निरुपायानें सर्व घोड्याच्या मर्जीवर सोडून दिलें.

घोडा सरळ येऊन जहागीरदाराच्या घरासमोर उभा राहिला. जहागीरदाराचे नोकर चकित होऊन घोड्याकडे पाहूं लागले. मोठ्यानें ओरडून म्हणाले—"चोरी गेलेला घोडा परत घरीं आला." असें म्हणत सर्व भीमूच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहाले.

भीमू त्यांना दटावून विचारूं लागला—"चोरी? बरेच! मी पांचशें रुपये रोख देऊन घोडा विकत घेतला आहे. तसें माझें नुकसान झालें नाहीं म्हणा. खूप पळतो आहे, शर्यतींतल्या घोड्यासारखा."

नोकर भीमूला घेऊन जहागीरदाराकडे गेले. भीमू एवढेंच म्हणाला—"चोरांना पकडून दिलें म्हणून मला राजानें पांचशें रुपये बक्षिस दिले. ते रुपये देऊन मी हा घोडा जंगलांत विकत घेतला. त्याच्यावर बसून मी आलों आहें."



लतिकेला घोडा परत आल्याचें कळलें व त्यावर बसून एक तरुण आल्याचें देखील कळलें. अशा बहाद्दराशीं लग्न करण्यासाठीं ती किती दिवसांपासून वाट पहात होती. तरी जहागीरदारानें भीमूला सर्व विचारायचें तें विचारून नंतर हें देखील विचारलें—"माझ्या मुलीशीं लग्न करायला तूं तयार आहेस का?"

"लग्न म्हणतां! माझ्या आजीला किती आनंद होईल! तिला वाटतें आहे कीं तिच्या नातवाचें लग्न होतें आहे कीं नाहीं?" भीमू म्हणाला.










"समज, मी आपल्या मुलीशीं तुझें लग्न करून दिलें तर तूं काय देशील?" जहागीरदारानें भीमूला विचारलें.

"माझ्या आजीनें हंडा भरून सोनें पुरून ठेवलें आहे. तें सर्व मी तुम्हांला देईन!" भीमू म्हणाला.

जहागीरदारानें विचार केला हंडाभर सोनें ज्याच्या आजीनें पुरून ठेवलें आहे. तो सामान्य मनुष्य असणें शक्य नाहीं चांगला श्रीमंत असला पाहिजे. म्हणून त्यानें भीमूला आपला जावई करून घ्यावयाचें ठरवून मुहूर्त पण ठरविला. आजीला व तिचें हंडाभर सोनें आणायला त्यानें आपले नोकर व डोली पाठविली.

ज्याला ती मूर्ख व खुळा म्हणत होती तो एका मोठ्या जहागीरदाराचा जावई होणार आहे हें ऐकून आजीला आश्चर्यच वाटलें. लग्न होईपर्यंत तोंड उघडायचें नाहीं असा विचार करून ती जहागीरदाराकडे लग्नाला आली. लग्न होईपर्यंत ती भीमूच्या मूर्खपणाविषयीं एक शब्ददेखील बोलली नाहीं. पण लग्न झाल्यावर मात्र आपल्या नातसुनेला म्हणाली—"संभाळ ग बाई आपल्या नवऱ्याला. वेडा म्हणजे अगदीं वेडा आहे. मी आजपर्यंत त्याला कसें बसें लहानाचें मोठें केलें. पुढें तो तुझ्या हातीं आहे. तो मूर्ख असला तरी सरळ मनाचा आहे. त्याला लोकांनीं फसवून लुबाडलें तरी, तो नाहीं कोणाला फसवणार.

लतिका हुशार होती. आजी जें कांहीं म्हणाली तें तिला सर्व कळलें. म्हणाली—"तुमच्या नातवाची जबाबदारी माझ्यावर. मी बाबांची एकटीच मुलगी आहे. म्हणून ते तुमच्या नातवाला येथेंच ठेवून घेतील."

आजी भीमरावांना सासुरवाडी एकटा ठेवून घरीं परत निघून गेली.

[पुढल्या महिन्यांत उरलेली गोष्ट]





# विद्येचा महिमा

देवगिरी नांवाच्या गांवीं सोमदेव नांवाच्या एका ब्राह्मणाला शंकरदेव व जयदेव अशीं दोन मुलें होतीं. मोठा मुलगा घरची शेती पाही. धाकटा जयदेव विद्याभ्यास करण्याचें ठरवून घर सोडून निघाला. चांगला गुरु मिळावा म्हणून तो गांवोगांव हिंडत होता.

जवळ पैसा नाहीं आणि खायला प्यायला तरी कधीं आहे तर कधीं नाहीं. अशा स्थितींत फिरत फिरत तो एका गांवीं हरिशर्मा नामक एका ब्राह्मणाच्या घरासमोर आला व घेरी येऊन बेशुद्ध होऊन पडला.

हरिशर्मानें त्याला पडतांना पाहिलें व घरांत उचलून घेऊन गेला. तोंडावर पाणी शिंपडून वारा घातल्यावर जयदेवला शुद्धी आली. अंघोळ करून तो पोटभर जेवला. नंतर हरिशर्मानें त्याला तो कोण, कशाला आला वगैरे विचारून घेतलें. त्याची विद्येची भूक ओळखून हरिशर्माला फार आनंद झाला. तो स्वतः फार मोठा पंडित होता. त्यानें जयदेवला आपल्या घरींच ठेवून घेतलें व त्याच्या विद्याभ्यासाची जबाबदारी स्वतःवर घेतली.

जयदेवची कुशाग्रबुद्धि पाहून हरिशर्मा चकित झाला. तीन वर्षांच्या आंत तो सकल विद्येंत पारंगत झाला. नंतर हरिशर्मा जयदेवला निरोप देत म्हणाला—"मुला, जोंपर्यंत तूं भिल्ल जातीच्या राजाकडून चोरी करणें वगैरे विद्या शिकून घेत नाहींस तोंपर्यंत तुझा विद्याभ्यास पुरा झाला नाहीं असें समज." तें ऐकून जयदेवला आश्चर्य वाटलें. पण ज्या गुरूनें तीन वर्षें इतक्या प्रेमानें त्याला शिकविलें तो अहिताची गोष्ट सांगणार नाहीं हें समजून जयदेव भिल्ल राजाकडे गेला.

हरिशर्मानें जयदेवला पाठविलें आहे हें ऐकून भिल्लांच्या राजानें त्याला आपल्याकडे



ठेवून घेतलें. चोरी करणें, चोरांना पकडणें, श्वापदांची हालचाल ओळखणें वगैरे विर्धेत जयदेवनें प्राविण्य संपादन केलें.

जयदेव घरीं निघाला. वाटेंत तो एका ब्राह्मणाच्या घरीं पाणी प्यायला थांबला. ब्राह्मणानें त्याला आदरपूर्वक घरांत बोलावून नेलें व त्याला गूळ खायला व पाणी प्यायला दिलें.

सर्व विद्याभ्यास पुरा करून जयदेव घरीं जात आहे हें ऐकून त्या ब्राह्मणानें त्याची परीक्षा घ्यायचें ठरविलें व त्याला दोन प्रश्न विचारले—"तूं येण्यापूर्वी येथें कोण कोण आला? व या घरासमोरून कोणकोण निघून गेले?"

जयदेव उठून बाहेर गेला व थोड्या वेळानें परत येऊन म्हणाला—"मी येण्यापूर्वी येथें चार जण येऊन गेले. ते सैनिक तरी होते नाहींतर राज्याचे अधिकारी तरी होते. ते आपल्या घरीं येऊन पुढें निघून गेले आहेत. त्यांच्याहून आधीं एक जण तुमच्या घरासमोरून गेला आहे. त्याच्या डोक्यावर किंवा खांद्यावर कोळशाचें पोतें होतें. त्यानें चोरी केली होती." जयदेवनें इतकें स्पष्ट वर्णन केलें.

तें ऐकून ब्राह्मण घाबरला. घरासमोरून चोर निघून गेला! घरांत कांहीं टाकलें तर नसेल ना? म्हणाला—" "तूं म्हणतोस तसे राज्याचे चार अधिकारी येऊन गेले खरे? राणीचा एक मणी देवळाजवळ कोठें तरी पडला. मणि हरवल्याची गोष्ट लक्षांत आली तोंपर्यंत तो कोणीतरी उचलून नेला होता. म्हणून राज्याचे अधिकारी राजधानीभर हिंडून प्रत्येक घराची झडती घेत आहेत. आमच्या घराची पण त्यांनीं झडती घेतली. पण चोरीला गेलेला मणी मिळाला नाहीं. तूं म्हणतोस तसा चोर आमच्या घरासमोरून गेला असल्यास त्याला पकडून देण्यास तूं मदत कर. राणी खूष होऊन तुला मोठें बक्षिस देईल."



जयदेव थोड्या वेळानें परत येतों असें सांगून रस्त्यानें निरखून पहात एका घरीं गेला. तें घर सोनाराचें होतें. तो घरांत गेला.

त्यानें सोनाराजवळ सोन्याची किंमत विचारली, करणावळ वगैरे किती होते हें विचारलें आणि त्यानें केलेल्या निरनिराळ्या दागिन्यांची किंमत पण विचारून घेतली. नंतर तो परत त्या ब्राह्मणाकडे येऊन म्हणाला—"मी चोरांना पकडवून देववितों. राज्याच्या अधिकाऱ्यांना बोलावून घ्या."

ब्राह्मणानें राज्याच्या अधिकाऱ्यांना कळविलें व जयदेवला विचारलें—"पण तुला कसें कळलें कीं चोर कोण आहे?"

"सैनिक किंवा युद्धकलेंत प्रवीण योद्धे चालतात तर शिस्तीनें चालतात. मी चौघांच्या पावलांच्या खुणावरून ते सैनिक असतील किंवा अधिकारी असतील हें ओळखलें. ते तुमच्या घरीं येऊन पुढें गेले हे देखील त्या खुणावरून मला कळलें." जयदेव निस्संकोच पणें म्हणाला.

"पण चोराला कसें ओळखलेंस?" ब्राह्मणानें विचारलें.



"चोर कधीं सरळ वाटेनें किंवा मधोमध चालत जात नाहीं. आडवाटेनें जातो किंवा रस्त्याच्या बाजूनें चालतो. त्या चोराच्या डोक्यावर कोळशाचें पोतें होतें. तो तें ओझें जागोजागीं उतरवून थोडा दम घेत जात होता. प्रत्येक वेळीं दोन तीन कोळसे खालीं पडत होते."

थोडा वेळ थांबून व थोडा विचार करून जयदेव पुढें म्हणाला—"त्याच्या पावलांच्या खुणांवरून हें देखील कळतें कीं तो मधून मधून मागें वळून पहात होता. कोणीतरी पाठीमागून त्याचा पाठलाग करीत आहे ही









शंका पदोपदीं त्याला वाटत असावी. त्याच्या पावलांच्या खुणा अधिकाऱ्यांच्या पावलांच्या खुणापेक्षां थोड्या अस्पष्ट झाल्या आहेत. त्यावरून तो त्यांच्या आधीं इकडून गेल्याचें कळतें. या अवधींत दुसरी चोरी झाल्याचें ऐकिवांत नाहीं. यावरून मणी चोरी करणारा चोर हाच असला पाहिजे असें माझें अनुमान आहे."

दोघे बोलत असतां अधिकारी येऊन पोंचले. जयदेव त्यांना सोनाराच्या घरीं घेऊन गेला. त्यांनीं त्या घराची झडती पहिल्यानें घेतली होती. पण त्यांनीं फक्त कपाट, पेटी वगैरे मुख्य मुख्य जागाच तपासून पाहिल्या होत्या.

सोनार कांहीं लपवावयाचें झालें तर तें कोठें तरी लाकडाच्या किंवा भिंतीच्या सांधींत ठेवतात, हें जयदेवला माहीत होतें. त्यानें राणीचा मणी अशाच एका सांधींतून हुडकून काढून दिला. सर्वांना आश्चर्य वाटलें.

सोनारानें आपला अपराध स्वीकार केला. कारण, त्याच्या घरांतूनच मणी निघाल्यावर त्याला सुटका मिळणें शक्यच नव्हतें. त्यानें कबूल केलें कीं मणी खालीं पडला त्या वेळींच त्यानें तो पाहिला व उचलून घरीं आणून ठेवून दिला. कोणाला त्याच्यावर संशय वाटूं नये म्हणून त्यानें कोळशाचें एक पोतें विकत घेतलें व जणुं कांहीं तेथूनच तो घरीं आला हें त्याला दाखवायाचें होतें.

राजानें खूष होऊन जयदेवाला मोठें बक्षिस दिलें व त्यानें सर्व विद्या संपादन करून राज्याला उपयोगी पडेल अशा विद्येंत प्राविण्य मिळविलें आहे हें पाहून त्याला आपल्या पदरीं नोकरी दिली.

हरिशर्माला हें सर्व कळलें तेव्हां त्याला फार आनंद झाला. सोमदेव आपल्या मुलाकडेच येऊन राहूं लागला.





# अयोध्याकांड

त्या दिवशीं रात्रीं भारद्वाज ऋषींनीं राम, लक्ष्मण व सीता यांस प्राचीन काळांत होऊन गेलेल्या ऋषी मुनींच्या गोष्टी सांगितल्या. त्यानंतर सीता राम झोपीं गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं भारद्वाज ऋषी निरोप द्यायला म्हणून रामाबरोबर आश्रमाबाहेर आले व चित्रकूट जाण्याचा मार्ग त्यांनीं छान समजावून सांगितला.

सीता, राम व लक्ष्मण भारद्वाज ऋषींना नमस्कार करून यमुना नदीच्या तीरावर आले. तेथें घाटावर बसून लक्ष्मणानें यमुना नदी पार करण्यासाठीं झाडाच्या फांद्या तोडून व त्या वेलींनीं बांधून एक नाव तयार केली. त्यावर सीता रामांस बसण्यासाठीं त्यानें जांभळाचीं कोंवळीं पानें अंथरलीं. त्या जुजुबी नावेंत बसून सर्व नदीपार पोंचले.

नाव यमुना नदींत चालू असतां सीतेनें यमुनेला नमस्कार करून सुखरूप परत येण्यासाठीं वर मागितला व परत आल्यावर गोदान करण्याचें वचन दिलें.

वसंत ऋतु होता. प्रकृतीचें रूप फारच प्रेक्षणीय होतें. झाडें रंगी बिरंगी फुलांनीं शोभिवंत दिसत होतीं. ती शोभा पाहून सीतेच्या मनाला फार आनंद झाला.

लक्ष्मण पुढें वाट दाखवीत चालला होता. सीताफळें दाखवून त्यांचीं नांवें विचारी व तीं घेऊन यायला सांगे. वाटेंत सोयीस्कर अशी जागा पाहून ते झाडाखालीं विश्रांति



घेत ते चित्रकूट पर्वतावर येऊन पोंचले. रामानें लक्ष्मणाला एक पर्णकुटी तयार करण्यास सांगितलें. लक्ष्मणानें त्याप्रमाणें एक कुटी तयार केल्यावर सीता रामांनीं गृहदेवतेची पूजा करून पर्णकुटींत प्रवेश केला.

पर्णकुटीपासून जवळच माल्यवती नदी होती. तेथें ते रोज स्नानाला जात. चित्रकूट वनाची शोभा पहात सीताराम आनंदानें राहूं लागले. लक्ष्मण नित्य त्यांच्या सेवेस हजर राही. त्यानें त्यांना कोणत्याहि वस्तूची उणीव भासूं नये याची काळजी बाळगली.

तिकडे शृंगवेरपुरीं गुह व सुमंत्र, गंगा काठावर उभे राहून सीताराम दृष्टीआड होईपर्यंत त्यांच्याकडे टक लावून पहात उभे राहाले. नंतर गुह सुमंत्राला आपल्या घरीं बोलावून घेऊन गेला.

रामाचा विचार कदाचित बदलेल व त्याला बरोबर घेऊन जातां येईल असा विचार करून सुमंत्र गुह निषादाच्या घरीं दोन तीन दिवस राहिला. परंतु राम परत न आल्यामुळें निराश होऊन अयोध्येला निघाला. रामानें अयोध्या सोडल्या नंतर बरोबर पांच दिवसांनीं सुमंत्र परत आला.

रिकामा रथ पाहून लोक तऱ्हेतऱ्हेचे तर्क करूं लागले. सुमंत्र मान खालीं करून सर्व ऐकत सरळ कौशल्येच्या महालांत आला. तेथें दशरथ अगदीं निराश होऊन बसला होता. सुमंत्रानें राम वनगमनाचें वर्णन थोडक्यांत सांगून किती आग्रह केला तरी राम परतला नाहीं हें देखील सांगितलें.

दशरथाला मूर्च्छा आली. कौशल्या व सुमित्रा दोघींनीं दुःखी पतीला सावध करून बसविलें. कौशल्या म्हणाली—"महाराज, सुमंत्र रामाला वनांत पोंचता करून आला आहे. त्यानें रामाचा निरोप आपल्याला सांगितला. त्याच्याजवळ बोलणार नाहीं का! कैकेयीची भीति वाटते का महाराजांना! ती इकडे आलेली नाहीं." तें ऐकून दशरथ स्वतःला आवरूं शकला नाहीं. त्याच्याबरोबर अन्तःपुरांतील सर्व स्त्रिया रडूं लागल्या.

"माझ्या आज्ञेचें किती महत्व आहे हें मला देखील कळत नाहीं. सुमंत्रा, तूं जाऊन रामाला परत बोलावून घेऊन ये. नाहींतर मला रामाजवळ पोंचता कर." दशरथ म्हणाला.

कौशल्येनें रामाजवळ घेऊन जायला सुमंत्राला सांगितलें. सुमंत्रानें कौशल्येला धीर देत म्हटलें—"महाराणी! महाराज दुःखी आहेत. त्यांना धीर देणें आपलें कर्तव्य आहे. आपणच धीर सोडलांत तर या प्रसंगीं कोण काय करूं शकणार!" राम लक्ष्मणांना रानांत कष्ट होणार नाहीं असेंहि सांगितलें व म्हणाला—"सीतेला रामाशिवाय अयोध्येंत वनगमनाहून जास्त दुःख झालें असतें.

दुसऱ्या दिवशीं दशरथाला त्याच्या तरुण वयांतली एक गोष्ट आठवली. तोंपर्यंत त्याचा कौशल्येशीं विवाह झाला नव्हता. त्याला एका अंध जोडप्यानें शाप दिला होता कीं त्याला पुत्रशोकामुळें मरण येईल. राजानें



ती गोष्ट कौशल्येला सांगितली. दशरथ म्हणाला—

"मी ऐन तारुण्यांत होतों नियमितपणें शिकारीला जात असें. शब्दभेदी बाण मारण्यांत माझा हातखंडा होता. सर्व माझी स्तुती करीत. मी संध्याकाळीं शरयू नदी काठच्या वनांत जाऊन शब्दभेदी बाण मारण्याचा अभ्यास करीत असें. मी युवराज होतों. कोणाची पर्वा नव्हती. रानांतून नदीवर पाणी प्यायला श्वापदें येत. मी कोठें तरी झाडावर लपून बसे व तेथून शिकार करीत असें.














असाच एकदां मी शिकारीला गेलों होतों. पावसाळा होता. दाट काळोख पडला होता. मी श्वापद पाणी प्यायला येईल म्हणून झाडावर चढून वाट पहात बसलों होतों. मला दुरून 'बुड बुड' असा आवाज ऐकूं आला. वाटलें कीं हत्ती पाणी पीत असावा. मी एक शब्दभेदी बाण सोडला आणि आश्चर्य म्हणजे तिकडून कोणी तरी तरुण रागानें ओरडला—"आमच्यासारख्या तपस्वी ब्राह्मणांवर हा बाण कोणी सोडला? मी कोणता असा अपराध केला आहे कीं माझा असा अमानुष वध होत आहे! माझा वध करून माझा जीव घेणाऱ्याला तरी काय मिळणार आहे? एका बाणानें माझे पंचप्राण हरण करणारा तो दुष्ट कोण आहे? आतां माझ्या वृद्ध व अंध माता पित्यांचें कोण रक्षण करणार?"

माझ्या मनांत धस्स झालें. मी जवळ जाऊन पाहिलें तेव्हां मला एक मुनि बालक जमिनीवर तडफडत असलेला मला दिसला. अर्धवट भरलेलें पाण्याचें भांडें बाजूला पडलें होतें.

दशरथाला खालीं मान घालून समोर उभा पाहून तो म्हणाला—"हें नीच कार्य तूं कां केलेंस? जा, माझ्या बाबांना जाऊन सांग मी येथें आहें. नाहींतर त्यांना कळणार नाहीं. आणि कळलें तरी त्यांना येथवर येणें शक्य नाहीं. त्यांना तहान लागली होती म्हणून पाणी घेऊन येण्यासाठीं मी आलों होतों आणि मी हतभाग्य हा बाण लागल्यामुळें येथें पडलों आहे. हा माझ्या छातींत बाण बोचत आहे. मरण्यापूर्वी काढून टाक."

बाणाचें टोक त्याच्या छातींत खुपत होतें. त्याचा तो दुःखावेग मला असह्य वाटला. बाण काढून टाकला तर त्याच्या



जीव जाणार, न काढावा तर त्याचें ओरडणें असह्य वाटत होतें. मी विचार करीत उभा होतों. पण शेवटीं बाण काढला. त्याबरोबर त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

त्या मुलानें टाकलेलें मडकें भरून पाणी घेऊन त्यानें सांगितलेल्या वाटेनें मी त्याच्या आईबापाच्याजवळ गेलों.

कोणी येत असल्याची चाहूल ऐकून दोघांना वाटलें कीं मुलगा आला. बाप म्हणाला—"बाळा श्रवणा! बराच वेळ लागला कीं रे तुला पाणी आणायला. लवकर दे पाणी!" "मी आपला श्रवण नाहीं. एक क्षत्रिय राजकुमार आहें!" भीत भीत मी म्हणालों आणि घडलेली गोष्ट सांगून चुकी-बद्दल माफी मागितली.

दोघे वृद्ध माझा हात धरून त्यांच्या मुलाच्या प्रेतापर्यंत चालत गेले व शोक करूं लागले. वृद्ध ब्राह्मणानें मला शाप दिला कीं तूं निष्कारण माझ्या मुलाचा वध केलास आणि आम्हां दोघांना दुःख सागरांत लोटलेंस. म्हणून तुला देखील पुत्र शोका-मुळेंच मरण येईल.

नंतर थोड्या वेळानें त्या दोघांचें देखील प्राणोत्क्रमण झालें."

गोष्ट सांगून दशरथ रडूं लागला. तो शाप आठवून तो म्हणाला—"आतां मला सुटका नाहीं. केल्या कर्मांचीं फळें भोगावींच लागतात." बोलतां बोलतां त्याचा कंठ दाटून आला. त्याची दृष्टी मंद पडूं लागली व कोण काय बोलत आहे हें ऐकूं येत नासें झालें. "हे राम! हे राम!" चा घोष करीत व कैकेयीला शाप देत मध्य रात्रीच्या सुमारास राजानें प्राण सोडला.

त्या वेळीं अंतःपुरांतील सर्व स्त्रिया झोंपल्या होत्या. सर्व राजधानीपण शांतपणें झोंपली होती.



दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती मृत्युवार्ता शहर भर पसरली व अयोध्या नगरी शोक सागरांत बुडून गेली. सर्व कैकेयीची निंदा करीत होते कीं, तिनें आपल्या हट्टामुळें राज्याचें नुकसान केलें आहे. तिला तरी काय सुख मिळणार आहे!

कांहीं वेळानें वशिष्ठ ऋषी आले. राजाची अन्त्येष्टी करण्यास एकहि मुलगा अयोध्येंत नव्हता. राम-लक्ष्मण वनांत होते व भरत-शत्रुघ्न आजोळीं गेले होते. म्हणून वशिष्ठ मुनींच्या आज्ञेनें राजाचें शरीर तेलांत बुडवून ठेवण्यांत आलें.

नंतर वशिष्ठ मुनींनीं सिद्धार्थ, विजय, जयंत, अशोक व नंदन या विश्वासपात्र दूतांना बोलावून त्यांना भरताला घेऊन यायला पाठविलें. त्यांनीं सर्वांना बजावून सांगितलें कीं तुम्ही भरताला जाऊन एवढेंच सांगा कीं मी बोलाविलें आहे. कारण सांगण्याची आवश्यकता नाहीं. जर त्यांनीं राजाचा कुशल समाचार विचारला तर एवढेंच सांगा कीं कांहीं तरी विशेष कामासाठीं मी बोलाविलें आहे. रामानें वनगमन केलें आहे हें देखील तुम्ही सांगतां कामा नये. राम कोठें आहे हें आम्हांला माहीत नाहीं असें सांगा."



नंतर वशिष्ठ ऋषींनीं भरताकरितां उत्तमोत्तम वस्त्रें उपहार म्हणून दूतांबरोबर पाठविलीं.

दूत निघाले. नद, नदी व पर्वत पार करीत ते यथावेळीं केकय राज्यांत येऊन पोंचले. वशिष्ठ ऋषींनीं दिलेलीं वस्त्रें व भेट देऊन त्यांनीं निरोप सांगितला. त्यांनीं भरताचे मामा केकैयराज यांनापण नमस्कार करून वस्त्रें व उपहार दिले व वशिष्ठ ऋषींनीं सांगितलेला निरोप कळविला. सर्वांना आश्चर्य वाटलें.

भरत आपल्या मामांचा निरोप घेऊन अयोध्येला निघाला. त्याच्या मनांत निर-






निराळ्या प्रकारच्या शंका कुशंका येत होत्या. भरताबरोबर अयोध्येहून जे लोक आले होते ते देखील निघाले.

भरत व शत्रुघ्न दोघांचा रथ बराच पुढें निघून गेला. बाकी लोक पाठीमागून सावकाश येत होते. सात दिवसांच्या प्रवासानंतर सर्व अयोध्येला येऊन पोचले.

ज्या दिवशीं अयोध्येचे दूत आले त्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं भरताला स्वप्न पडत होतीं. अयोध्येंत प्रवेश करीत असतां भरताला त्या स्वप्नांची आठवण झाली. कारण राजधानीवर प्रेतकळा आली होती. सर्व नगर शोभाहीन दिसत होतें.

भरताला तें पाहून आश्चर्य वाटलें. दूत कांहीं बोलत नव्हते. वाटेंत जो कोणी भेटे तोंड फिरवून किंवा खालीं करून निघून जाई. त्याला जास्तच काळजी वाटूं लागली. हें सर्व असें कां?

तो सरळ दशरथ महाराजांच्या महालाकडे गेला. तेथें महाराज नाहींत हें पाहून भरत आईच्या महालाकडे गेला. त्याला पाहून कैकेयी आनंदानें धांवत आली. भरतानें तिला नमस्कार केला. तिनें मुलाला कैकेय राज व माहेरच्या लोकांचा कुशल समाचार विचारला.

भरतानें सर्व प्रश्नांचें थोडक्यांत उत्तर दिलें आणि विचारलें—“आई, आमचा दादा राम कोठें आहे आणि बाबा कोठें आहेत? ते आपल्या महालांत दिसले नाहींत. म्हणून मी इकडे आलों. पण ते येथें देखील दिसत नाहींत. विचारलें तर कोणी सांगत नाहीं. कौशल्या मातेकडे आहेत का?”

कैकेयी म्हणाली—“बाळा! तुझेवडील आपल्या पितृलोकांत गेले आहेत.” असें सांगून कैकेयीनें भरताला दशरथ राजाच्या मृत्यूचा समाचार सांगितला. तें ऐकून भरत बेशुद्ध होऊन पडला.





# रक्तलांछित सुरी

[ ३ ]

[लखूच्या गाईंबरोबर जो एक शिंगी घोडा चरत होता त्यानें ब्रह्मपुराचे सेनापती व त्याच्या दोघां सैनिकांना ठार केलें. एक सैनिक स्वतःचा जीव वांचवून राजधानीत परत गेला व त्यानें ती बातमी राजाकडे पोंचती केली. गांवांत अफवा उठली कीं शत्रूचा कोणी हेर राजधानी शेजारच्या रानांत गुरें चरायला घेऊन येतो व त्याला धरून आणण्यासाठीं राजाचे शिपाई गेले आहेत. तें ऐकून लखूचा बाप महादू मुलाच्या रक्षणासाठीं तलवार घेऊन धांवला. पुढें वाचा.]

ापाच्या तोंडून सर्व वृत्त ऐकून लखू चकित झाला. जवळच गुरांबरोबर रत असलेल्या त्या एकशिंगी घोड्याकडे ट दाखवीत तो बापाला म्हणाला–"मी ाल रात्रीं ज्या घोड्याविषयीं तुम्हांला ांगितलें तो हाच घोडा. त्याचें शिंग व ंड पहा कसें रक्तबंबाळ झालें आहे. त्या वरून त्यानें सेनापति व सैनिकांचा मुडदा पाडला असावा असें मला देखील वाटूं लागलें आहे.

महादूचें लक्ष इतका वेळ मुलावर होतें. त्यानें त्या घोड्याला पाहिलें तेव्हां दचकून तो दोन पावलें मागें सरकला. पण लखू आपल्या वडिलांना जवळ बोलावून घेऊन




गेला. म्हणाला—"हा क्रूर आहे यांत शंका नाहीं. पण कां कोणास ठाऊक माझ्याजवळ तो अगदीं गोगलगाईसारखा वागतो."

"म्हणजे गांवांत उडालेली बातमी खोटी नाहीं आणि सेनापती व दोघां सैनिकांना यानें ठार केलें आहे म्हणावयाचें. राजाचे शिपाई इकडेच येत आहेत. ते तुलाच संशयावर धरणार व मारहाण करणार! म्हातारा म्हणाला."

"सेनापतीनें स्वतःच घोड्यावर अत्याचार करून स्वतःचें मरण बोलावून घेतलें त्याला कोण काय करणार! त्यानें त्याच्या गळ्यांत दोरी बांधली व त्याला धरून ओढून घेऊन चालला. घोड्यानें स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं सेनापती व दोघे सैनिक तिघांना ठार केलें असावें." लखू म्हणाला.

"ते संशयावर तुला व मला धरून घेऊन जाणार. तूं कोठें तरी पळून कां नाहीं जात. तुझ्या आजोबांची ही तलवार आहे. ते वारले तेव्हांपासून ती खुंटीला टांगून ठेवलेली होती. ही तुझ्या हातांत असल्यावर तुला कसलीच भीति नाहीं. शिपायाच्या हातीं कैदेंत खितपत पडून राहण्यापेक्षां युद्ध करून मरण आलें तरी पत्करेल." म्हादू म्हणाला.

लखूनें बापाजवळून तलवार घेत विचारलें—"मग बाबा, तुम्ही एकटे येथें राहून काय करणार!"

"मी!....मी स्वतःचें रक्षण कसें तरी करून घेईन. तसा या जगांत आतां किती दिवसांचा पाहुणा राहिलों आहें! गाईंना रानांत पिटाळून देईन आणि कोठें तरी रानांतच लपून राहीन. त्यांच्या नजरेसमोर आलें नाहीं म्हणजे झालें."

दोघे बोलत उभे होते. तितक्यांत दुरून धुळीचे लोट त्यांना दिसले. त्यावरून सैनिक येत असावेत असें त्यांनीं अनुमान केलें.

बापानें मुलाकडे व्याकूळ नजरेनें एकदां पाहिलें. लखू लगेच आपल्या एकशिंगी घोड्याजवळ जाऊन उभा राहिला व त्याची मान खाजवूं लागला. म्हणाला—"बाबा! त्या सैनिकांच्या हातांतून निसटून जायचें म्हणजे याच्या मदतीची गरज आहे. हा खात्रीनें माझें रक्षण करील. याच्यावर बसतों. तो नेईल तिकडे जातों."

तो घोडा डोळे मिटून स्वस्थ उभा राहिला. लखूनें घोड्यावर टांग टाकली व टांच मारून चालायला खूण केली. त्याबरोबर तो भरधांव पळूं लागला व डोंगरापलीकडच्या खोऱ्याकडे निघाला.

घोड्याचा वेग पाहून लखू प्रथम घाबरला, पण त्यानें त्याची आयाळ घट्ट धरून ठेवली होती. तरी हात सैल झाले तर खालीं आपटून कपाळमोक्ष होणार. देवावर भरंवसा ठेवून तो त्या घोड्यावरून चालला होता.

घोडा दगडावर, खडकावर, जमिनीवर एकाच वेगानें धांवत होता. त्याचे पाय सरकत नव्हते की वेग कमी होत नव्हता.

घोडा डोंगरांत शिरला. डोंगरावरच्या रानांत रानटीं श्वापदें होतीं. वाघ, सिंह, हत्ती, अस्वलें वगैरे वगैरे. भयंकर मोठमोठीं




झाडें व त्यांना विळखा घालून बसलेले अजगर पाहून लखू घाबरूनच गेला. या दरींतून जिवंत परत जायचें नांवच नको. या श्वापदांच्या तोंडीं मरण येण्यापेक्षां ब्रह्मपुराच्या सैनिकांच्या हातीं सांपडलें असतों तर त्यांत काय वाईट झालें असतें! हा एक शिंगी घोडा बाबांना वाटला तसा खरोखरच मायावी राक्षस दिसतो आहे. नाहीं तर तो मला फंसवून या भयंकर दरींत घेऊन आला नसता. पण उशिरां शहाणपण येऊन काय उपयोग! हा घेऊन जाईल तेथें गेलेंच पाहिजे. मी तलवारीनें याला ठार केलें





तरी या श्वापदांच्या मुखांतून जिवंत परत जाणें शक्य तरी आहे का ! काय करावें कांहीं सुचत नाहीं.

लखू याच विचारांत गुरफटून गेला असतां एकाएकीं त्या घोड्यानें एका खड्ड्यांत उडी मारली. समोर लखूला एक खोल गुहा दिसली. घोडा त्या गुहेच्या तोंडाशीं उभा राहून खेकाळूं लागला. मी हजर आहें अशी खूण आपल्या मालकाला तो करीत असावा.

त्यानंतर गुहेंत दिव्याचा उजेड दिसला, नंतर मशालीचा उजेड दिसला व शेवटीं एक होमकुंड जळत असलेलें दिसलें. आंत "ह्राम् ह्रीम् ह्रूम्" चा आवाज पण येत होता.

लखू घोड्यावरून खालीं उतरून आंत निघाला होता. पण तो उजेड पाहून व आवाज ऐकून स्तब्ध जागच्या जागीं उभा राहिला. त्याच वेळीं त्या घोड्यानें देखील नकळत पाय काढला. पायीं पळणार कोठें ! दगडा-आड खडकाआड कोठें लपणार !

गुहेंत पुन्हां पहिल्यासारखा काळोख झाला. उजेड नाहीं, धूर नाहीं, यज्ञकुंड नाहीं, मंत्रोच्चार नाहीं. पुन्हां सर्व शांत झालें. हा बदल लखूला विचित्र व जास्त भयंकर वाटला.

गुहेंत कोणी आहे, एवढें खास. मग तो कोणी राक्षस आहे, कीं मांत्रिक, कीं योगी, कीं नरमांसभक्षी कोणी मनुष्यच, लखू हा विचार करीत उभा होता.

नंतर त्यानें विचार केला, गुहेंतला मनुष्य काळोखामुळें आपणाला दिसणें शक्य नाहीं. पण आपण उजेडांत आहों. आपली हालचाल त्याला छान दिसत असणार. आपल्याला पकडण्यासाठीं तो कांहीं तरी उपाय योजीत असावा. म्हणून येथून पाय काढला पाहिजे.

असा विचार करून लखूनें आपल्या एकशिंगी घोड्याकडे वळून पाहिलें. पण तो बराच दूर उभा होता. तो दूर एका खडकाजवळ उभा राहून शिंग घाशीत होता. लखू त्याला धरण्यासाठीं धांवला. पण तो टुणकिशी उडी मारून दूर एका खडकावर जाऊन उभा राहिला.

लखू अगदीं हताश होऊन जागच्या जागीं उभा राहिला.

लखूनें धीर करून त्या गुहेंत शिरायचें ठरविलें. एका हातांत तलवार उपसून घेतली व दोन बाण घेतले. दुसऱ्या हातांत धनुष्य घेतलें. चार पावलें पुढें गेला. पण पुन्हां हळू हळू मागें सरकला.

लखूला एका एकीं यज्ञकुंडापलीकडे एक भयंकर मनुष्य दिसला. त्याला लांब बारीक दाढी होती. काळेकुट्ट तोंड होतें. डोक्या-वर एक शिरस्त्राण होतें. त्याला पाहून लखू पुन्हां जागच्या जागीं स्तब्ध उभा राहिला.

"बाळ ! भिण्याचें कारण नाहीं. भिऊं नकोस ! तुला व तुझ्या बापाला वांचविण्याची जबाबदारी माझ्यावर आहे !" म्हणत तो भयंकर मनुष्य पुढें आला.



त्याचा तो प्रेमळ आवाज ऐकून लखूच्या मनांतली भीति पार लयास गेली. हा कोणी का असेना. हा मला व माझ्या परिस्थितीला ओळखतो आहे. त्याला भिऊन पळून जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. बऱ्यापेक्षां वाईट होण्याचा जास्त संभव असला तरी येथून जाण्याचा विचार सोडून दिला पाहिजे. हा आपल्यावर एवढें प्रेम दाखवीत आहे. यांत याचा थोडा का होईना स्वार्थ असणारच.

"बाळ ! मी बोलतों त्यावर तुझा विश्वास नाहीं का ! ये इकडे ये ! आंत गुहेंत ये !" असें सांगून तो भयंकर मनुष्य गुहेंत परत










जाऊं लागला. पण लखू येत नाहींसें पाहून मागें वळून म्हणाला—"माझ्याबरोबर आंत यायला भीति वाटते का!"

तो प्रश्न ऐकून लखूला राग आला. याला काय वाटतें, मी भितरा आहे! तो स्वाभिमानानें म्हणाला—

"तुझ्याबरोबर या गुहेंतच काय, तूं सांगशील तिकडे माझी यायची तयारी आहे. मी रानांतच जन्माला आलों. रानांतच वाढलों व रानांतच राहात आहें. भय भीती आम्हां रानटी लोकांना वाटत नाहीं. पण तुला माझ्याविषयीं व माझ्या वडिलांविषयीं इतकी माहिती कशी कळली याचें मला आश्चर्य वाटत आहे.

"ये आंत ये! मला हें सर्व कसें कळलें हें मी तुला दाखवितों. तूं आंत येऊन माझ्या काळभैरवाच्या डोळ्यांतून पाहिलेंस तर जगांत कोठें काय घडत आहे तुला सर्व दिसेल." तो भयंकर मनुष्य लखूला म्हणाला.

लखू त्याच्याबरोबर गुहेंत शिरला. गुहेंत काळोख होता. दहा पंधरा पावलें चालून गेल्यावर त्याला डोंगरांत एका मोठ्या बिळासारखें भोंक दिसलें. त्यांत दगड कोरून रानटी मांजराची आकृती तयार



केलेली दिसली. त्या बोक्याचे डोळे लाल बुंद होते.

"हाच तो काळभैरव! भक्तांसाठीं वट-वृक्षासारखी सावली देणारा, पण शत्रूला कांटेरी कुंपणासारखा! जय काळभैरव की जय!" असें म्हणत एका मुळीनें त्या भयंकर माणसानें काळभैरवाच्या डोळ्याला स्पर्श केला. नंतर मागें सरकून लखूला म्हणाला—"लखू, ये आतां, तूं याच्या डोळ्यांतून पहा. तुला जगांत कोठें काय घडत आहे, सर्व दिसेल. तो पहा, तुझा बाप महादू! त्या गाई! ते पहा सैनिक










त्यांना धरण्यासाठीं पळत आहेत! पण....! हाः, हाः, हाः, हाः, हाः!" म्हणून तो जोरानें हंसला.

लखूनें कालभैरवाच्या डोळ्यांतून पाहिलें. त्याचा म्हातारा बाप झाडींत लपून बसला होता. गाई रानांत धांवत होत्या. घोडेस्वार त्यांना एकत्र करण्याचा प्रयत्न करीत होते.

तें दृश्य पाहून लखूला वाईट वाटलें. आपण या प्रसंगीं बापाच्या मदतीला जाऊं शकत नाहीं. गाईंचें रक्षण करूं शकत नाहीं. पळपुट्यासारखें स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं इकडे पळून आलों.

राजाच्या शिपायांनीं गाई धरून नेल्या तर बाबांना रानांत पोटभर खायला देखील मिळणार नाहीं. स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं सारखें पळत रहावें लागेल. अशा वेळीं मला पळून जायची कां बुद्धी व्हावी?

तो भयंकर मनुष्य लखूच्या मनांतले विचार ओळखून म्हणाला–"तुला इतकें दुःखी होण्याचें कारण नाहीं, लखू! तुझ्या-वडिलांचें व तुझ्या गाईंचें रक्षण करण्याची जबाबदारी माझ्यावर आहे हें मी पहिल्यानेंच नाहीं का सांगितलें." असें म्हणत तो गुहेच्या बाहेर आला व मोठ्यानें ओरडून म्हणाला–"उलूकराज! असशील तसा समोर ये! जा, त्या सैनिकांना पळवून लाव व गाईंचें रक्षण कर!"

लखूला एका क्षणार्धांत एक दुसरेंच दृश्य दिसलें. तो काळभैरवाच्या डोळ्यांतून तें दृश्य पहात होता. एक मोठें बटवाघूळ आकाशांतून उडत होतें व आश्चर्य म्हणजे, त्याला गरुडासारखे मोठमोठे पंख होते. त्याची मूळ आकृति बटवाघळासारखी होती. तो उडत आल्याबरोबर सर्व सैनिक वाट फुटेल तिकडे पळूं लागले. (पुढें चालू)



# विधि लिखित

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडा-जवळ गेला व प्रेत काढून घेऊन नेहमी-प्रमाणें स्मशानाच्या वाटेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तूं इतके कष्ट सहन करीत आहेस तें पाहून मला असें वाटत आहे कीं कपाळीं जें लिहिलेलें असतें तेंच शेवटीं घडतें. याचें एक उदाहरण म्हणून मी तुला कशीब नांवाच्या एका यवनकुमाराची गोष्ट सांगणार आहें. ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

फार पूर्वीं समुद्रकांठच्या प्रदेशांत कशीब नांवाचा एक राजा राज्य करीत असे. तो वयानें तरुण होता. समुद्राकांठचीं अनेक बेटें त्याच्या राज्यांत होतीं. एकदां त्यानें तीं बेटें पाहून यायचें ठरविलें. त्यानें लहान मोठीं दहा जहाजें बरोबर घेतलीं व प्रवासाला निघाला. वीस दिवसांचा प्रवास निर्विघ्न



पार पडला. परंतु एकविसाव्या दिवशीं समुद्रांत एक मोठें वादळ आलें. रात्रीं वादळ सुरू झालें तें दुसऱ्या दिवशीं सकाळीं थांबलें.

त्यांचीं जहाजें कोणत्यातरी अनोळखी बेटाला येऊन लागलीं होतीं. तेथें थोडी विश्रांति घेऊन व भाग्यावर भरंवसा ठेवून ते पुढील प्रवासाला निघाले. वीस दिवस प्रवास केल्यावर त्यांच्यावर मोठें संकट आलें. एका बेटाजवळ त्यांचीं जहाजें पोंचतांच जहाजांना लावलेले खिळे, कड्याकोयंडे व इतर लोखंडी सामान निघून त्या बेटावर उडून गेलें आणि त्यांचीं जहाजें मोडून पाण्यांत बुडालीं. फक्त लाकडी फळ्या व सोट पाण्यांत तरंगूं लागले. तें बेट लोहचुंबकाचें आहे हें त्यांना फार उशिरां कळलें. त्यांच्या जहाजांसारखींच इतर जहाजें त्या बेटा-जवळ गेल्यावर मोडल्याचें त्यांना दिसून आलें. कारण जहाजांवरील सर्व लोखंडी सामान बेटावर जाऊन पडलेलें होतें. कशीब कसाबसा एका लाकडी फळीच्या आधारें बेटावर येऊन पोंचला. तो इतका दमून गेला होता कीं काठावरच्या वाळूवर येऊन पोंचल्यानंतर त्याच्या अंगांत उठण्याची देखील शक्ति उरली नाहीं व तेथेंच पडल्या पडल्या त्याला झोप लागली.

त्याला एक विचित्र स्वप्न पडलें. तो झोपला होता त्या जागीं त्यानें जमीन खणून पाहिली तेव्हां त्याला जमिनींत पुरलेलें एक धनुष्य व एक बाण सांपडला. ते उचलून त्यानें वर पाहाल्याबरोबर दूर डोंगराच्या शिखरावर त्याला एका शूरवीर योद्ध्याचा पुतळा दिसला. त्यानें एक बाण त्या पुतळ्याचा नेम धरून मारतांच तो पुतळा समुद्रांत पडला. त्यानंतर एक अनोळखी व विचित्र मनुष्य एका होडींत बसून तिकडे आला. तो कशीबला पाहून त्याच्याशीं बोलूं लागला. कशीब त्याच्या होडींत बसल्यावर तो ती होडी घेऊन कोठें तरी निघाला.

कशीबची झोप मोडली व तो त्या विचित्र स्वप्नाचा विचार करूं लागला. त्यानें बराच वेळ विचार केला व स्वप्न खरें आहे कीं खोटें हें पाहण्यासाठीं वाळू बाजूला सारून खड्डा खणूं लागला. खरोखरींच त्याला स्वप्नांत पाहाल्याप्रमाणें धनुष्य व बाण दिसले. त्यानें वर पाहाल्याबरोबर डोंगराच्या शिखरा-वर त्याला एक पुतळा दिसला. त्यानें नेम धरून बाण सोडला. बाण लागतांच तो पुतळा समुद्रांत जाऊन पडला. स्वप्नांत पाहाल्याप्रमाणें एक मनुष्य एक होडकें घेऊन आला. कशीब निमूटपणें त्या होडक्यांत जाऊन बसला. होडी परत निघाली.

कशीब होडींतल्या माणसाकडे टक लावून आश्चर्यचकित होऊन पहात राहाला. त्याला पूर्वी कोठें तरी पाहालें आहे असें त्याला वाटूं लागलें. डोंगराच्या शिखरावर त्यानें जो पुतळा पाहिला होता त्याच्या चेहऱ्यांत व होडींतल्या व्यक्तीच्या रूपांत साम्य त्याला भासूं लागलें.



शेवटीं त्यानें धीर करून विचारलें—
"कोण तुम्ही ? त्या डोंगरावरच्या पुतळ्याशीं आपला काय संबंध ?"

त्या माणसानें तो प्रश्न ऐकून कशीबला दोन्ही हातांनीं उचलून पाण्यांत टाकून दिलें. कशीब पोहूं लागला, परंतु त्याला ती नाव मात्र दिसली नाहीं. समुद्र किनारा अगदीं जवळ होता. काठावर पोंचल्यावर त्यानें अंगावरचे ओले कपडे काढून टाकले व वाळूंतच झोंपी गेला. सकाळीं उठला तेव्हां त्याला कळलें कीं तें एक लहान व निर्जन द्वीप आहे व

त्या बेटावर त्याच्याशिवाय दुसरा कोणी मनुष्य नाहीं.

या समुद्रांतून मी वांचलों खरा, पण शेवटीं या निर्जन द्वीपावर मरण्यासाठींच का? असा विचार करीत तो एका झाडाखालीं बसला असतां त्याला एक जहाज त्या बेटाकडेच येत असलेलें दिसलें. तो एका झाडावर चढून जहाजांत कोण येत आहे आणि काय करीत आहे हें पाहूं लागला.

जहाज किनाऱ्याला येऊन लागलें. कांहीं लोक फावडीं घेऊन जहाजांतून उड्या मारून किनाऱ्यावर उतरले. ते बेटावर खुणा पहात एका जागीं आले व जमीन खणूं लागले. एक मोठी शिळा त्यांना दिसली. ती त्यांनीं काढून बाजूला सारली व पुन्हां जहाजांत जाऊन ताटें, गाठोडीं, खाण्यापिण्याचे पदार्थ, फळें, कपडे वगैरे घेऊन आले व त्यांनीं त्या शिळेखालच्या गुहेंत टाकले.

शेवटीं एक म्हातारा एका लहान मुलाला घेऊन त्या जागीं आला व त्या मुलाला घेऊन त्या गुहेंत शिरला. थोड्या वेळानें तो एकटा बाहेर आला आणि त्यानें नोकरांना गुहेचें दार बंद करण्यास सांगितलें. त्या प्रमाणें नोकरांनीं ती शिळा गुहेच्या तोंडावर नीट बसविली आणि आपल्या मालकाबरोबर जहाजांत जाऊन बसले. जहाज निघून गेलें.

तें सर्व स्वतःच्या डोळ्यांनीं कशीब पहात होता. त्याला तें सर्व अमानुष वाटलें. एकल्याशा मुलाचा जीव घेण्याचा हा प्रयत्न त्याला बिलकुल आवडला नाहीं. मी आज या वेळीं येथें आहे म्हणून बरें झालें, नाहीं तर त्या मुलाला कोणी वांचविलें असतें का? असा विचार करीत कशीब गुहेजवळ आला. तो दगड बाजूला सारून आंत जाण्याच्या हेतूनें त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. पुष्कळ प्रयत्न केल्यावर त्याला यश आलें.

कशीब गुहेंत शिरला. परंतु त्याच्या कल्पनेविरुद्ध गुहेंत सर्व सुखसोयी पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

त्या गुहेंत तो मुलगा एकटा एका पलंगावर पडून होता. कशीबला पाहून तो दचकून उठून बसला. तें पाहून कशीब त्याला म्हणाला—" भिऊं नकोस बाळा. मी तुला या जिवंत समाधींतून वांचवण्यासाठीं आलों आहें. त्या दुष्ट म्हाताऱ्यानें तुला निर्दयपणानें या गुहेंत कोंडून ठेवलें आहे.
















तें मला पाहवलें नाहीं. म्हणून मी आलों आहें. देवाच्या कृपेनें मी झाडावर बसून हें सर्व कारस्थान पहात होतों."

तें ऐकून तो मुलगा जोरजोरानें हंसूं लागला व म्हणाला—"तुम्हांला उगीच तसदी झाली. तुम्हांला वाटलें तसा माझा वध करण्यासाठीं माझ्या आजोबांनीं मला या गुहेंत ठेवलें नाहीं. मी एकुलता एक नातू आहें त्यांचा. माझ्यावर प्राणसंकट येणार आहे हें ज्योतिष्याकडून कळलें. तें टळावें म्हणून त्यांनीं मला ह्या गुहेंत आणून ठेवलें आहे. म्हणें, लोहचुंबकाचें एक बेट आहे त्या बेटावरच्या डोंगरावर एक पुतळा आहे. तो पुतळा जो राजा समुद्रांत पाडील तो चाळीस दिवसांच्या आंत माझा वध करील. म्हणून माझ्यासाठीं मुद्दाम ही गुहा खणून तयार करून ठेवली होती. तो पुतळा समुद्रांत पडल्याचें ऐकून मला माझे आजोबा येथें घेऊन आले आहेत. चाळीस दिवस पुरेल एवढें अन्न आणून येथें ठेवलें आहे. त्यानंतर माझे आजोबा मला येथून घेऊन जातील. पण हे चाळीस दिवस एकट्यानें येथें ह्या गुहेंत कसे काढावयाचे मी ह्याच विचार करीत होतों. आतां तुम्ही आलां आहांत, म्हणून मला आतां कसलीच काळजी उरली नाहीं. तुम्ही पण चाळीस दिवस माझ्याबरोबर येथें रहा. दोघांना पुरेल एवढें खाण्यापिण्याचे पदार्थ येथें आहेत."

तें सर्व ऐकून कशीबला फारच आश्चर्य वाटलें. त्याच्या हातून त्या मुलाचा वध होण्याची शक्यता कशी काय असणार? त्या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसेना. आहे कांहींतरी खुळेपणा. त्या मुलाला पाहाल्यापासून त्याच्या मनांत वात्सल्यभाव उत्पन्न झाला होता. त्याच्या रक्षणासाठीं स्वतःचा जीव धोक्यांत घालायला तो तयार झाला होता! पण तो तें सर्व कांहींच बोलला नाहीं. कारण त्या मुलाला तें कळलें तर तो उगाच जास्त भिऊन मात्र जाईल. म्हणून त्याच्या बरोबर गप्पा मारीत, त्याला गमतीदार गोष्टी सांगीत त्याच्याबरोबर राहून त्याची करमणूक करावयाचें त्यानें ठरविलें.

एकाच जागीं एकाच खोलींत दोघे कित्येक दिवस राहाल्यानें दोघांचें परस्परांवर पितापुत्रांचें प्रेम असावें तसें वाढत गेलें. अगदीं आनंदांत एकोणचाळीस दिवस निर्विघ्न पार पडले.

चाळिसाव्या दिवशीं रात्रीं मुलगा म्हणाला—"मला बेलाचें फळ खावयाचें आहे. त्याचें साल फार टणक आहे. कशीब तें फळ फोडण्यासाठीं भिंतीला टांगलेली तलवार काढायला म्हणून पलंगावर उभा राहिला. त्यानें तलवार काढली. तितक्यांत त्या मुलानें थट्टेखातर कशीबच्या पायाला गुदगुल्या केल्या. त्या बरोबर कशीबच्या हातांतून तलवार सुटली व नेमकी त्या मुलाच्या मानेवर पडली. त्याबरोबर तो मुलगा एक किंकाळी फोडून जो पडला तो पुन्हां उठला



नाहीं. तो हृदय विदारक प्रसंग पाहून व दैवदुर्विलास असा कीं त्याच्याच हातून त्या मुलाचा वध झालेला पाहून कशीब हळहळला, खूप रडला.

कशीब आपलें काळें तोंड दाखविण्यापेक्षां पळून जाण्याचा विचार करूं लागला. परंतु त्या असहाय मुलाच्या प्रेताकडे पाहून त्याचे पाऊल पुढेंच पडेना. रात्रभर तो प्रेताजवळ रडत बसला होता. सकाळीं त्या मुलाचा आजा येईल असा विचार करून कशीब उठला व गुहेबाहेर जाऊन झाडावर जाऊन बसला.









सकाळीं त्याचा आजा आला व गुहेंत जाऊन त्यानें आपल्या नातवाचें प्रेत बाहेर काढून आणलें. बिचारा रडत रडत आपल्या भाग्याला दोष देत घरीं निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा! मला हें कळत नाहीं कीं त्याच्या हातून मुलाचा वध होणार आहे हें कळलें असून सुद्धां कशीव तेथून निघून कां नाहीं गेला? ज्योतिष्यांच्या ज्योतिषावर त्याचा विश्वास नव्हता म्हणून कीं त्या मुलावर त्याचें प्रेम वाढत गेलें होतें म्हणून? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्याचा परिणाम काय होईल हें तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील हें विसरूं नकोस."

विक्रमार्क म्हणाला—"मनुष्याचा विश्वास कसा का असेना, परंतु त्याचा कांहीं उपयोग नाहीं. त्या मुलाला पाहिल्यापासून कशीच्या मनांत वात्सल्यभाव उत्पन्न झाला. त्याच्याशीं परिचय वाढल्यावर तो एका शब्दानें देखील त्याला टाकून बोलला नाहीं. एवढेंच नव्हे तर त्याला एकटा सोडून जायला देखील त्याचें मन धजत नव्हतें. त्यानें त्या मुलाची करमणूक करून तो चाळीस दिवसाचा अवधी आनंदानें जावा म्हणून त्यानें यथासाध्य प्रयत्नच केला. तो गेला नाहीं त्यांत कांहींच गैर नव्हतें. त्यानें स्वतः कांहीं अपराध केला नाहीं. विधिवश त्याच्या हातून तो अपराध घडला. त्यासाठीं त्याला दुःख किंवा पश्चात्ताप वाटण्याचें कारणच नव्हतें. विधिलिखित कधीं टळत नाहीं याचें याहून जास्त निराळें उदाहरण काय असूं शकणार?"

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)



# बालपणचें ऋण

हान राजघराण्यांत वू नांवाचा एक राजा झाला. लहानपणीं एका दाईनें त्याचें पालन पोषण केलें होतें. पुढें वू राजा झाल्यावर त्या दाईच्या हातून कांहींतरी चूक झाली. राजानें तिच्याविरुद्ध तक्रार ऐकून घेतली.

राजाच्या दरबारीं एक विदूषक होता. म्हातारीनें त्याचा सल्ला घेतला. विदूषक म्हणाला—"राजानेंच फिर्याद ऐकली आहे तेव्हां सुटका मिळणें कठीण आहे. तरी मी एक उपाय सांगतों. राजानें शिक्षा दिली कीं तूं निमूटपणें ऐकून घे. शिपाई तुला धरून घेऊन जातील त्यावेळीं तूं मागें वळून राजाकडे पहात रहा."

राजानें शिक्षा सांगितल्यावर शिपाई तिला धरून घेऊन चालले तेव्हां ती विदूषकानें सांगितल्याप्रमाणें मागें वळून पाहूं लागली. तिला विदूषकानें विचारलें—"तुला वेडबीड तर नाहीं लागलें? तूं राजाला दूध पाजलें होतेंस, राजाला तें आठवत नसेल असें का तुला वाटतें?" तें ऐकून राजानें शिक्षा रद्द केली.





# बिरबलाचें चातुर्य

अकबर बादशहाच्या दरबारांत फैजी, अबुल फजल, राजा मानसिंह, तोडरमल, गंग कवि, तानसेन, बिरबल वगैरे नवरत्नें होतीं. बिरबल आपल्या वाक्‌चातुर्यानें बादशहाला खूष ठेवीत असे. कोटी करण्यांत त्याचा हातखंडा होता. त्याच्या व बादशहाच्या कित्येक गोष्टी प्रसिद्ध आहेत.

एकदां अकबरानें बिरबलाला विचारलें—"खरें व खोटें यांत किती अंतर आहे?" बिरबल विचार करायला क्षण भर देखील थांबला नाहीं व म्हणाला—"चार बोटें!" बादशहानें चकित होऊन विचारलें—"तें कसें काय?" बिरबलानें चटकन डोळे व कान यांच्या मधल्या कानपटीवर चार बोटें ठेऊन विचारलें—"दोन्ही मध्यें किती अंतर आहे, बादशहानेंच सांगावें. चार बोटांचेंच अंतर नाहीं का?"

एकदां बादशहानें विचारलें—"मी थोर कीं इंद्र थोर?"

इतर कोणी दरबारी उत्तर देऊं शकले नाहींत व परस्परांचीं तोंडें पाहूं लागले. कारण इंद्राला मोठा म्हणावें तर बादशहा रागवणार व बादशहा मोठे आहेत म्हणावें तर बादशहांचें समाधान होणार नाहीं. सर्व बिरबलाकडे पाहूं लागले.

बिरबल निःशंकपणें उभा राहून म्हणाला—इंद्रापेक्षां बादशहाच थोर आहेत."

"कसें रे?" बादशहानें विचारलें.

बिरबल म्हणाला—"देवानें इंद्राला व आपल्याला घडवल्यावर दोघांना तराजूच्या दोन्ही पारड्यांत घातलें. ज्या पारड्यांत आपल्याला बसविलें होतें तें खालीं आलें व इंद्राचें वर गेलें. कारण आपलें पारडें जड होतें. परिणाम असा झाला कीं इंद्र-वरचा म्हणजे स्वर्गाचा राजा झाला व आपण या जगाचे राजे झालांत." उत्तर ऐकून बादशहा व दरबारी चकित झाले.

एकदां अकबरानें थट्टेखातर बिरबलाला विचारलें—"बिरबल, माझ्या या राजधानींत किती कावळे असतील असें तुला वाटतें?"

बिरबलनें चटकन उत्तर दिलें—"बादशहा! मी कावळ्यांची खानेसुमारी केली होती. बरोबर साठ हजार पांचशें बावन्न कावळे आहेत."

अकबरानें विचारलें—"हुकूम काढूं का खानेसुमारी घ्यायला?"

बिरबल म्हणाला—"खुशाल खानेसुमारी घ्यावी. माझी ना नाहीं. पण विशेष फायदा होणार नाहीं. कारण कांहीं कावळे आपल्या नातेवाइकांना भेटायला बाहेर गांवीं गेले असतील व कांहीं बाहेरून आपल्या नातेवाइकांना भेटायला आले असतील किती बाहेर गेले व किती बाहेरून आले याची नोंद आपल्याकडे नाहीं."

एकदां अकबर एकटा एका जागीं विचार करीत बसला होता. बिरबल परवानगी शिवाय तेथें आलेला पाहून बादशहानें त्याला रागावून विचारलें—"बीरबल, कशाला रे आला आहेस येथें?"



"बादशहाजवळ एक खास गोष्ट निवेदन करण्यासाठीं आलों आहें." बिरबल म्हणाला.

"आज बोलायला माझ्याजवळ वेळ नाहीं!" बादशहा म्हणाला.

"आपण बोलण्याची तसदी करण्याचें कारण नाहीं. मी बोलणार आहें. आपण नुसतें ऐकावें." बिरबल म्हणाला. तें ऐकून अकबराचा राग कमी झाला.

एकदां अकबर आपल्या दरबाऱ्यांना म्हणाला—"आज दरबारांत हजर असलेल्या प्रत्येक दरबाऱ्याच्या मनांत काय चालू आहे कोणी सांगेल का?"

कोणी कांहीं बोलला नाहीं. एकटा बिरबल उभा राहून म्हणाला—“ येथें हजर असलेल्या प्रत्येकाच्या मनांत आतां कोणता-विचार चालू आहे मला माहीत आहे.”

चकित होऊन बादशहानें विचारलें—“ सांग पाहूं कोणता विचार आहे ?”

“ प्रत्येक जण विचार करीत आहे, किती चांगले बादशहा आहेत. यांचें राज्य असेंच अबाधित चालू राहील तर किती बरें होईल ? मी म्हटलें त्यांत कांहीं चूक आहे असें कोणाला वाटत असेल तर त्यानें उठून उभें राहून तसें सांगावें.” पण त्या विरुद्ध बोलण्याची छाती कोणाची असणार ?

बिरबलाला तंबाकू खायची फार संवय होती. बादशहानें त्याची खोड मोडण्याचे अनेक उपाय करून पाहिले. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. एकदां बिरबल व बादशहा गच्चींत बसून गप्पा मारीत होते. दूर एका मळ्यांत तंबाकूचें शेत होतें. त्यांत गाढवें चरत होतीं. पण तंबाकूला तोंड देखील लावीत नव्हतीं. तें पाहून अकबर बादशहा बिरबलाला लाजवण्यासाठीं म्हणाला—“ पहा बिरबल, गाढवें देखील तंबाकूला शिवत नाहींत.” बिरबलनें चटदिशी उत्तर दिलें—“ बरोबर आहे बादशहा ! गाढवेंच तंबाकूला शिवत नाहींत.”

बादशहा निरुत्तर झाले. राग येण्या ऐवजीं बिरबलाच्या चातुर्याची त्यांनीं वाखाण-णीच केली.

एकदां बिरबल बादशहाला भेटायला गेला तेव्हां बादशहा आपल्या राणीबरोबर बसून आंबे खात होते. आंबे खाऊन बादशहा कोयी व साली राणीच्यासमोर टाकीत होते.

बिरबल आल्यावर बादशहा म्हणाला—“ पहा बिरबल ! राणीसाहेबांच्या या खादाड-पणाला काय म्हणावें ?” असें सांगून बादशहानें राणीसमोरचा कोयींचा व सालींचा ढीग बिरबलाला दाखविला.

बिरबल म्हणाला—“ स्त्री नेहमीं पतीच्या पावलावर पाऊल टाकून चालते. पतीची नक्कल करते असें लोकांनीं म्हटलें तरी तिला त्याचा राग येत नाहीं.”

“ म्हणजे मी देखील खादाड आहें. असेंच का तुझें म्हणणें आहे ? माझ्यासमोर एक देखील साल किंवा कोय आहे का ?” बादशहानें विचारलें. “ राणी सरकारांनीं आंब्याचा फक्त रस खाल्ला व कोयी व साली















फेंकून दिल्या. पण आमच्या मालकांनीं तर सर्वच फस्त केलेलें दिसतें आहे!" बिरबल म्हणाला.

अकबर निरुत्तर होऊन खालीं मान घालून बसला. पण राणीनें टाळ्या वाजवून बिरबलाच्या उत्तराची प्रशंसा केली.

आग्रा येथें लाड व कपूर नांवाचे दोन प्रसिद्ध गवई होते. त्यांचें गाणें ऐकून बादशहा खूप खूश झाला व त्यानें प्रत्येकाला एकेक हत्ती बक्षिस दिला.

त्या गवयांना स्वतःचें पोट भरावयाचीच मारमार होती, हत्तींचें पोट कसें काय भरणार? बादशहानें बक्षिस दिलें होतें. नकार तरी कोणत्या तोंडानें देणार? घेऊन जाऊन विकून टाकण्याची देखील हिम्मत नव्हती. दान करणें देखील शक्य नव्हतें. बादशहांना राग येईल. म्हणून जवळ होतें नव्हतें तें सर्व विकून त्यांनीं हत्तींचीं पोटें भरलीं. कांहीं दिवसांनीं भीक मागून पोट भरण्याची वेळ येऊन ठेपली.

दोघे बिरबलाकडे गेले. त्यानें एक युक्ति योजली व दोघांना सांगितली. दोघांनीं मिळून दोन्ही हत्तींच्या पाठीवर एक ढोल व तंतुवाद्य बांधून दोघांना राजधानींत सोडलें. हत्तींनीं पिसाळून राजधानीभर धुमाकूळ माजविला.

लोक अकबराकडे फिर्याद घेऊन आले. कोणीतरी हत्ती गांवांत मोकाट सोडले आहेत. चवकशी करतां बादशहाला कळलें कीं लाड व कपूरला जे हत्ती बक्षिस म्हणून दिले होते तेच ते हत्ती आहेत. दोघांना धरून समोर उभे करण्यासाठीं बादशहानें हुकूम सोडला. दोघे आल्यावर बादशहानें त्यांना विचारलें--"काय रे तुम्ही आपापले हत्ती असे मोकाट कां सोडलेत?"

लाड म्हणाला--"जहांपनाह! बरोबर एक वर्ष या हत्तींना आम्ही शिकवीत होतों. आम्हांला जें कांहीं येतें तें सर्व आम्ही त्यांना शिकविलें. त्यांना उत्तम संगीताचें ज्ञान झालें आहे. आम्ही विचार केला कीं आतां ते स्वतःचें पोट छान भरूं लागतील. आम्ही आजवर स्वतःचें पोट भरून त्यांचें पोट भरीत आलों. आम्ही विचार केला, ते देखील स्वतःचें पोट भरून आमचें पोट भरून घेतील."

अकबराला आपली चूक कळली. त्यानें प्रत्येकाला एकेक गांव आंदण म्हणून दिलें. बिरबलाच्या चातुर्यामुळें दोघांच्या पोटा-पाण्याची व्यवस्था झाली.

पण पुढें कांहीं दिवसांनीं, कां कोणास ठाऊक, लहरी बादशहाची मर्जी फिरली व त्यानें दोघांना हद्दपारीची शिक्षा दिली. पण बिचारे जाणार कोठें? दोघे दिवसभर गांवाबाहेर रानांत काढीत व रात्रीं काळोख पडल्यावर परत घरीं येऊन झोपून रहात. अशा प्रकारें फार कष्टानें त्यांना दिवस काढावे लागत.

सहा महिने कष्ट सहन केल्यावर ते बिरबलाकडे मदतीसाठीं धांवले. रात्रीं वेष












पालटून ते बिरबलाच्या घरीं गेले व कांहीं तरी उपाय काढून या संकटांतून सोडविण्यास सांगितलें. एक उपाय सुचवून बिरबलानें त्यांना निरोप दिला.

दुसऱ्या दिवशीं दोघे, अकबर ज्या वाटेनें बिरबलाबरोबर फिरायला जात असे त्या वाटे-वर जाऊन उभे राहाले. बादशहाला येत असलेला पाहून ते एका झाडावर चढून बसून राहाले.

बादशहानें त्यांना ओळखलें आणि विचारलें. तुम्हां दोघांना मी हद्दपारीची शिक्षा दिली होती व तुम्हीं येथें कसे ?"

ते म्हणाले—"मालक! आपण शिक्षा सुनावली त्या दिवसापासून लागोपाठ सहा-महिने आम्ही चालत राहालों. पण आपल्या अफाट साम्राज्याची हद्द पार करणें शक्य झालें नाहीं. म्हणून आम्ही विचार केला आपल्या राज्याची हद्द पार करणें शक्यच नाहीं. तेव्हां आणखी एक उपाय केला. आपलें राज्य सोडून आम्ही वर आलों आहों. स्वर्गांत निघून जाण्याचा विचार आहे आमचा !"

तें उत्तर ऐकून अकबराचा राग पार नाहींसा झाला. त्यानें झाडावरून खालीं उतरून यायला त्यांना सांगितलें व विचारलें—"हें उत्तर द्यायला तुम्हाला कोणी शिकविलें ?" आणि खोंचक नजरेनें स्मित करून बिरबलकडे पाहूं लागला.

दोघांनीं स्मित केलें. पण बिरबलाचा चेहरा मात्र तसाच गंभीर होता, जणुं कांहीं तें सर्व त्याच्या गांवींच नव्हतें.

अकबर दोघां गवयांना म्हणाला—"उद्यां-पासून रोज दरबारांत येत जा !"

[ बिरबल व बादशहाच्या आणखी कांहीं गोष्टी पुढील अंकीं वाचा. ]





# भुतांनीं लावलेलें लग्न

[ ३ ]

प्रवास करीत शम्स बसरा येथें पोंचला. तेथें त्यानें तेथील सुलतानाला आपली ओळख सांगून नूर व त्याच्या कुटुंबाविषयीं चवकशी केली तेव्हां त्याला कळलें कीं नूर त्या सुलतानाचा वजीर होता. पंधरा वर्षांपूर्वी तो वारला व त्याची बेगम, म्हणजे जुन्या वजिराची मुलगी बसऱ्यालाच आहे.

शम्स नूरच्या बेगमला भेटण्यासाठीं तिच्या घरीं गेला. ती अशक्त व आजारी होती. नवरा वारल्यापासून तिला या जगाचा वीट आला होता. त्यांत सोन्यासारखा मुलगा नाहींसा झाल्यापासून तिनें अंथरूणच धरलें होतें. शम्सनें तिच्या मुलाचें त्याच्या मुलीशीं लग्न झाल्याचें सांगून तो माझा जावई झाल्यापासून कोठें तरी परदेशांत रहात आहे असें सांगितलें. नंतर अजीबला प्रेमानें जवळ बोलावून हाच तुमचा नातू अशी ओळख करून दिली.

नूरच्या बायकोनें अजीबला प्रेमानें उचलून घेतलें. मुलगा भेटला नाहीं तरी मुलाचा मुलगा भेटला व पुढें मागें मुलाची पण भेट होईल असा विचार करून तिला फार आनंद झाला.

"अल्लानें नातवाची भेट करून दिली आहे, मुलगा देखील त्याच्याच कृपेनें भेटेल, असा विचार करून तुम्ही आतां आमच्या बरोबर कायरोलाच चला !" अशी शम्सनें विनंति केली.

शम्सच्या तोंडून तें वाक्य निघण्याचीच जणुं कांहीं खोटी होती. नूरची बायको प्रवास करायला तयार झाली. शम्सनें बसऱ्याच्या सुलतानाला भेटून त्याचे आभार











मानले आणि त्याचा निरोप घेतला. परत जातांना पुन्हां डेमास्कस नगराबाहेर त्यानें पडाव टाकला. संधी साधून अजीब सैयदला म्हणाला—" चल सैयद! त्या दिवशीं तूं त्या दुकानदाराला दगड मारलास त्या बिचाऱ्याला किती लागलें, कोणास ठाऊक? चल, त्याला भेटून येऊं."

सैयद म्हणाला—" नको रे बाबा! मी त्या वाटेला जाणार नाहीं." पण अजीबनें हट्ट केल्यावर त्याला जावें लागलें. अजीबनें हसनच्या कपाळाला पडलेली खोप पाहिली व म्हणाला—" मला ओळखलेंस का? तुझी तब्येत कशी काय आहे हें विचारण्यासाठींच आलों आहें."

हसननें त्याला वळून पाहिलें व म्हणाला—" ये, ये! आज ताजा मोरंबा तयार केला आहे! तुला मी त्या दिवशीं पाहिलें तेव्हां पासून तुझा चेहरा सारखा डोळ्यासमोर आहे बघ. त्या दिवशीं तुझ्या पाठीमागून यायला नको होतें. पण राहवलें नाहीं म्हणून आलों."

हसननें दोघांना ताजा मोरंबा खायला दिला व दोघांनीं आवडीनें खाल्ला.

सूर्यास्ताची वेळ झाली होती दोघे हसनचा निरोप घेऊन काळोख पडायच्या आधीं पडावाच्या जागीं येऊन पोंचले.

नूरच्या बायकोनें नातवाला आल्यावर विचारलें—" बाळ, काळोख पडला. इतका वेळ बाहेर हिंडूं नये. कोठें गेला होतास? सकाळीं खाऊन गेलास, अजून भूक कशी नाहीं लागली?" असें सांगून अजीबची आजी डाळिंबाचा मोरंबाच घेऊन आली.

" मला नको! मला भूक नाहीं." सैयद म्हणाला.

अजीबनें तोंडांत एकच घास घातला व तोंडें वांकडी करीत म्हणाला—" आजी! हा मोरंबा मला नको. चांगला नाहीं झाला."





" मी केलेला मोरंबा आवडत नाहीं म्हणतोस? वेडबीड तर नाहीं लागलें तुला? अरे, माझ्या हातचा मोरंबा खायला लोक दुरून धांवत येतात. हा नाहीं आवडला तर याच्याहून चांगला कोठें खाल्ला आहेस का, सांग! आणखी कोणाला करतां येत असेल तर तो तुझ्या बापाला. मी शिकवला होता त्याला लहानपणीं." आजी म्हणाली.

" आजी अगदीं असाच मोरंबा आम्ही गांवांत एका दुकानांत खाऊन आलों. किती चांगला होता तो! त्याची चव याला नाहीं. काय पण छान वास होता. मी इतका चांगला मोरंबा कधीं कोठें खाल्ला नाहीं." अजीब म्हणाला.

अजीबची आजी सैयदला खूप रागावली. मुलाला कसले दुकानांतले पदार्थ खायला घालून वाईट संवय लावली आहेस. खबरदार, पुन्हां कोठें याला खायला घातलेंस तर. सैयद विनम्रपणें म्हणाला—" मोठ्या बेगम साहेबा! माफ करा, छोट्या सरकारांना मी नाहीं बोलावून घेऊन गेलों दुकानांत! आम्ही दुकाना जवळून जात होतों. घमघमीत वास सुटला होता. बाहेर उभे राहूनच खाल्ला थोडा!" सैयद म्हणाला.

" नाहीं आजी! दुकानांत बसून खाल्ला!" अजीब म्हणाला.

शेवटीं वजीर शम्स याच्या कानावर पण तक्रार गेली. त्यानें सैयदला विचारलें. तो खोटें बोलला—" दुकानांत जाऊन मोरंबा नाहीं खाल्ला."

" असें असेल तर माझ्यासमोर हा मोरंबा सर्व खाऊन दाखव पाहूं!" वजीर म्हणाला.

शेवटीं सैयदला नाइलाजानें कबूल करावें लागलें कीं त्यानें दुकानांत बसून पोटभर मोरंबा खाल्ला होता. तो मोरंबा खाल्ल्यानंतर

पुन्हां हा मोरंबा खाणें मला आतां तरी शक्य नाहीं."

तें ऐकून शम्स जोर जोरानें हंसूं लागला. पण अजीबच्या आजीला राग आला. म्हणाली—"पाहतें, मी तो मोरंबा. तूं आतांच्या आतां जाऊन घेऊन ये तो मोरंबा. मी केलेल्या मोरंब्यापेक्षां चांगला आहे म्हणतोस तर तो खाऊन पाहिलाच पाहिजे."

सैयद हसनच्या दुकानांत गेला आणि म्हणाला—"बाबा रे! पाहिलेंस, माझा जीव जायची वेळ आली आहे, मुलाची आजी खाऊन पाहणार आहे हा मोरंबा. तिला आवडला नाहीं तर वजीर तुझी व माझी चामडीच लोळवील."

हसननें एका चिनी मातीच्या पेल्यांत मोरंबा घालून दिला आणि म्हणाला—"तुला भिण्याचें कारण नाहीं. हा मोरंबा माझ्याहून जास्त चांगला करणारा या जगांत दुसरा कोणी नाहीं. हो, माझ्या आईनेंच केला तर गोष्ट निराळी. तिनेंच मला तो कसा करायचा हें शिकवलें होतें. पण ती दूर कोठें तरी परदेशांत आहे." सैयदनें आणून दिलेला मोरंबा चाखल्याबरोबर नूरची बायको म्हणाली—"हा मोरंबा माझ्या मुलानेंच केला आहे."



तें ऐकून शम्सला वाटलें तो मिठाईवाला माझा जावई नसेल कशावरून? त्यानें नूरचा मुलगा हसन याला कधीं पाहिलें नव्हतें. त्याला माझ्या मुलीनें किंवा त्याच्या आईनें देखील फार म्हणजे फार पूर्वीं पाहिलें आहे. म्हणून तीच चवकशी करून पाहिली पाहिजे. तें येथें शक्य नाहीं. त्याला कायरोला घेऊन गेलें पाहिजे. तेथें होईल खरी परीक्षा.

असा विचार करून शम्स डेमास्कसच्या सुभेदाराच्या घरीं गेला आणि सुलतानानें दिलेलें पत्र त्याला दाखविलें. त्यानें शम्सला आदरपूर्वक बसायला सांगून विचारलें—"माझ्या हातून आपली कांहीं सेवा घडण्यासारखी असेल तर सांगावें!"

शम्स म्हणाला—"तुमच्या गांवांत एक मिठाईवाला आहे. त्याला धरून कायरोला न्यायला तुमची परवानगी व मदत पाहिजे आहे."

"हें कांहीं काम झालें? खुशाल धरून न्यावें." असें सांगून सुभेदारानें कांहीं हत्यारबंद सैनिक पाठविले. शम्सनें मिठाईवाल्याला धरून आणायला सांगितलें, पण त्याच्या केसाला देखील धक्का लागतां कामा नये हे देखील बजावून सांगितलें.



थोड्या वेळानें सैनिक हसनला धरून घेऊन आले व त्याला शम्सच्यासमोर हजर केलें. हसन घाबरून विचारूं लागला— "मालक! माझ्या हातून काय चूक झाली?"

"हा मोरंबा तूंच केलास कीं आणखी कोणी?" शम्सनें विचारलें.

"होय मीच केला! पण तेवढ्यासाठीं मला फाशी का देणार आहांत?" हसननें विचारलें.

"फक्त फांशी दिल्यानें भागेल असें वाटलें होय तुला? प्रथम या पेटींत बस!" असें सांगून शम्सनें पहिल्यापासून तयार ठेवलेल्या पेटीकडे बोट दाखविलें. हसन पेटींत जाऊन बसला. पेटी बंद करून कुलूप लावण्यांत आलें व पेटी उंटाच्या पाठीवर चढविण्यांत आली. हसनला एका एकीं आलेल्या या संकटाची कल्पनादेखील नव्हती.

वाटेंत जेवणाची वेळ झाली कीं शम्स हसनला पेटींतून बाहेर काढून बोलावून घेऊन यायला सांगे. हसनचें जेवण त्याच्या बरोबरच होत असे.

एकदां हसननें शम्सला विचारलें—"मला तुम्ही पेटींत बंद कां केलेंत, असें बोलावून आदरपूर्वक जेवायला काय घालतां आणि धरून घेऊन तरी कोठें चालला आहां? कांहीं सांगाल कीं नाहीं?"

"तुला सुळावर चढविण्याचें ठरविलें आहे." शम्स म्हणाला.

"पण माझा अपराध?" हसननें विचारलें.

"मोरंब्यांत मिरें कमी घातले आहेस म्हणून." शम्स म्हणाला. शम्सला उलगडा होईना. तो जमिनीकडे टक लावून पहात उभा राहिला. त्यावर शम्सनें त्याला विचारलें— "कसला विचार चालू आहे?"

"कांहीं नाहीं! जगांत एकाहून एक मूर्ख मी पाहिले आहेत. पण तुझ्यासारखा नाहीं पहिला. सुळावर तुला चढवलें पाहिजे!" हसन म्हणाला.

"कोण चढतें तें पाहावयाचें आहे!" शम्स म्हणाला. त्याच दिवशीं शम्स लव्याजम्यासह कायरोला पोंचला. त्यानें ती पेटी सित्तलच्या त्याच खोलींत ठेवली. ती खोली लग्नाच्या रात्रीं सारखीच सजविण्यांत आली होती. जी वस्तु जेथें होती तेथें तशीच ठेवण्यांत आली. सित्तलला त्या दिवशीं नवऱ्या मुलीचे कपडे घालायला दिले













होते तेच कपडे घालून तयार ठेवले. हसन झोपला होता. त्याला एक औषध हुंगायला देऊन तो बेशुद्ध झाल्यावर त्याला पण त्या दिवशीं त्यानें घातले होते तसेच कपडे घालून अंथरुणावर झोपविलें.

झोंप मोडली तेव्हां हसन चकित होऊन पाहूं लागला. पेटीच्या जागीं ही खोली कशी काय बुवा. पुन्हा भुताटकी सुरू झाली काय? आपण स्वप्न तर पहात नाहीं? असाहि एक संशय त्याच्या मनांत आला. त्याला आणखी एक आश्चर्य वाटलें. त्याचे कपडे, पगडी व मोहरांची पिशवी सर्व वस्तू ठीक जागीं ठेवलेल्या होत्या. जणूं कांहीं गेल्या रात्रींच तो तेथें सर्व ठेवून गेला होता. पंधरा वर्षें डेमास्कसला आपण राहालों. एक मुलगा आपल्याकडे आला, आपण त्याला खायला मोरंबा दिला. हें सर्व मग स्वप्नच होतें तर. त्यानें कपाळाशीं हात लावून पाहिला. खोक तशीच होती. एका मिठाई-वाल्यानें आपल्याला दत्तकपुत्र मानून "आपलें दुकान आपल्या नांवीं करून दिलें हें स्वप्नच होतें असें कसें म्हणावयाचें?"

"आतांपर्यंत कोठें होतां?" हसनला सितलचा प्रश्न ऐकूं आला. त्यानें वळून पाहिलें व नवऱ्यामुलीला पाहून व तिला ओळखून तो बेशुद्ध होऊन पडला.

शम्स हा सर्व प्रकार आड उभा राहून पहात होता. त्याला संशय उरला नाहीं. हाच नूरचा मुलगा हसन बद्रुद्दीन आपला जांवई आहे तर!

औषधोपचार झाल्यावर हसन शुद्धीवर आला. त्याला सर्व कांहीं कळलें. त्याला विना कारण इतके कष्ट सोसावे लागले. पुढें आई, बायको व मुलासह त्याचें आयुष्य सुखानें गेलें.














# असत्यवादी

पुष्कळ दिवसांनीं आजोबा आले. "आजोबा आले! आजोबा आले!" मुलांनीं नाचत येऊन आजोबांना घेरलें आणि लडिवाळ-पणानें विचारलें—"कोठें हो गेला होता बाबा इतके दिवस?"

"आजोबा, तुम्ही गेल्यानंतर आम्हांला कोणीकुण्णी गोष्ट सांगितली नाहीं. बघा!" एक नातू म्हणाला.

"अरे हो, हो, हो! जरा आंघोळ करून खाऊं पिऊं द्याल कीं नाहीं? मग तुम्ही आहां व मी आहें!" आजोबा म्हणाले.

अजोबा आंघोळ करून खाऊन पिऊन येईपर्यंत मुलांनीं त्यांची आरामखुर्ची तयार करून ठेवली होती. आजोबांची तपकिरीची डबी एका नातवानें लपवून ठेवली होती. आजोबा खुर्चीवर बसून डबी शोधूं लागल्यावर सर्व मुलें खदखदां हंसूं लागलीं. "गुलामांनो! डबी लपवून ठेवली आहे का?"

"डबीचना! पहिल्यानें एखादा श्लोक म्हणा. म्हटलांत तर देऊं!" मुलें म्हणालीं."

"डोकें तुमचें! मी इतके श्लोक म्हटले, आला का एक तरी?"

"श्लोक नाहीं आठवत पण तुम्ही सांगितलेल्या गोष्टी छान आठवतात आम्हांला." एक मुलगा म्हणाला.

"तुम्ही गेल्यापासून एक देखील नवीन गोष्ट आम्ही ऐकली नाहीं!" दुसरा नातू म्हणाला.

मुलें गप्पांत रंगलेली पाहून आजोबांनीं चटदिशी ज्याच्या हातांत डबी होती त्याच्या हातांतून काढून घेतली आणि तपकीर नाकांत कोंबीत म्हणाले—"खोटें बोलावें तर विश्वास बसेल असें खोटें बोलावें. ते पहा चांदोबाचे अंक कोपऱ्यांत पडलेले दिसत आहेत."

"तुमच्या तोंडून ऐकलेल्या गोष्टींत मजा वाटते आजोबा!" खोटें बोलणारा नातू म्हणाला.

"मग सांगणार ना आजोबा!" दुसऱ्या मुलानें विचारलें.

"सांगतों! सांगतों! सांगतों! खोटें बोलावें तर विश्वास बसेल असें बोलावें या विषयींच एक गोष्ट सांगतों." असें सांगून आजोबांनीं गोष्ट सांगायला सुरवात केली.

एक राजा होता. त्याच्या दरबारी दोन अधिकारी होते, एक नेहमीं खरें बोले व दुसरा नेहमीं खोटें. खरें बोलणारा खरें बोलूनच राजाची करमणूक करी. पण खोटें बोलणारा चुकून देखील खरें बोलत नसे. तरी राजाची त्याच्यावर फार मर्जी होती. राजानें त्यालाच मोठा हुद्दा दिला व त्याला पगार पण मोठा मिळत असे. पण सत्यवादी अधिकाऱ्याला बेताचा पगार मिळे.

एकदां सत्यवाद्याची बायको त्याला म्हणाली—"तुम्ही एकट्यानेंच खरें बोलण्याचा मक्ता घेतला आहे का? खोटें बोलणाऱ्या-च्या घरांत लक्ष्मी पाणी भरते आहे. मग



तुमचें काय जातें खोटें बोला कीं जरा! उरलेलें आयुष्य सुखानें जाईल, म्हणतें."

दुसऱ्या दिवशीं सत्यवादी राजाच्या दरबारी जाऊन त्याला एकांतांत भेटला व म्हणाला—"खरें बोलण्याचें प्रायश्चित्त आज-वर मी खूप भोगलें. मला असत्यवादीच्या पदावर कां नाहीं नेमीत?"

राजानें त्याला कांहीं एक उत्तर दिलें नाहीं व सत्यवादीला असत्यवादीच्या जागीं नेमलें. कारण जास्त पगाराच्या लोभानें हा आला आहे हें राजाला कळलें होतें. राजानें हुकूम काढला व सत्यवादीला बोलावून



म्हणाला—“ तुला या कामावर नेमलें आहे. तुझें काम समाधानकारक असेल तर तुला याच जागेवर कायम करीन.”

दुसऱ्या दिवशीं सत्यवादी असत्यवादीच्या जागेवर येऊन बसला. राजानें इतर सर्वांची विचारपूस करून नंतर सत्यवादीला विचारलें. “ बोला ! कांहीं विशेष ?”

सत्यवादी कांहीं तरी खोटें बोललें पाहिजे असा विचार करून म्हणाला— “ विशेष काय असणार महाराज ! आपल्या कानावर ही गोष्ट आली आहे कीं नाहीं मला माहीत नाहीं, एक मनुष्य पाण्यांत पडला आणि जागच्या जागीं जळून मरून गेला.”

“ पाण्यांत पडून मनुष्य जळून का जातो ?” राजानें हंसत विचारलें. सत्यवादीची वाचा बंद झाली. त्याला उत्तरच सुचेना. राजानें असत्यवादीकडे वळून विचारलें—“ काय हो ! तुम्हांला माहीत आहे का ? पाण्यांत पडलेला मनुष्य जळून कसा काय मेला ?”

“ माहीत आहे महाराज ! तो मनुष्य एका नावेंत चुना भरून मधें बसून चालला होता. नावेंत पाणी शिरलें व चुना विरघळून गेला. पाण्याला उकळी फुटली व त्यांत तो मनुष्य जळून मरून गेला.”

“ तर मग बरोबर !” राजानें पुन्हां सत्यवादीला विचारलें—“बरें आणखी कांहीं ?” त्यांत त्याला आणखी एक संधी देण्याचा हेतु होता. सत्यवादी म्हणाला—“ महाराज तुम्हांला माहीतच असेल, कांहीं दिवसांपूर्वी युवराज शिकारीला गेले होते. त्यांनीं एक बाण हरणावर सोडला. बाण लागला पायाच्या खुराला, पण निघाला डोक्यांतून ?”

“ अरे पण जो बाण खुराला लागला तो डोक्यांतून कसा काय निघाला ?” राजानें शंका केली.

सत्यवादी पुन्हां घुटमळला. त्याला उत्तर सुचेना. राजानें असत्यवादीकडे वळून पाहिलें. हें कसें घडलें तुला माहीत का ?”

“ मला माहीत आहे महाराज ! युवराजांनीं बाण सोडला तेव्हां हरण आपल्या खुरानें डोकें खाजवीत होतें महाराज ! एवढेंच कारण होतें. नाहीं तर ही अशक्य गोष्ट घडली नसती.” असत्यवादीनें थाप मारून दिली.

राजानें सत्यवादीला दोन संध्या दिल्या व दोन्ही वेळ तो स्वतःच तोंडघशी पडला. त्याला कोण काय करणार ? राजानें तरी देखील त्याला तिसरी संधी देण्याचें ठरवून विचारलें—“ बरें, तें सोडा, आणखी कांहीं असेल तर सांगा !”

राजानें विचारल्याबरोबर कांहीं तरी उत्तर दिलें पाहिजेच असा विचार करून सत्यवादी म्हणाला—“ महाराज तुम्हांला माहीत असेल कदाचित, परवां जो मोठा पूर आला होता त्या पुरांत एक मोठा दगड तरंगत येऊन काठाला लागला.”

“ दगड तरंगत येऊन काठाला लागला ? तो कसा काय बुवा, सांगाल कीं नाहीं !” राजानें पृच्छा केली.



सत्यवादीची वाचा पुन्हां बंद झाली. तो असत्यवादीकडे पहात उभा राहिला. "आतां तूंच दे बाबा याचें उत्तर!" जणुं कांहीं असेंच तो सुचवीत होता.

असत्यवादी शांतपणें म्हणाला—"माहीत आहे महाराज! त्यांत विशेष असें कांहीं नाहीं. गेल्या वर्षीं नदीकाठीं मळेकऱ्यांनीं दूधभोपळे लावले होते. भोपळे इतके लागले कीं ते तोडून देखील घेऊन जाऊं शकले नाहींत. अर्थात ते वाळले. वाऱ्यानें भोपळ्याचे वेल दगडांत जाऊन गुरफटले. त्या नंतर पूर आला. त्या वेळीं भोपळे तरंगूं लागले व वेलींत गुरफुटलेला दगड पण ओघाबरोबर वाहूं लागला. पुराचें पाणी ओसरल्यावर दगड काठावर राहून गेला. सत्यवादी तीच गोष्ट सांगत होता आपल्याला." असत्यवादी म्हणाला.

सत्यवादी मान खालीं करून उभा होता. राजानें त्याला अधिक लज्जित करण्यापेक्षां त्याला बक्षिस देऊन परत पाठविण्याचें ठरविलें. त्यानें असत्यवादीला निरोप दिला व सत्यवादीला थांबायला सांगितलें.

सत्यवादी हात जोडून म्हणाला—"सत्य आखूड असतें व असत्य लांबलचक ही गोष्ट मी ऐकली होती पण ती खरी आहे, हें मी प्रत्यक्ष पाहिलें. मला असत्यवादीची जागा नको. "स्वधर्मे निधनं श्रेयः" स्वतःचें कर्तव्य पालन करीत असतां मरण आलें तरी तें पत्करलें. हेंच खरें आहे. मला माझ्या पूर्वीच्या जागींच काम करण्याची परवानगी द्यावी."

"तुझी मर्जी!" राजा म्हणाला. त्यानें त्याचा पगार वाढवला व त्याला निरोप दिला.

"खोटें बोलणें देखील सोपें नसतें. तें पचवण्याची शक्ति अंगांत असली पाहिजे.





# भूत उतरलें

**भीमू** आतां गृहस्थ झाला होता. तो आपल्या बायकोला नुसतें लक्ष्मी म्हणत नसे. 'महालक्ष्मी' म्हणे. महालक्ष्मीच्या माहेरीच म्हणजे सासुरवाडीच तो रहात असे. आतां त्याला कसलीच चिंता उरली नव्हती.

रात्रीं एकदां त्याची झोप मोडली. महालक्ष्मी घोरत होती. तिचें घोरणें ऐकून भीमूला वाटलें कीं भूतबीत तर नाहीं मानेवर बसलें! सकाळीं उठल्यावर तो गांवांत एका मांत्रिकाकडे निघाला. महालक्ष्मी नेहमीं डोळ्यांत तेल घालून नवऱ्याच्या हालचाली वर पाळत ठेवीत असे. कारण त्याच्या सारख्या भोळसटाला लोक फसवितील हें तिला माहीत होतें. म्हणून पुढें येऊन तिनें विचारलें—"कोठें निघाली स्वारी?"

"मांत्रिकाकडे चाललों आहें!" भीमू म्हणाला.

"मांत्रिकालाच बोलवायला स्वतः जाण्याची काय गरज? गड्याला नाहीं का पाठवितां येत?" तिनें विचारलें.

"होय! पण मी त्याच्याजवळ जें बोलणार आहें तें तूं ऐकतां कामा नये." भीमू म्हणाला.

भीमू मांत्रिकाला बोलावून एका खोलीत गेला आणि म्हणाला—"मला वाटतें कीं माझ्या बायकोच्या अंगांत भूत शिरलें आहे. ती झोपली म्हणजे तें तिच्या नाकांतून गुरगुरूं लागतें. मला नाहीं तें आवडत. तें उतरविण्यासाठीं कांहींतरी उपाय करा." भीमू म्हणाला.

मांत्रिकाला भीमूचा मूर्खपणा कळला. बायकोच्या घोरण्याला स्वारी भूत समजते आहे हें देखील त्याला कळत नव्हतें.

आपलें भाग्य उदयाला आलें म्हणून हा मूर्ख आपल्या गांवाचा जावई झाला असा

भीमूचा पराक्रम ] [श्री. मा. गो. मोरे









विचार करून मांत्रिक म्हणाला–"असलें भूत उतरवायचें म्हणजे थट्टा नाहीं. दोन हजार रुपये तरी खर्च होतील."

"वाटेल तो खर्च झाला तरी चालेल, पण भूत उतरलें पाहिजे!" भीमू म्हणाला.

महालक्ष्मी आड उभी राहून दोघांचें बोलणें ऐकत होती. त्या मांत्रिकाची खोड मोडण्याचें ठरवून ती पुढें येऊन म्हणाली–"आज जेवूनच जा कीं." मांत्रिक तयार झाला. महालक्ष्मीनें त्याला पंचपक्वान्नांचें जेवण वाढलें. मांत्रिक पोटभर जेवला. जेवण अंगावर आलें म्हणून विडा खाऊन वामकुक्षीसाठीं जरा आडवा झाला आणि घोरूं लागला.

महालक्ष्मीनें भीमूला बोलावून मांत्रिक जोरजोरानें घोरत असलेला दाखवलें व म्हणाली–"पाहिलेंत याला. तुम्हांला लुबाडण्यासाठीं यानें भूत माझ्या अंगांत सोडलें होतें. ह्याच्या अंगांतलें भूत उतरविलें नाहीं तर तें पुन्हां माझ्या अंगांत शिरेल. त्याच्या भुताला प्रथम बडवून काढा. नाहीं तर पुन्हां रात्रीं येईल माझ्या अंगांत."

"असें होय!" असें म्हणत भीमूनें दोन बुक्के मारले आणि म्हणाला–"नीघ बाहेर! पुन्हां घरांत पाऊल ठेवलेंस तर–"

झोप अशा तऱ्हेनें मोडल्यामुळें मांत्रिक घाबरूनच गेला. पागोटें डोक्यावर ठेवून उपरणें संभाळीत त्यानें तेथून पाय काढला. भीमू म्हणाला–"पुन्हां कधीं तोंड दाखविलेंस तर पहा तंगडीच तोडून ठेवीन."

त्या दिवसापासून भीमू बायकोच्या सल्ल्याशिवाय कांहीं करीत नसे. भीमूच्या स्वभावांत फार पालट झाला व दोघांचा संसार सुखासमाधानानें चालूं लागला. (संपूर्ण)





# अयोध्याकांड

भरत पितृवियोगानें दुःखी होऊन बराच वेळ रडत राहिला. नंतर त्यानें आईला विचारलें–"आई! मरणसमयीं बाबा कांहीं म्हणाले का? काय म्हणाले ते?"

"रामा, लक्ष्मणा, सीते!–असें ओरडत त्यांनीं डोळे मिटले." कैकेयी म्हणाली.

तें ऐकून भरताला आश्चर्य वाटलें त्यानें आईला विचारलें–"म्हणजे बाबा वारले तेव्हां राम, सीता किंवा लक्ष्मण यापैकीं कोणीच जवळ नव्हतें का? कोठें गेले होते?"

"ते वनवासाला गेले आहेत. राम वल्कलवस्त्रें धारण करून वनवासाला निघाला तेव्हां सीतेनें आणि लक्ष्मणानें दोघांनी बरोबर जाण्यासाठीं हट्ट केला." कैकेयी म्हणाली.

भरतानें जास्तच चकित होऊन विचारलें–"राम वनवासाला गेला? कां? त्यानें कोणतें पाप केलें होतें. रामाच्या हातून चुकून सुद्धां कधीं अपराध होणें शक्य नाहीं. मग ही वनवासाची शिक्षा त्याला कां दिली? सांगशील कीं नाहीं?"

"तसें कांहीं नाहीं रे! महाराज रामाला राज्याभिषेक करणार आहेत हें कळल्याबरोबर मीच राजाकडून दोन वर मागून घेतले. एका वरानें तुला राज्य व दुसऱ्यानें












रामाला वनवास. आतां तुझा राज्याभिषेक ठरला आहे. वशिष्ठ ऋषी तुझा राज्याभिषेक करणार आहेत. म्हणून तूं लवकर तयार हो!" कैकेयी म्हणाली.

कैकेयीनें अगदीं शांतपणानें दिलेलें तें उत्तर ऐकून भरताला भयंकर राग आला. तो आईला म्हणाला—"म्हणजे, तूं स्वतःच आपल्या पतीचा वध केलास. रामाला वनवास दिलास. तुझें तोंड पाहणें म्हणजे एक पाप आहे. क्षत्रिय कुळांत मोठ्या मुलाला गादी देतात ही साधी गोष्ट तुला माहीत नाहीं का? राम व लक्ष्मण रानांत व मी गादीवर बसून राज्य करूं! घात केलास! तुला आतां मी कोणत्या तोंडानें आई म्हणूं! मी स्वतः रानांत जाऊन रामाला बोलावून आणतों व त्याचा राज्याभिषेक करवितों." तो पुढें असेंहि म्हणाला—"तुला हें आवडत नसेल तर तूं आपलें हें काळें तोंड घेऊन वाटेल तिकडे जा."

इतक्यांत सुमंत्र तेथें आले. भरत त्यांना म्हणाला—"मला ह्या कुलक्षणी राज्याची गरज नाहीं. मी कधींच त्याची अपेक्षा ठेवली नव्हती. हा माझ्या आईचा हट्ट होता."

नंतर भरत व शत्रुघ्न कौशल्येच्या महालांत गेले. कौशल्येनें भीतभीतच त्यांना आशीर्वाद दिला. आपल्या सांगण्यावरूनच किंवा आपल्या मतानेंच आईनें दोन्ही वर मागितले आहेत असा संशय कौशल्या मातेच्या मनांत असावा हें भरताला कळलें. म्हणून त्यानें तिच्या पायां पडून सांगितलें कीं मी रामाला कधीं वनवासाला पाठवीन कां? मी आजोळीं होतों. माझ्या मागें काय घडलें हें देखील मला कळलें नाहीं. तेव्हां कौशल्येच्या मनाचें समाधान झालें व तिनें भरताला हृदयाजवळ ओढून आशीर्वाद दिला.





तेवढ्यांत वशिष्ठ ऋषी आले व त्यांनीं त्याला समजावून सांगितलें कीं बाळ ऊठ! आतां शोक करून का महाराज परत येणार आहेत. लवकर अंत्येष्टि करून टाक.

तेलांत बुडवून ठेवलेला दशरथाचा देह पाहून भरताला जास्तच वाईट वाटलें. तो शोक करूं लागला—"बाबा! तुम्ही गेलांत! दादा वनवासाला गेला. हें राज्य संभाळणें माझ्याकडून कसें होणार!"

दशरथाच्या प्रेतयात्रेला सर्व नागरिक आले होते. अंतःपुरांतील स्त्रीया पालख्यांतून चालल्या होत्या. शव चितेवर ठेवल्यावर भरत व तिघां राण्यांनीं चितेला तीनदां प्रदक्षिणा घातली. नंतर भरतानें अग्नि दिला.

भरतानें दहा दिवस सूतक पाळलें. नंतर तेराव्या दिवशीं रीतीप्रमाणें तर्पण पिंडदान वगैरे करून ब्राह्मणांना अन्न, वस्त्र व गाई यांचें दान केलें.

भरत व शत्रुघ्न अस्थि आणायला गेले तेव्हां दोघांच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुप्रवाह चालू होता.

चवदाव्या दिवशीं भरत व शत्रुघ्न दोघे परस्परांशीं बोलत होते. शत्रुघ्न म्हणाला—"कैकेयी मातेनें कोणता वर मागून घेतला याचें मला एवढें आश्चर्य वाटत नाहीं. लक्ष्मण हें सर्व स्वस्थपणें पहात कसा काय बसला. याचें मला आश्चर्य वाटत आहे."

तितक्यांत मंथरा हंसत नटून थटून त्या बाजूला आली. तिचा हात धरून फरपटत द्वारपाल घेऊन आला व म्हणाला—"सारें कांड ह्या कुबडीमुळें झालें." तिला पाहतांच शत्रुघ्नाच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत गेली व तलवार उपसून तो तिला मारायला धांवला. तें पाहून मंथरेबरोबर आलेल्या दासी घाबरून जाऊन कौशल्येकडे धांवल्या.



मंथरा जोरजोरानें ओरडूं लागली कैकेयीनें मध्यें पडून तिला वांचविलें. तेव्हां शत्रुघ्न तिलाच खूप रागावला. "ह्या कुबडीला तूं डोक्यावर चढवून ठेवलें आहेस. तूं पतिघातिनी आहेस.

तेव्हां भरत पुढें आला व म्हणाला—"शत्रुघ्ना ! अरे ! तूं स्त्रीवध करणार का ! जर रामाला हें कळलें तर त्याला आवडेल का ! रामाला राग येईल म्हणून मी आईचा शिरच्छेद केला नाहीं. नाहींतर हिचा शेवट करून केव्हांच मोकळा झालों असतों. सोड त्या कुबडीला."

दुपारीं राजधानींतील प्रमुख नागरिक येऊन भरताला म्हणाले—"भरता ! राज्याचा हा गाडा कोणीतरी सँभाळलाच पाहिजे. सुदैवानें अद्याप राज्यांत अराजकता माजली नाहीं. राज्याभिषेक लवकर करून घे."

भरत म्हणाला—"मी गुरुजनांच्या म्हणण्याबाहेर का आहें ! पण सूर्यवंशाच्या रीतीप्रमाणें ज्येष्ठ मुलगाच गादीला वारस असतो. म्हणून मला गादीवर बसविण्याचा आग्रह तुम्ही करावा हें बरोबर दिसत नाहीं. माझ्या आईच्या इच्छेसाठीं म्हणून मी गादीवर बसायला मुळींच तयार नाहीं. मी रानांत जाऊन रामाचा राज्याभिषेक करविणार आहें. त्याचे पाय धरून, विनवण्या करून त्याला परत अयोध्येला बोलावून घेऊन येणार आहें." तो कबूल झाला नाहीं तर मी त्याच्याबद्दल वनवास घेईन. राज्याभिषेक रानांतच होणार आहे. म्हणून राज्याभिषेकाला आवश्यक सर्व सामान रानांत घेऊन जायची तयारी करा."

भरताच्या सूचनेप्रमाणें तयारी सुरू झाली, झाडें तोडून रस्ते सारखे करण्यांत आले. ओढ्यांवर पूल बांधण्यांत आले. खाचखळगे भरून काढण्यांत आले. जागोजागीं विहिरी खणण्यांत आल्या. सोईस्कर अशा जागी राहुट्या वगैरे उभारण्यांत आल्या. शरयू नदीपासून गंगेच्या काठापर्यंत जागोजागीं शिबिरें उभारण्यांत आलीं.

दुसऱ्या दिवशीं पहाटे शंखनाद, शिंगाच्या आवाज, स्तोत्रपाठ वगैरे ऐकून भरत जागा झाला. त्याच्या डोळ्यांतून अश्रू आले. तो म्हणाला—"मी राजा नाहीं. माझ्या नांवानें हा स्तुतिपाठ कशाला ! ही मंगलवाद्यें कशाला ! बंद करा सर्व !"

वसिष्ठ मुनींच्या आज्ञेनें दरबार भरला. सर्व मानकरी, दरबारी, मंत्री, सरदार व मांडलिक राजे दरबारांत हजर झाले. वसिष्ठ मुनींनीं भरताला आदरपूर्वक बोलावून राज्याभिषेक करून घेण्यास फार आग्रह केला. म्हणाला—"महाराज दशरथ प्रजेला स्वतःच्या मुलासारखे वागवीत, तूं सुद्धां राजा झाल्यावर तसेंच प्रजेचें पालन कर." पण भरत म्हणाला—"मी ज्या मातेच्या पोटीं जन्माला आलों आहें तिच्या धर्माप्रमाणें मला तुम्ही म्हणतां तें ऐकणें व त्याप्रमाणें वागणें भागच आहे. पण मी लहान तोंडी मोठा घास घेत आहें. माझें निवेदन ऐकून घ्या व मग तुम्हांला वाटेल तें करा. मला रामाशिवाय एक क्षणभर



देखील अयोध्येला राहणें रुचणार नाहीं. मी प्रथम रानांत जातों व रामाला भेटतों. त्याला बरोबर घेऊन येतों व त्याचा राज्याभिषेक आपण सर्वच मिळून करूं. तो कदाचित कबूल होणार नाहीं. म्हणून राज्याभिषेकाची सर्व तयारी करून घेऊन आपण सर्वच रानांत जाऊं या. तो परत आला नाहीं तर मी लक्ष्मणासारखा रामाच्या बरोबर वनांत जाईन. बाबांना स्वर्गांत व रामाला वनवासाला पाठवून मला माझ्या आईनें राज्य मिळवून दिलें आहे. याहून जास्त हित माझें कोण करणार आहे ! अशा अधम राजाच्या

       



राज्यांत तुम्ही सर्व सुखी व्हाल असें का तुम्हांला वाटतें !"

एवढें ऐकल्यावर सर्वांच्या मनाचें समाधान झालें. सर्व रामदर्शनासाठीं आतुरतेनें वन-गमनाची तयारी करूं लागले.

दुसऱ्या दिवशीं भरत पहाटे उठून वन-गमनास निघाला. त्याच्याबरोबर चतुरंग सैन्य होतें,—नऊ हजार हत्ती, साठ हजार रथ, एक लाख घोडेस्वार व असंख्य पायदळ सैन्य.

कौसल्या, सुमित्रा आणि कैकेयी पण पालख्यांत बसून निघाल्या. कैकेयीच्या माने-वर बसलेलें भूत उतरलें होतें. तिची चूक तिच्या मुलानेंच तिच्या पदरांत बांधली होती. तिला कृतकर्माबद्दल पश्चात्ताप वाटत होता. तिची पालखीच सर्वांत पुढें होती.

अयोध्यानगरी ओसाड पडली. म्हातारे व लुळे पांगळे स्वतःच्या भाग्याला दोष देत अयोध्येला राहाले. तरी कांहीं लोक रथांत, बैल गाडींत किंवा इतर वाहनांत बसून निघालेच.

इतकें मोठें सैन्य घेऊन भरत गंगेकाठीं शृंगवेरपुरीं येऊन पोंचला. त्यानें नदीकाठीं सोईची जागा पाहून राहुट्या उभारण्यास व उतरण्यास सांगितलें. तो मंत्र्यांस म्हणाला—"आजची रात्र आपण नदीकाठींच विश्रांती घेऊं या. मी नदींत उतरून तर्पण करतों."

महासमुद्रासारखी भरताची सेना गंगेकाठीं उतरलेली निषादराज गुह यानें पाहिली. त्यानें भरताला रथांतच ओळखलें. त्यानें आपल्या कांहीं विश्वासपात्र अनुयायांना जवळ बोलाविलें आणि म्हणाला—"भरत इतकें मोठें सैन्य घेऊन रानांत का बरें निघाला आहे! राम रानांतून परत येऊन आपलें राज्य कदा-चित भरत मागील म्हणून त्याचा कांटा दूर करण्याचा हेतू तर नसेल! कांहीं असो, रामाच्या रक्षणाची जबाबदारी आप-








त्यावर आहे. तो माझा सखा मित्र आहे. म्हणून पांचशें नावा तयार ठेवा. प्रत्येक नावेंत शंभरजण असले पाहिजेत. वेळ पाहून वागतां येईल. नावेंत शस्त्रास्त्रें व रसद भरून घ्या. भरत मैत्रीच्या भावनेनें जात असेल तर आपण त्याचे मित्र व तो शत्रुबुद्धीनें जात असेल तर आपण त्याचे शत्रू."

नंतर गुह भरत कोणत्या हेतूनें निघाला आहे हें पाहण्यासाठीं बरोबर उपहार म्हणून मासे, मध व फळफळावळ घेऊन निघाला. गुह येत असलेला पाहून सुमंत्र पुढें गेला व त्याला आदरपूर्वक भरताजवळ बोलावून घेऊन आला. त्यानें गुह राजाची ओळख करून दिली. म्हणाला—"हा रामाचा सखा व मित्र आहे." गुहानें सर्व उपहार भरतासमोर ठेवून त्याला नमस्कार केला व म्हणाला—"तुम्ही चक्रवर्ती व मी एक गरीब निषादराज. या गरिबाचें आतिथ्य स्वीकार करावें अशी विनंती करण्यासाठीं आलों आहें. पहिल्यापासून माहिती नसल्यामुळें कांहीं उणीव राहिली तर माफी करावी."

भरतानें गुहराजाला सन्मानपूर्वक बसायला सांगून त्याच्या मनाचें सर्वप्रकारें समाधान केलें व म्हणाला—"राजा! हें रामाचें चतुरंग सैन्य आहे. या सर्वांचें तूं आतिथ्य करणार आहेस. आनंदाची गोष्ट आणखी काय असूं शकणार! परंतु आम्हांला भरद्वाज मुनींच्या आश्रमांत जावयाचें आहे. आम्हांला वाट दाखविलीस तर तुझे आमच्यावर फार उपकार होतील. येथून वाट सरळ नाहीं असें ऐकतों."

"मी व माझे अनुयायी तुम्हांला वाट दाखवायला येतील. तुम्हांला थोडा देखील त्रास होणार नाहीं." गुह म्हणाला.



# मोठे वासे

सिलोन देशांत कँडी नगरानजीक एक प्रसिद्ध बोटॅनिकल गार्डन आहे. त्याचें क्षेत्रफळ १५० एकर आहे.
येथें ब्रह्मदेशांतील वासे इतके उंच झाले आहेत कीं जगांत इतरत्र कोठेंहि इतके उंच वासे पहावयास मिळत नाहींत. या वाशांची उंची १२० फूट आहे व रुंदी एक फूट.









तोंड फिरवलें गौरीनें, अन्
वदली त्याला तिची सखी,–
"शिवास वरलें गिरितनयानें;
ध्यानीं त्याच्या सखी सुखी !"

ब्रह्मचारि स्मित करुनी वदला–
"शिवास वरलें योगी तो !
आणि भिकारी मुलखाचा तो
आहे कांहीं विचार तो ?

"आणि वासुकीच्या कोपाचा
विचार केला आहे का ?
कामरिपू तो, कर विचार हा,
वरण नारिचें करील का ?

"रुचलें नाहीं तुला रूप मम
निवड कुणा तर इतराला !
वास स्मशानीं असतो ज्याचा
रुचतें वरणें का त्याला ?"

"पुरे जाहली निंदा त्याची
जा तूं अपुल्या वाटेनें !"
उमा म्हणुन हें उभी राहली
तेव्हां अतिशय रागानें ॥

परंतु नव्हता ब्रह्मचारि तो
होतें दिव्य मनोहर रूप ।
चकित पार्वती पाहुं लागली
पुजिलें होतें जें तें रूप ॥

प्रसन्न मुख तें पाहुनि हंसली,
तपःपूत फल प्रगट जणूं ।
उमा शिवाची अपूर्व जोडी
कोण्या शब्दानें वर्णूं ?






[ ४ ]

[लखू त्या एक शिंगी घोड्यावर बसून भयंकर दरींत पोंचला. तेथें गुहेंत त्याची मांत्रिकाशीं गांठ पडली. मांत्रिकानें त्याला काळभैरवाची मूर्ती दाखविली. त्याच्या डोळ्यातून लखूला रानातच नव्हे तर जगांत घडणारी प्रत्येक गोष्ट दिसत होती. एक भयंकर मनुष्यवजा वटवाघूळ आकाशांत उडत उडत रानांत गेलें होतें. त्याचें डाकें माणसासारखें होतें पण पंख वाटवाघळासारखे होते. तो प्राणी राजाच्या सैन्याला पळवीत होता. पुढें वाचा]

त्या प्राण्याचें तें भयंकर रूप पाहून राजाच्या सैन्याची गाळणच उडाली व तें वाट फुटेल तिकडे पळूं लागलें. लखूला तें सर्व पाहून आश्चर्य वाटलें. त्यानें स्वतः तसा मनुष्य किंवा तसा पक्षी पूर्वी कधीं पाहिला नव्हता. फक्त तोंड माणसासारखें पण शरिराचा सर्व भाग व पंख वटवाघळासारखे. स्वतःच्या डोळ्यानें त्यानें तो विक्षिप्त प्राणी पाहिला असल्या कारणानें संशय करण्याला जागाच उरली नाहीं.

"बाळ लखू ! काळभैरवाची शक्ति पाहिलीस ना ! आतां तुझ्या वडिलांवर कोणतेंहि संकट येणार नाहीं. तूं निर्धास्त रहा. तुझ्या रक्षणाची व तुझ्या वडिलांच्या रक्षणाची सर्व जबाबदारी माझ्यावर आहे मी तुला पूर्वीच सांगितलें आहे. तुझ्या खांद्यावरचें



कपडे जरा बाजूला सार. तुझा सर्व संशय दूर करून टाकतों."

लखूच्या मनांत मांत्रिकाविषयीं आदरभाव उत्पन्न झाला. मांत्रिकानें त्याच्या वडिलांचें रक्षण केलें होतें. त्यानें मांत्रिकाच्या सांगण्या-प्रमाणें आपल्या खांद्यावरचें कापड बाजूला सारलें. मांत्रिकानें त्याचा खांदा निरखून पाहिला व म्हणाला—"याला म्हणतात नशीब! भाग्यवान आहेस खरा. एका चक्रवर्ति राजाचीं सर्व लक्षणें आहेत." असें सांगून त्यानें लखूची पाठ थोपटली. "थांब!" असें म्हणत मांत्रिक गुहेच्या बाहेर निघून गेला.

मांत्रिकाला काय पाहून मी भाग्यवान आहे हें कळलें हें पाहण्यासाठीं लखूनें वळून खांदा वांकवून पाहण्याचा प्रयत्न केला. तेथें त्याला तीळ किंवा इतर कांहीं विशेष खूण दिसली नाहीं. तेवढ्यांत मांत्रिक कसला तरी पाला हातांत घेऊन परत आंत आला. म्हणाला—"बाळा लखू! तुला तो तीळ उघड्या डोळ्यांनीं दिसणार नाहीं. हा पानांचा रस मी लावतों. मग तुला सर्व दिसेल व मी म्हणतों त्याची साक्ष पटेल." असें सांगून त्यानें तो रस लखूच्या खांद्याला चोळला.

रस चोळल्याबरोबर खांद्याजवळ पाठीवर एका नागसांपाचें चिह्न दिसलें. तें पाहून मांत्रिक खूष होऊन ओरडला—

"आतां आपल्याला वश होणार नाहीं, अशी एक देखील शक्ति या जगांत नाहीं एवढें मी सांगूं शकतों. काळभैरव, आदि-भैरव, उन्मत्त भैरव आपल्या समोर हात जोडून उभे राहतील पहा." नंतर जोरानें मंत्र म्हणत त्यानें काळभैरवाला साष्टांग नमस्कार केला आणि मंत्रजाप करीत समाधिस्थ झाला.

लखू बराच वेळ वाट पहात उभा राहिला. पण मांत्रिकाची समाधी उतरली नाहीं.



पंधरा मिनिटें झाली तरी कांहीं हालचाल झाली नाहीं. हें पाहून त्याला आश्चर्याबरोबर भय देखील वाटूं लागलें. आपल्याला या काळभैरवासमोर बळी द्यायला तर हा घेऊन नसेल ना आला. ती शंका मनांत येतांच त्याचें आपादमस्तक सर्व अंग हादरलें. त्यानें तलवार व धनुष्यबाण गुहेच्या बाहेर ठेवले होते. ते त्याला गुहेंतून दिसत होतेच. लखू एका मिनिटांत तेथपर्यंत गेला आणि उचलण्यासाठीं वांकला मात्र, त्याला एक अनोळखी आवाज ऐकूं आला—"लखू थांब, घाई करूं नकोस!" लखूनें वर डोकें करून पाहिलें. समोर त्याला वीस बावीस वर्षांचा एक तरुण दिसला.

"कोण तूं? इकडे कशाला आला आहेस?" लखूनें चकित होऊन विचारलें.

"मी ब्रह्मदंडी मांत्रिकाचा शिष्य आहें. मी बाहेरून कोठून नाहीं आलों. मी येथेंच असतों." तो तरुण म्हणाला.

"ब्रह्मदंडी मांत्रिक? कोण कुठें असतो तो?" लखूनें त्याला विचारलें.

"अरे खुळ्या! तुला हें सुद्धां माहीत नाहीं का?" म्हणत त्यानें काळभैरवासमोर साष्टांग करणाऱ्या काळभैरवाकडे बोट दाखविलें.



"तू डोक्यावर वीज पडावी असें मधां एकदम बोललास म्हणून मी किती भ्यालों होतों!" लखू तलवार व बाण हातांत घेत म्हणाला.

"तूं असा भिऊं लागलास तर पुढें येणाऱ्या मोठमोठ्या संकटांना तोंड देण्यास आवश्यक साहस तुझ्यांत कोठून उरणार?" तरुण म्हणाला.

"येणारें संकट! म्हणजे काय? मला नाहीं कळलें!" लखूनें चकित होऊन विचारलें. लखू विचार करूं लागला, त्या एक शिंगी घोड्याला पाहिलें तेव्हांपासून










आपण एकाहून एका मोठ्या संकटांत सांपडत गेलों आहों. त्यानें तो एक शिंगी घोडा कोठें दिसतो का पाहिलें. पण तो अदृश्य झाला होता.

"तूं कोणाला शोधतो आहेस?" त्या तरुणानें विचारलें.

लखू म्हणाला—"मी एका विक्षिप्त एक शिंगी घोड्यावर बसून आलों होतों. तो कोठें दिसत नाहीं. जवळपास कोठें तरी असेल म्हणून पहात होतों."

तो तरुण जोरानें हंसला व म्हणाला—"तो विक्षिप्त घोडा मीच! मी ब्रह्मदंडी मांत्रिकाचा शिष्य आहें हें मी थोड्या वेळापूर्वी तुला नव्हतें का सांगितलें? माझें नांव जयमल. मी तुला येथवर आणलें. म्हणून मी तुझ्या रक्षणासाठीं यथाशक्ति प्रयत्न करणार आहें."

त्याच्या बोलण्यावरून लखूनें मांत्रिक व त्याच्या शिष्यामध्यें कांहीं तरी वितुष्ट असावें हें ओळखलें. त्यानें गुहेंत वांकून पाहिलें. ब्रह्मदंडी मांत्रिक काळभैरवाच्या मूर्तीसमोर निश्चेष्ट पडलेला होता.

"तो निश्चेष्ट पडलेला आहे. आपण कांहीं केलें तरी त्याला कळण्यासारखें नाहीं. त्याला समाधीची मूर्छा आलेली आहे. आपण त्याला जागें केलें नाहीं तर सूर्यास्त होईपर्यंत तो तसाच पडून राहील." जयमल म्हणाला.

"बरें पण, तूं थोड्या वेळापूर्वी म्हणालास कीं माझ्यावर कांहीं तरी मोठें संकटें येणार आहे, तर तीं केव्हां व कोठून येणार आहेत?" लखूनें विचारलें.

जयमलनें ब्रह्मदंडी मांत्रिकाकडे बोट दाखविलें.

"तरमग, मी या डोंगरावरून पळून गेलों तर मला अडवायला कोण तेथें आहे?" लखूनें विचारलें.



जयमल स्मित करून लखूच्या खांद्यावर हात ठेवून त्याला गुहेच्या तोंडापासून थोडें दूर घेऊन गेला व म्हणाला—"जो एकदां या ब्रह्मदंडीच्या तावडींत सांपडला त्याला सुटका मिळणें सोपें नाहीं. म्हणून त्याचा वध केल्याशिवाय येथून निघून जाणें बरोबर नाहीं."

"तर मग, तें काम आतांच उरकून टाकूं या. अजून तो बेशुद्धच आहे. मी या तलवारीनें त्याला एका क्षणांत वाटेला लावतों." म्हणत लखू गुहेंत निघाला.

जयमल त्याला अडवून म्हणाला—"घाई करूं नकोस आपण दोघांनीं एक जुटीनें काम केलें तर आपल्याला निश्चितपणें यश मिळेल. आपलें आपसांत भांडण होत नाहीं तोपर्यंत कोणी आपल्या केसाला देखील धक्का पोंचवूं शकणार नाहीं. तूं त्याचा वध केलास तरी तुला काय फायदा होणार? तूं या डोंगरावरून पळून गेलास समज तरी तुला शत्रूचा गुप्तचर म्हणून ब्रह्मपुराचे सैनिक पकडून नेतील, हें विसरूं नकोस."

"अरे, त्या सैनिकांना एका विक्षिप्त पक्षानें कांहीं वेळापूर्वी पळवून लावलें हें मी स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलें." लखू म्हणाला.



तें ऐकून जयमल पुन्हां जोरानें हंसला. म्हणाला—"वेड्या! तो पण मीच होतों." नंतर तो लखूला बरोबर घेऊन दूर एका उंच टेंकडीवर पोंचला आणि खालच्या सखल प्रदेशाकडे बोट दाखवून म्हणाला—"खालीं पहा! हे सर्व सैनिक तुझ्या शोधार्थ हिंडत आहेत. त्यांनीं आतापर्यंत सारें रान पालथें घातलें आहे. म्हणून तूं येथून निसटून गेलास तरी त्यांच्या हातांतून सुटणें तुला शक्य नाहीं."

लखूला तें सर्व पाहून आश्चर्य वाटलें. कारण त्याला खरोखरच शेकडों सैनिक व स्वार हिंडत असलेले दिसले. "म्हणजे




मांत्रिकानें काळभैरवाच्या डोळ्यांतून जें कांहीं दाखविलें होतें तें सर्व खोटें होतें म्हणावयाचें?" लखूनें चकित होऊन विचारलें.

त्यांत तुला कांहीं शंका वाटते का? मलाच त्यानें विक्षिप्त एक शिंगी घोडा करून पाठविलें होतें. तुझ्यावर संकट आलें कीं तूं खास पळणार हें जाणूनच त्यानें तुझ्याविरुद्ध संकटाचें जाळें तुझ्या चारी बाजूला टाकलें व तूं माझ्यावर विश्वास टाकून त्याच्याहून मोठ्या संकटांत स्वतः होऊन उडी टाकलीस! मला त्याच्या मंत्र शक्तिसमोर मान तुकवावी लागते व त्याची मदत करावी लागते. तुझ्या एका खांद्यावर जो सांपाचा तीळ आहे तो पाहून त्याला आनंद गगनांत मावेनासें झालें आहे. आजपर्यंत जें मंत्रबळ प्राप्त करून घेण्याच्या कामांत त्याला यश मिळालें नाहीं तें तुझ्या मदतीनें मिळेल अशी त्याला खात्री वाटते. तुझा उपयोग त्या कामासाठीं तो करणार आहे." जयमल म्हणाला.

"तें मंत्रबळ किती प्रकारचें आणि कशा स्वरूपाचें आहे?" लखूनें विचारलें.

जयमल लखूकडे पाहून थोडा हंसला व कांहीं वेळ त्याच्याकडेच पहात उभा राहिला. नंतर त्याचे दोन्हीं हात आपल्या हातांत घेत तो म्हणाला—"लखू आजपासून आपण दोघे मित्र झालों. काय वाटेल तें झालें तरी परस्परांची ही मैत्री कायम राहील. तुला मी एवढेंच सांगू इच्छितों कीं तुझ्यावरच नव्हें तर माझ्यावर देखील ह्या बखंडी मांत्रिकामुळें संकट येणार आहे. आपणां दोघांत ऐक्य राहालें तर आपल्यापैकीं एकाचाहि जीव धोक्यांत नाहीं. एवढेंच नव्हें तर तो स्वतः करितां म्हणून जें मंत्रबळ मिळविण्याच्या प्रयत्नांत आहे तें त्याच्याऐवजीं आपणांलाच लाभेल. तो तुझा कशा तऱ्हेनें उपयोग करणार आहे ही गोष्ट........"






जयमलचें तें वाक्य अर्धेंच राहालें व डोंगरांत एक वीज कडाडल्यासारखा आवाज झाला व भूकंपासारखी पृथ्वी डोलूं लागली. त्यानंतर मोठमोठे दगड व शिळा खालीं घसरूं लागल्या. लखू व जयमल ज्या दगडावर उभे होते तो सोडून पळाले. इतक्यांत अक्षदंडी मांत्रिक गुहेंतून ओरडत बाहेर आला. राजाकडे पहात तो म्हणाला—"काळभैरवा! काळभैरवाची अपूर्व शक्ति! माझ्या मंत्राचा प्रभाव! डोंगरच डोलत आहे........हाः हाः हाः! हाः हाः हाः!!" असा जोर जोरानें हंसूं लागला. नंतर पुन्हां म्हणाला—"आतां वाटल्यास मी ह्या डोंगराला आकाशांत उडवूं शकतों. पहा ते राजाचे शिपाई व सैनिक! डोंगरावर चढणार होते काय! त्यांच्या डोक्यावर या मंत्रवलेल्या डोंगराचे दगड आदळत आहेत. आतां त्यांना सुटका नाहीं. पळून जाऊं लागले तरी मंत्रवलेले दगड त्यांचा पाठलाग करतील. हाः हाः हाः!!"

लखू व जयमलनें खालीं दरींत पाहलें. मांत्रिक म्हणाला तसे राजाचें सैन्य पळत होतें व त्यांच्यावर दगडांचा मारा चालू होता. पायदळ सैन्य व घोडेस्वार दगडांच्या माराखालीं चिरडून गेले.

लखू कांहीं वेळ स्तब्ध जागच्या जागीं चकित होऊन तें भयंकर दृश्य पहात उभा राहिला. तें भयंकर दृश्य पाहून तो घाबरून गेला होता हें सांगण्याची गरजच नाहीं. तो स्वतःला सावरून उभा राहणार इतक्यांत मांत्रिक मोठ्यानें हंसून म्हणाला—"जयमल! माझ्या शिष्या! जा, लखूला चित्त्यांच्या गुहेसमोरच्या हत्तींच्या तलावांत स्नान घालून घेऊन ये. सूर्यास्तानंतर आपल्याला अनेक कामें करावयाचीं आहेत!" तो म्हणाला.

(पुढें चालू)



# अनामक

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ गेला व झाडावरचें प्रेत काढून स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! अनामकासारख्या हट्टी माणसाच्या स्वभावांत देखील अयशस्वी झाल्यावर बदल झाला. पण तूं अनेक वेळां अयशस्वी झालास तरी तुझ्या स्वभावांत यत्किंचित देखील बदल झाला नाहीं. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्या अनामकाची गोष्ट तुला सांगणार आहें." असें सांगून वेताळानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

एका रानांत अनामक नांवाचा एक भिल्ल तरुण रहात असे. त्याच्या अंगांत हत्तीचें बळ होतें व तो वाघासिंहांशीं एकट्यानें झुंजत असे. त्याला स्वतःचें घर असें नव्हतें. झाडाखालीं किंवा नदीकाठीं सोईची जागा पाहून तो झोंपत असे.



त्याच्याजवळ एक तलवार व भाला या खेरीज दुसरें शस्त्र नव्हतें. एकदां दुपारीं झाडाखालीं तो बसला असतां दूर नदी काठीं त्याला एक हरण दिसलें. तो त्याच्या पाठीमागून धावूं लागला. हरणाला जिवंत धरण्याचा त्याचा विचार होता. हरणाच्या बरोबरीनें धांवण्याची त्याला संवय होती. तो बराच वेळ हरणाच्या मागें धांवत राहिला, पण हरण त्याच्या हातीं आलें नाहीं. हरणाच्या मागें धांवत तो एका वाळवंटांत आला व तें वाळवंट ओलांडून एका अपरिचित अशा रानांत येऊन पोंचला. हरण अदृश्य झालें.

बराच वेळ उन्हांत धांवत राहल्यानें अनामकाला खूप तहान लागली होती. त्याला भूक पण लागली होती. आतां परत आपल्या ओळखीच्या रानांत पोंचणें कठीण आहे व या रानांत पोटभर खायला मिळणें तर दूरच, उपाशी मरावें लागणार असा विचार करीत तो रानांत हिंडत असतां त्याला दूर थोडा धूर दिसला. तो त्या दिशेनें निघाला. वाटेंत त्याला एक ओढा दिसला. त्यानें पाणी पिऊन आपली तहान भागविली. पाण्यांत बुडी मारून आंघोळ केली व झाडावर चढून जांभळें व पेरू तोडून खाले. आतां त्याला हुरूप आला व तो त्या रानांत कोठें काय पाहण्यासारखें आहे, पाहूं लागला. ज्या बाजूला त्याला धूर दिसला होता त्याची आठवण झाली व तो तिकडे निघाला. जवळ गेल्यावर त्याला एक झोंपडें दिसलें. कोणत्या तरी ऋषीचा तो आश्रम असावा, तेथें पोटभर खायला मिळेल असा विचार करून तो त्या झोंपडींत शिरला.

पण त्याला वाटत होतें तसा तो ऋषीचा आश्रम नव्हता. आंत ऋषींच्या जागीं एक मदनाचा जणूं पुतळाच त्याला दिसला. त्याच्या शेजारीं अप्सरेसारखी सुंदर तरुणी बसली होती. वल्कल वस्त्रांच्या ऐवजी राज-पुरुषांना साजतील अशीं वस्त्रें त्यांच्या अंगावर पाहून व आसनाऐवजीं गालिच्यावर गादी घालून लोडाशीं टेकून बसलेल्या त्या तरुण स्त्री पुरुषांना पाहून अनामकाला आश्चर्याचा धक्काच बसला. ती तरुणी वयानें त्याच्याहून मोठी दिसत होती.

"यावें. दुरून कोठून तरी आलेले दिसतां! अक्का, यांना प्यायला थोडें पाणी दे!" तो तरुण म्हणाला. त्या तरुणीनें एका सुवर्णपात्रांत पाणी आणून अनामकाला प्यायला दिलें.

अनामकानें इतक्या सुंदर तरुणीला पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें. तिचें सौंदर्य पाहून तो मुग्ध झाला. म्हणाला–"काय पण रूप आहे! आज माझें भाग्यच उदयाला आलें म्हणावयाचें."

तो तरुण नम्रपणें त्याला म्हणाला– "तुम्ही कोण आम्हांला माहीत नाहीं. आमच्या घरीं अतिथि म्हणून आलां आहां. अतिथि हा देवासारखा असतो. तुमचें आतिथ्य करणें हें आमचें कर्तव्य आहे. आमचें आतिथ्य स्वीकार करून आपण आपल्या वाटेनें जावें." अशा विनम्र शब्दांत












अशिष्ट व्यवहाराबद्दल अनामकाचा थोडा तिरस्कारपण त्यानें केला.

"माझें नांव अनामक आहे. तूं माझें शौर्य पराक्रम ओळखून बोलत नाहींसें दिसतें आहे. हत्तीचें बळ माझ्या अंगांत आहे. मी एकटा शंभर योद्ध्यांना पुरेसा आहें." अनामकानें जरा करड्या आवाजांत उत्तर दिलें.

"माझें नांव सुमित्र! ही माझी थोरली बहीण माधवी. आम्ही विशाल नांवाच्या राजाचीं मुलें. आमचा मोठा भाऊ गादीवर बसला आहे. हा आमच्या वडिलांचा आश्रम आहे. वडील वारल्यानंतर आम्ही येथें राहूं लागलों." तरुण म्हणाला.

"तरमग मी तुझ्या बहिणीशीं लग्न करणार!" अनामक म्हणाला.

"पण लग्न करायचें नाहीं असा आमचा दोघांचा विचार आहे." सुमित्र म्हणाला.

अनामक दरडावून म्हणाला—"तुमची इच्छा नसेल. त्याची मला पर्वा नाहीं. माझी इच्छा आहे व तुझ्या बहिणीची इच्छा असो किंवा नसो, मी तिच्याशीं लग्न करण्याचें ठरविलें आहे."

तूं अतिथीच्या मर्यादेचें उल्लंघन करीत आहेस. बळजबरीनें कांहीं करावयाचा तुझा विचार असेल तर प्रथम माझ्याशीं द्वंद्व युद्धास तुला तयार झालें पाहिजे. चल बाहेर, आपण आपापल्या बळबळाची परीक्षा पाहूं या." असें म्हणत सुमित्र आपली तलवार उपसून झोंपडीच्या बाहेर गेला.

अनामकाचा पारा चढला. हा काल्चा पोर माझ्यासारख्या कसलेल्या योद्ध्याची बरोबरी करणार आहे का? पाहातों. असा विचार करून त्यानें देखील आपली तलवार उपसून सिंहासारखी सुमित्रावर झडप घातली. परंतु त्याचीच तलवार दूर जाऊन पडली ... जमिनीवर आदळला.





अनामकाला आश्चर्य वाटलें. तो तरुण इतका शूर व पराक्रमी असेल याची त्याला कल्पना देखील नव्हती. त्याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे सुमित्रानें आपली तलवार फेंकून दिली व अनामकाला मांजराच्या पिल्लासारखा मानगुटी धरून उचलला व आकाशांत फेंकून पुन्हां वरच्यावर धरून अलगत खालीं जमिनीवर ठेवला.

आतां मात्र अनामकाची पांचावर धारण बसली. आपण पहातों आहों हें सर्व स्वप्न तर नाहीं. अशी एक शंका त्याच्या मनांत येऊन गेली. हा मनुष्य आहे कीं राक्षस!

पण सुमित्र शांतपणें त्याला म्हणाला— "अतिथीचा वध करणें हें पाप आहे. तसें तुझ्याशीं माझें वैर तरी कोठें आहे? तूं आंत ये आणि जेवून आपल्या घरीं जा."

अनामक पाळलेल्या जनावरासारखा सुमित्राच्या आज्ञेनें झोंपडींत गेला. त्याचा गर्व परिहार झाला होता. माधवीनें पानें मांडलीं व सुमित्र अनामकाबरोबर जेवायला बसला. अनामक खालीं मान घालून निमूटपणें जेवत होता. वर मान करून सुमित्राकडे किंवा माधवीकडे पाहण्याची त्याची हिंमतच झाली नाहीं. तो जणुंकांहीं पानावर जें वाढलें होतें त्यांत कांहीं वाचीत होता.

जेवण झाल्यावर माधवीनें पानाचा डबा आणून ठेवला. नंतर अनामकाला एक धोतरजोडा देत व बरोबर खाण्यासाठीं एक डबा देत ती म्हणाली—"दादा! हें घेऊन जा बरोबर!"

अनामकाची वाचाच बंद झाली होती. हे किती थोर लोक आहेत आणि यांच्यासमोर आपण किती तुच्छ! जमिनीवर चालणाऱ्या किड्याहूनहि क्षुद्र. आपण आजपर्यंत रानटी लोकांसारखें राहून सारें आयुष्य

फुकट घालविलें. कांहीं शिकलों नाहीं. आपल्यांत व जनावरांत काय फरक ? इनकें श्रीमंत, पण किती विनम्र ! यांच्यासारखी सभ्यता व संस्कृति आपल्या नशिबीं कधीं येईल का ? त्यांचें आतिथ्य संपल्यावर अनामक एक क्षणभर देखील तेथें थांबूं शकला नाहीं.

त्यानंतर अनामकाच्या आयुष्यांत पुष्कळ बदल झाला. तो आपल्या जातीच्या इतर लोकांबरोबर राहूं लागला. एकटेपणा त्याला असह्य वाटूं लागला. विद्याभ्यास करून तो स्वतः सभ्य झाला व त्याच्या जातीचा राजा झाला. त्यानें आपल्या जातीचा देखील उद्धार केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें– "राजा, अनामक याच्या स्वभावांत बदल झाला तो सुमित्रानें आपलें शौर्य दाखवून पराभव केला म्हणून कीं दोघां बहीण-भावंडांचा त्याच्याशीं जो सद्व्यवहार होता त्यामुळें ? याचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील, हें विसरूं नकोस."

"कोणी शक्ति दाखवून पराभव केला तर पराभव झालेला मनुष्य स्वस्थ बसत नाहीं. आपली शक्ति वाढवून आपल्या शत्रूचा पराभव करण्याचा यत्न करतो. परंतु सुमित्र व त्याची बहीण माधवी यांच्या सद्व्यवहारामुळें अनामकाचा जो नैतिक पराभव झाला त्यामुळें त्याच्या मनांत इतका बदल झाला."

अशा प्रकारें विक्रमार्कांचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# लबाड नोकर

एका गांवीं एक श्रीमंत वाणी रहात असे. त्याची बायको वारल्यानंतर त्यानें एक नोकर सैंपाक करायला म्हणून ठेवला. तो घरांतली झाडलोट करी व मालकासाठीं सैंपाक देखील करी. तो सैंपाक उत्तम करीत असे. म्हणून मालकाला कधीं जेवणाची काळजी वाटत नसे.

आंब्यांचा मोसम होता. त्याच्या मित्रानें त्याला आढींतून दहा पिकलेले आंबे काढून दिले आणि म्हणाला–" हे आमच्या बागेंतले आपूस आंबे आहेत. खाऊन तर पहा. मुंबईच्या बाजारांत हा आंबा नऊ रुपये डझन जातो." वाण्यानें फक्त दोनच आंबे घेतले आणि घरीं आला.

आंब्यांचा रंग पाहूनच त्याच्या तोंडाला पाणी सुटलें होतें. मग वास पाहल्यावर तर त्याला धीरच उरला नाहीं. त्यानें नोकराला सांगितलें, छान धुवून कापून ठेव. मी आलोंच.

आंबे पाहून नोकराला राहवलें नाहीं. आंबे कापल्यावर त्याला मोह आवरेना. त्यानें एक फोड जिभेला लावून पाहिली आणि शेवटीं खाऊन टाकली. खाल्ल्याचें कळूं नये म्हणून लहान लहान पुष्कळ फोडी केल्या. मग त्यानें विचार केला, यांतल्या चार फोडी खाल्ल्या तरी कोणाला कळणार नाहीं. त्यानें आणखी दोन तीन फोडी खाल्ल्या. एकदां चंव कळल्यावर राहवेना व एकेक फोड तो खाऊं लागला. अर्धा अधिक आंबा खाऊन टाकल्यावर त्याला भान आलें, आतां मालकानें विचारलें तर काय उत्तर द्यायचें ? मी आंबा खाल्ला असें मालकाला कळलें तर मालक रागावणार. तेव्हां खोटें

श्री. मा. वा. वणी

बोलून वेळ मारून नेण्याव्यतिरिक्त दुसरा उपाय नाहीं. असा विचार करून त्यानें उरलेला आंबा देखील खाऊन टाकला. त्यानें कोयी व सालें कोणाच्या नजरेस पडणार नाहींत अशा तऱ्हेनें दूर फेंकून दिली आणि मालकाची वाट पहात बसला.

वाण्याला तेवढ्यांत कांहीं घाईचें काम निघालें म्हणून बाजारांत गेला. घरीं परत येत असतां वाटेंत त्याला एक साधु भेटला. त्यानें साधूला घरीं जेवायला बोलाविलें. तो साधु काशी प्रयागची यात्रा करून रामेश्वराकडे निघाला होता. त्याला जेवण वाढलें तर पुण्यलाभ होईल म्हणून त्यानें बोलावलें होतें. साधूला बाहेर वऱ्हांड्यांत बसायला सांगून स्वतः आंत गेला व सैंपाक्याला म्हणाला— "एका साधूला जेवायला बोलावलें आहे. आंब्याच्या चार चार फोडी पानांतच वाढ. आंबा कापून ठेवला आहेस ना?"

"आंबा कापायला सुरी चाकू कांहीं नाहीं आपल्याकडे. एक सुरी आहे पण ती बोथट आहे." असें सांगून त्या नोकरानें एक सुरी आणून मालकाला दाखविली.

मालक ती सुरी घेऊन मागच्या दारीं बसून दगडावर घासूं लागला. घरीं आलेल्या साधूला आंबा खायला दिल्याशिवाय परत पाठवणें त्याला आवडलें नाहीं.

मालक मागच्या दारीं निघून गेल्यावर नोकर बाहेर आला व साधूला विचारूं लागला—"तुम्ही ह्या घरीं कशाला आलांत? तुम्हांला माहीत नाहीं का? ह्या घरीं आलेला पाहुणा पुन्हां जिवंत परत जात नाहीं."

"म्हणजे! मला यानें जेवायला बोलावलें म्हणून मी आलों!" साधू म्हणाला.

"बुवा! आतां मी काय सांगूं? अहो, आमचे मालक शक्तिपूजक आहेत. महिन्यांतून एक तरी बळी देतात. ते पहिल्यानें कान कापून घेतात व शेवटीं मान कापतात. मी खरें तें सांगितलें. आतां तुमचें तुम्ही पहा. पहा, ते सुरी घेऊन मागें धार करायला घेऊन गेले आहेत." नोकरानें एक लोणकढी थाप दिली.

तें ऐकून साधू घाबरूनच गेला. आपण एक क्षणभर देखील येथें थांबलों तर आपल्या प्राणावरच बेतणार असा विचार करून साधूनें तेथून पाय काढला.

थोड्या वेळानें वाणी सुरी घेऊन घरांत आला. म्हणाला—"ही घे सुरी. छान धार करून आणली आहे. लवकर आंबे कापून





पानें वाद. बिचारा साधू पहा थुकेला, किती वेळ झाला बसून राहिला आहे."

"आहेत कोठें आंबे ? तो साधू तरी कोठें आहे ? तुम्हांला पहायला म्हणून मी आंत आलों होतों. तेवढ्यांत स्वारी घरांत शिरली व आंबे उचलून पसार झाली. मी धांवत आलों. पण काय उपयोग !" नोकर म्हणाला.

"दोन्ही आंबे घेऊन गेला! मोठा बस्ताद दिसतो आहे! साव समजून बोलावून घेऊन आलों आणि शेवटीं चोरच निघाला. पण तूं नुसता पहात काय बसलास ?" वाण्यानें विचारलें.

"मी खरेंच धांवलों मागें. पण स्वारीनें मागें वळून पाहिलें नाहीं." नोकर म्हणाला.

वाण्यानें वाद घालण्यांत जास्त वेळ घालवला नाहीं. साधूच्या मागें जोरानें धांवला. हातांत पाजळलेली सुरी तशीच होती. दूर साधू दिसल्याबरोबर तो मोठ्यानें ओरडून म्हणाला—"बुवा ! अहो बुवा ! थांबा जरा !"

साधूनें मागें वळून पाहिलें. वाण्याच्या हातांत सुरी पाहून तो जास्तच घाबरला व जोरानें पळूं लागला.

"बुवा ! मला दोन्ही नकोत. एकच पुरे !" वाणी म्हणाला.

तें ऐकून साधू जास्तच घाबरला. आपला एक कान कापून घेण्यासाठीं येत आहे. वाण्याच्या नोकरानें सांगितलें तें सर्व त्याला आतां खरेंच वाटलें. तो आणखी जोरानें पळूं लागला. वाणी निराश होऊन परतला. त्याला पकडणें आतां शक्य नाहीं ह्याची खात्री झाल्यावर तो करणार तरी काय ?

लबाड नोकर मात्र आंबे पचल्याबद्दल पोटावर हात फिरवीत सैंपाकघरांत निघून गेला.





# सत्यवादी

असत्यवादीची गोष्ट ऐकल्यावर अर्थातच मुलांनीं प्रश्न केला—"म्हणजे खरें बोलणें हें सोपें आहे व खोटें बोलणें हें कठीण आहे ! मग खोटें बोलणारालाच बक्षिसें मिळालीं पाहिजेत ! पण आमचे मास्तर खोटें बोलणारालाच कां मार देतात ? आई व बाबा सुद्धां खोटें बोललें तर रागावतात !"

आजोबा थोडें स्मित करून चिमूटभर तपकीर नाकांत कोंबीत म्हणाले—"कोण म्हणालें, खोटें बोलणें कठीण आहे ? मी जर म्हणालों कीं मी असत्यवादीची गोष्ट तुम्हांला सांगितलीच नाहीं तर त्यांत कठीण असें काय आहे, तुम्हीच सांगा ! सत्यवादी देखील खोटें बोलला होता कीं नाहीं ? खोटें बोलणें त्याला कठीण वाटलें का ?"

"कळलें, कळलें ! खोटें बोलून तें खरें वाटलें पाहिजे. होय कीं नाहीं, आजोबा !" मुलें म्हणालीं.

"बरोबर ! आतां कळलें तुम्हांला कीं खोट्याला खरें करून दाखवणें हें कठीण आहे ! पण असलें खोटें बोलून कोणाचें हित होणार आहे का ? थोडी करमणूक मात्र होते. तुम्ही म्हणालांत खरें बोलणें सोपें आहे. पण एखाद्या प्रश्नाच्या बुडाशीं खरें काय आहे याची माहिती काढणें किती कठीण आहे हें माहीत आहे का तुम्हांला ? खरें कीं खोटें त्या परमेश्वरालाच माहीत असें आपण जें म्हणतों त्याचें कारण पण हेंच. असत्यवादी लोकांपेक्षां सत्यवादी लोकांमुळेंच जगाचें हित होतें."

सौ. रमाबाई सोनण




"तरमग राजा खरें बोलणाराला मोठा पगार देऊन कां नाहीं आपल्या दरबारांत नेमीत?" मुलांनीं पृच्छा केली.

"नेमतात! सत्यवादी त्या राजाच्या पदरची नोकरी सोडून दुसऱ्या राजाकडे गेला." आजोबा म्हणाले.

"सत्यवादीनें तेथें काय केलें?" मुलांनीं विचारलें.

"तेंच तर मी आज सांगणार आहें!" असें सांगून आजोबांनीं गोष्टीला आरंभ केला.

राजाच्या दरबारीं एक न्यायाधीश होता. पण तो थोडा चक्रम होता. कोणी फिर्याद घेऊन आला कीं तो म्हणे, याला साक्षीदार कोण? साक्षीदार जास्त असतील त्यांच्या बाजूनें तो निवाडा देत असे. थोडक्यांत तो साक्षीवादी होता.

नव्या राजाच्या दरबारीं नोकरी लागल्यानंतर सत्यवादीला हें कळलें. त्यानें गुप्तपणें चवकशी करण्याचें काम आरंभ केलें. राजाला राग येईल हें देखील त्याला माहीत होतें. पण तो कर्तव्याला जागला व गरीब प्रजेच्या हितासाठीं ती जोखीम अंगावर घ्यायला तयार झाला.

एकदां एका माणसाची गाय चोरीला गेली. त्यानें राजदरबारीं फिर्याद केली. त्याचें गाऱ्हाणें या न्यायाधिशाकडे चवकशीसाठीं आलें. चोरी करणाऱ्यानें साक्षीदार आणले. त्यांनीं सर्वांनीं सांगितलें कीं त्यानें चोरी केलेली नाहीं. ज्याची गाय चोरीला गेली होती त्याच्याकडे कोणी साक्षीदार नव्हते. तेव्हां न्यायाधिशानें त्याच्या विरुद्ध निर्णय दिला.

तें सर्व पाहून सत्यवादी राजाकडे गेला व त्याला म्हणाला—"हा न्याय नाहीं, अन्याय आहे. आणि मला असें सांगावयाचें आहे कीं ह्या न्यायाधिशाचा न्याय म्हणजे एक नाटक आहे. त्यामुळें आपल्या कीर्तीला कलंक मात्र लागत आहे."



तें ऐकून राजाला आश्चर्य वाटलें व तो म्हणतो तें खोटें आहे असेंहि वाटलें. तरी तो म्हणाला—"तुला हें सर्व साबीत करून दाखवावें लागेल हें विसरूं नकोस." असें सांगून राजानें त्याला निरोप दिला.

पुढें कांहीं दिवसांनी एक गोष्ट घडली. राजा रोज संध्याकाळीं आपल्या नातवंडांबरोबर उद्यानांत फिरावयास जात असे. तेथें काळोख पडेपर्यंत तो हिंडे फिरे व काळोख पडल्यावर राजवाड्यांत परत येई.

एकदां राजा नेहमींप्रमाणें नातवंडांबरोबर बागेंत फिरायला गेला. कांहीं नातवंडें आधींच बागेंत पोंचली होतीं. मुलें बराच वेळ खेळत होतीं. राजा संगमरमरी बांकावर बसून गंमत पहात होता. तेवढ्यांत माळी कांहीं पेरू खुडून पुसून घेऊन आला. त्यानें ते राजासमोर ठेवले आणि निघून गेला. नातवंडें धांवत आलीं आणि राजाच्या चारीबाजूला घोळका करून उभी राहलीं. राजानें पेरू कापून त्यांना खायला दिले. संध्याकाळ होईपर्यंत राजा बागेंत बसला होता. नंतर मुलांना खेळायला सांगून राजा पुढं राजवाड्यांत परतला.




राजा घरीं परत आल्यानंतर अर्ध्या तासानें मुलें पण घरीं परत आलीं. एक नातू रडत होता. त्याचें बोट कांपलें होतें व रक्त येत होतें. चवकशी करतां कळलें कीं संगमरमरी दगडावर कांहीं तरी हाताला लागलें व बोट कांपलें गेलें.

राजानें जखम धुवून मलम लावलें व पट्टी बांधून ठेवायला सांगितलें. दुसऱ्यादिवशीं त्यानें न्यायाधिशाला बोलावून चवकशी करायला सांगितलें. न्यायाधिशानें चवकशी शिवायच माळ्याचा अपराध आहे असा निर्णय दिला. बागेंत स्वच्छता ठेवणें हें



माळ्याचें काम आहे. त्यानें निष्काळजीपणा दाखविला म्हणून बोट कापलें गेलें. महाराजांची बसण्याची जागा व मुलांची खेळण्याची जागा त्यानें स्वच्छ ठेवली नाहीं म्हणून मुलाच्या बोटाला कांहीं तरी बोचलें किंवा लागलें म्हणून बोट कापलें गेलें. निराळ्या पुराव्याची गरजच नाहीं.

तें ऐकून सत्यवादीला आश्चर्य वाटलें. तो दरबारांत उभा राहून म्हणाला—"महाराज! याला न्याय-विचार म्हणतां येणार नाहीं. अपराध्याला बोलावून त्याचा काय अपराध आहे हें सांगितल्याशिवाय व त्याचें काय म्हणणें आहे हें ऐकून घेतल्या शिवाय न्याय कसा होऊं शकेल?"

राजानें सत्यवादीला न्यायाधिशाच्या अन्यायीपणाची चवकशी करण्याचा अधिकार दिला. राजानें माळ्याला बोलावून आणण्यास सांगितलें. सत्यवादीनें माळ्याला विचारलें तेव्हां तो म्हणाला—"मी दिवसांतून तीनदां बागेची सफाई करतों. प्रत्येक बांक खुर्ची पुसतों. काल संध्याकाळीं महाराज येण्यापूर्वीच मी तें बांक छान पुसून ठेवलें होतें.

सत्यवादीनें एका नोकराला त्या बांकावर कांहीं असेल तर तें घेऊन यायला सांगितलें.

नोकर धांवत गेला व एक चाकू घेऊन परत आला. तो राजाचाच चाकू होता. त्याच चाकूनें राजानें आंबा कापला होता व चाकू तसाच टाकून आला होता. काळोखांत मुलाचा हात लागला व बोट कापलें.

हें सर्व कळल्यावर सत्यवादीनें राजाला विचारलें—"महाराज, हा चाकू तेथें कोणी टाकला?"

राजा—"मी!"

सत्यवादी—हा निष्काळजीपणा कोणाचा? आपला कीं माळ्याचा?

राजा—माझा!



सत्यवादी—मग या अपराधाबद्दल माळ्याला शिक्षा करणें न्याय्य होईल कीं नाहीं याचा आपणच विचार करावा. न्याय हा आंधळा असतो. त्याला राजा रंक, लहान थोर हा फरक कळत नाहीं. जो समोर पुरावा असेल त्याच्या आधारें जो अपराधी असेल त्याला तो शिक्षा देतो. सत्य सदा अप्रिय असतें. माझ्या मतें ह्या बाबतींत आपला अपराध आहे, माळ्याचा नाहीं.

राजा गुणी होता. त्याला राग येण्याऐवजी आनंदच झाला. त्यानें सत्यवादीला पगारवाढ दिली व त्याचा हुद्दा वाढवला.

पुढें कांहीं दिवसांनीं राजा बागेंत गेला. नेहमीप्रमाणें तो मुलांबरोबर कांहीं वेळ खेळत बसला व संध्याकाळीं राजावाड्याकडे परतला. बागेच्या फाटकाजवळ पोंचतांच पाहरेकऱ्यानें आपली तलवार राजाच्या डोक्यावर फेंकली व त्यामुळें राजाचा मुकुट खालीं पडला.

राजाला मनस्वी राग आला पाहरेकऱ्यांनीं तलवार फेंकणाऱ्या पाहरेकऱ्याच्या मुसक्या बांधल्या व त्याला राजासमोर उभें केलें.

"या दुष्टाला कैदेंत टाका. याला राजद्रोहाबद्दल शिक्षा झालीच पाहिजे." असें सांगून राजा राजवाड्यांत निघून गेला. सर्व दरबारी राजवाड्यांत धांवत आले व दैव कृपेनें राजाचा बचाव झाला याबद्दल त्यांनीं राजाचें अभिनंदन केलें. राजानें न्यायाधिशाला व सत्यवादीला बोलावून घडलेली गोष्ट सांगून चवकशी करण्यास सांगितलें.

न्यायाधिशानें राजद्रोहाला प्राणदंडाची शिक्षा असते असें सांगून शिरच्छेदाची शिक्षा सांगितली.

पण सत्यवादी म्हणाला—"अपराध साबीत केल्या खेरीज शिक्षा सांगणें न्यायविरुद्ध आहे. त्याला राजाचा वधच करावयाचा होता तर इतक्या पाहरेकऱ्यांसमक्ष तो वध करायला कां

गेला असता ? राजा झोंपला असतां किंवा बेसावध असतां वध करतां आला असता.

तो कांहीं लोकांना बरोबर घेऊन तुरुंगांत त्या पाहरेकऱ्याला जेथें कोंडून ठेवलें होतें तेथें गेला व त्यानें त्या पाहरेकऱ्याला तलवार फेंकण्याचें कारण विचारलें.

बिचारा रडूं लागला व म्हणाला—" आपल्या मायबाप महाराजांना ठार करण्याचा विचार तरी कोणाच्या मनांत येईल का ? त्यांच्या मुकुटांत मला एक सांप दिसला. त्याला मारण्यासाठीं मी तलवार फेंकली."

सत्यवादी तेथून बागेंत गेला. त्यानें ती जागा पाहिली. तेथें खरोखरच एक लहान सांप त्याला दिसला. पण तो खरा सांप नव्हता खेळांतला कापडी किंवा कागदी सांप होता. राजाच्या नातवंडांनीं गमती जमतींत आजोबांना कळल्याशिवायच त्यांच्या मुकुटांत ठेवला होता. सत्यवादीनें ही गोष्ट राजाच्या नातवंडांना विचारून त्यांच्याकडून काढून घेतली होती. यावरून पाहरेकरी राजद्रोही नसून राजभक्त होता हें सिद्ध झालें.

सत्यवादीनें ही चवकशी करून राजाला तो सर्व वृत्तांत निवेदन केला. तेव्हां राजाला समजलें कीं न्यायाधीश न्यायाच्या नांवाखालीं अन्याय करीत आहे. कित्येक निरपराध लोकांना त्यानें शिक्षा केली होती व कित्येक अपराधी लबाडी करून सुटले होते. म्हणून त्यानें त्या न्यायाधिशाला कामावरून कमी केलें व त्याच्या जागीं सत्यवादीला नेमलें.

" यावरून काय कळतें सांगा पाहूं ?" आजोबांनीं नातवंडांना प्रश्न टाकला. तेव्हां मुलें म्हणालीं—" यावरून खोटें खऱ्यासारखें सांगणारापेक्षां खरें बोलणारा व खऱ्याचा शोध काढणाराच थोर होय !"





# बिरबलाचें चातुर्य

[ २ ]

बिरबलाच्या चातुर्याच्या गोष्टी परदेशांतील दरबारांत देखील पोंचूं लागल्या. पर्शियाच्या बादशहाच्या कानांवर त्याची कीर्ति पोंचली तेव्हां त्यानें अकबर बादशहाला पत्र लिहून बिरबलाला आपल्या दरबारीं कांहीं दिवस पाठवून द्यावें, अशी विनंति केली. अकबर बादशहानें त्या विनंतीस मान देऊन बिरबलाला पर्शियाच्या राजाकडे पाठविलें.

बिरबल येत असल्याचें ऐकून पर्शियाच्या राजानें त्याच्या चातुर्याची परीक्षा घेण्यासाठीं एक उपाय योजला. बादशहानें सर्व दरबारी लोकांना बादशहासारखाच पोशाख करून दरबारांत यावयास सांगितलें. सर्व आपापल्या जागीं बसले. स्वतः बादशहा देखील दरबारी लोकांबरोबरच जाऊन बसला.

ठरल्या वेळीं बिरबल दरबारांत आला. त्यानें दरबारांत जाऊन टाकल्याबरोबर ओळखलें कीं आपली परीक्षा घेण्यासाठींच सर्व बादशहासारखा पोशाख करून आले आहेत. पण बादशहा जेथें बसले होते तिकडे सरळ तो गेला आणि त्याला लवून मुजरा केला. बादशहाला आश्चर्य वाटलें त्यानें बिरबलाचें अभिनंदन करून, बादशहा कोण आहे हें तूं कसें ओळखलेंस हें विचारलें. तेव्हां बिरबल सहज स्मित करून म्हणाला—" सर्वांची नजर आपल्यावर खिळून होती. आपली नजर मात्र सर्वांवर होती. त्यावरून दरबारांत मुख्य व्यक्ति कोण हें ओळखणें मला कठीण नव्हतें." पर्शियाच्या बादशहानें खूष होऊन बिरबलाला 'बुद्धिसागर' ही पदवी दिली.

श्री बा. ना. पवार



एकदां अकबर बादशहानें विचारलें—"जगांत आंधळ्यांची संख्या जास्त आहे कीं डोळसांची ?"

"उद्यां सांगतों." बिरबल म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं बिरबल, बादशहा नदीकाठीं रोज फिरायला जात असे त्या बाजूला एक खाट विणायला बसला. बादशहानें तेथें आल्यावर त्याला विचारलें—"बिरबल हें काय रे करतो आहेस ?" बिरबलानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. कागदावर बादशहाचें नांव मात्र टिपून ठेवलें.

कित्येक लहानथोर लोक त्या जागीं आले गेले. प्रत्येकानें त्याला तोच प्रश्न केला. बिरबलानें त्यांचीं नांवें त्या कागदावर टिपून ठेवलीं ? फक्त एका दोघांनीं बिरबलाला विचारलें—"बिरबल ही खाट कोणाकरितां विणतो आहेस ?" बिरबलानें त्यांचीं नांवें दुसऱ्या कागदावर टिपून ठेवलीं.

खाट विणून झाल्यावर बिरबलानें ज्या कागदावर जास्त नांवें होतीं त्यावर आंधळे हें शीर्षक लिहिलें व ज्या कागदावर फक्त दोन नांवें होतीं त्यावर डोळस हें शीर्षक लिहून बादशहाला दोन्ही याद्या दाखवल्या. आंधळ्यांच्या यादींत बादशहाचें नांव सर्वांत प्रथम होतें. तें पाहून बादशहाला अर्थातच राग आला. तो म्हणाला—"तूं मला आंधळ्यांत काढलेंस ?"

"मी खाट विणीत होतों, हें पाहून सुद्धां आपण विचारलेंत—बिरबल, हें रे काय करतोस ? आपल्या मागून इतरांनीं तोच प्रश्न केला. आतां मी डोळसांच्या यादींत आपलें नांव कसें लिहूं ?" बिरबलानें उत्तरादाखल बादशहालाच विचारलें.

एकदां बिरबल कोठें तरी मेजवानीला गेला होता. बादशहानें मेजवानीचें वर्णन करायला सांगितल्यावर बिरबलानें तिखट मीठ लावून मेजवानीचें वर्णन केलें व पक्वान्नांचीं नांवें मोजीत गेला. प्रत्येक पक्वान्नाचें वर्णन संपल्यावर बादशहा त्याला विचारीत—"त्यानंतर ?" व बिरबल दुसऱ्या पक्वान्नाचें वर्णन सुरू करी. असें बराच वेळ चालू होतें. मध्येंच कांहीं तरी काम निघालें म्हणून बिरबलाचें वर्णन अर्धवट राहालें.

कांहीं दिवसांनीं अकबर व बिरबल यांची अचानक गांठ पडली. तेव्हां बादशहानें बिरबलाच्या हजरजबाबी स्वभावाची पारख घेण्यासाठीं विचारलें—"त्यानंतर बिरबल ?" बिरबल उत्तरला—"त्यानंतर मेथीची भाजी !" बादशहा इतका खूष झाला कीं त्यानें गळ्यांतला मोत्याचा हार काढून बिरबलाला दिला. सर्व दरबारी थक्क झाले. त्यांना वाटलें कीं बादशहाला मेथीची भाजी फार आवडत असावी. घरीं जाऊन मेथीची भाजी चांदीच्या भांड्यांत घेऊन बादशहाकडे आले. बादशहानें त्यांना विचारलें—"काय आहे ?"

दरबारी म्हणाले—"मेथीची भाजी !"

बादशहा चाणाक्ष होता. त्याला त्यांचा मूर्खपणा कळला व तो म्हणाला—"तुमच्या-





सारख्या मूर्खांना आपल्या दरबारांत ठेवण्यापेक्षां तुरुगांत किंवा वेड्यांच्या दवाखान्यांत कोंडून ठेवलें तर बरें होईल !"

सर्वांनीं चुकीबद्दल बादशहाजवळ माफी मागितली.

एकदां दिल्लीच्या एका मोठ्या व्यापाऱ्याच्या घरीं चोरी झाली. तो बिरबलाकडे गेला आणि म्हणाला—"माझ्या घरची मोहरांची एक थैली चोरीला गेली आहे. माझ्या घरीं सहा नोकर आहेत. त्यांच्यापैकींच एकानें कोणी केली असावी असा मला संशय आहे. म्हणून सल्ला घ्यायला आलों आहें."

बिरबल म्हणाला—"तुम्ही घरीं जाऊन आपल्या सहाहि नोकरांना माझ्याकडे पाठवून द्या. कोण चोर आहे हें मी शोधून काढतों."

नोकर येण्यापूर्वीच बिरबलनें सारख्या लांबीच्या सहा काठ्या तयार करून ठेवल्या. नोकर आल्यावर तो म्हणाला—"तुमच्या मालकाच्या घरीं चोरी झाली आहे असें ऐकतों व ही चोरी तुमच्यापैकीं एकानें केली आहे, हें देखील मला कळलें आहे."

बिरबलाचें बोलणें पुरें होण्यापूर्वींच हात जोडून प्रत्येक जण म्हणाला—"आम्हांला नाहीं माहीत केव्हां चोरी झाली.

"कोणी चोरी केली हें नाहीं मी विचारीत तुम्हांला. हिमालयांत राहणाऱ्या एका योग्यानें ह्या मंत्रवलेल्या काठ्या मला दिलेल्या आहेत. जो चोर असेल त्याची काठी एका रात्रींत एक बोट लांब होते. तुम्ही ही एकेक काठी घेऊन येथेंच माझ्या घरीं रात्रीं झोंपा. तुम्हांला मी निरनिराळ्या खोलींत ठेवतों." बिरबल म्हणाला.

त्या दिवशीं नोकरांना बिरबलाच्या घरीं झोंपावें लागलें. ज्यानें चोरी केली होती त्याला झोंप लागली नाहीं. त्याला वाटलें की आपली काठी रात्र भरांत एक बोट वाढणार. तेव्हां ही काठी एक बोट कापून टाकावी म्हणजे एक बोट वाढली तरी ती इतर काठ्यांच्या लांबीची होईल. त्यानें तसें केलें आणि निश्चित होऊन झोंपी गेला.

उजाडल्यावर बिरबलानें सर्वांना आपापली काठी घेऊन यायला सांगितलें. सर्व आल्यावर त्यानें विचारलें—"सर्वांना स्वस्थ झोंप लागली होती ना? हो, काल तुम्हांला मी या मंत्रवलेल्या काठ्यांची गोष्ट सांगतांना एक चूक केली होती. ज्यानें चोरी केली असेल त्याची काठी एक बोट लांब होते असें मी म्हणालों. खरें म्हणजे ती एक बोट आखूड होते. बरें, आणा आतां आपापल्या काठ्या. ज्याची काठी आखूड झाली असेल तो चोर आहे."

आतां सुटका नाहीं हें ओळखून ज्या नोकरानें चोरी केली होती त्यानें आपली चोरी कबूल केली आणि मालकाला मोहरांची थैली परत केली.

अकबरानें आपल्या राणीशीं बरेच दिवस, कां कोणास ठाऊक अबोला धरला होता. राणीला कारण कळलें नाहीं व ती फार काळजींत पडली, तिनें बिरबलाला बोलवून त्याचा सल्ला घेतला.





बिरबलाला अंतःपुरांत जायला मनाई नव्हती. तो आल्यावर राणी म्हणाली—" कां कोणास ठाऊक गेले कांहीं दिवस बादशहा माझ्याशीं बोलले नाहींत. ते माझ्यावर रागावले तर नाहींत असा एक संशय आहे. पण राग कां हें मात्र कळलें नाहीं."

" ते रागावले आहेत असा संशय आपल्या मनांत येण्याचें कारण काय ?" बिरबलानें विचारलें.

" ते कांहीं बोलतील किंवा कांहीं करतील तर मी स्वतःच राग येण्याचें कारण ओळखूं शकेन. पण हेंच पहा, गेले कांहीं दिवस माझी तब्येत बरी नाहीं. हें बादशाहांना चांगलें माहीत आहे. माझ्या सेवेला पुष्कळ दासी आहेत. हकीम येतो, औषध पाणी करतो. सर्व कांहीं ठीक आहे. परंतु पूर्वी माझें नुसतें डोकें दुखूं लागलें कीं दिवसांतून दोनदां तीनदां येऊन विचारपूस करून जात. मी औषध घ्यालें नाहीं तर स्वतःच्या हातानें औषध देऊन प्यायला आग्रह करीत. पण आतां विचारपूस करण्याची गोष्ट दूरच, असें म्हणाले कीं आजाराचे चोजलेच जास्त. दासदासींचा घोळका आणि औषध पाण्याच्या नांवाखालीं अवास्तव खर्च हवा कशाला ?"

तें सर्व ऐकून बिरबलाला आश्चर्य वाटलें. राणीला दिवस गेले होते. डोहाळे लागले म्हणजे कांहीं आवडी निवडींचा विचार करावाच लागतो. थोडा वेळ विचार करून बिरबल म्हणाला—" आपण निश्चिंत रहावें. मी सर्व माहिती मिळवून कांहींतरी तोड सुचवितों."

त्या दिवशीं संध्याकाळीं अकबर बादशहा बिरबलाबरोबर फिरावयास निघाला. बोलत असतां बिरबलानें सहज विचारलें—" बेगम साहेबांची तब्येत कशी काय आहे ?"

अकबर बिरबलाकडे वळून म्हणाला—" हें पहा बिरबल, मला असें वाटूं लागलें आहे कीं आपण आपल्या बायकांना उगीच डोक्यावर चढवून ठेवतों. बड्यांच्या घरचें दुखणें देखील बडेंच. आजाराच्या नांवावर हकीम वैद्य, औषध, पथ्यपाणी यासाठीं नुसते चोजले होतात. मी दहाबारा दिवसांपूर्वी रानांत शिकारीला गेलों होतों. तेथें वडाच्या झाडाखालीं मी एका भिल्लीणीला पाहिलें. ती नुकतीच बाळंत झाली होती. जवळपास कोणी नव्हतें. तिनें मुलाला धुऊन पुसून कमरेला बांधून घेतलें आणि डोक्यावर टोपलें घेऊन निघून गेली. तेव्हांपासून माझें असें मत झालें आहे कीं जास्त विचारपूस व काळजी करून आपण आपल्या बायकांना उगीच नाजूक करून ठेवलें आहे."

बिरबलानें त्यावेळीं बादशहाच्या 'हो' ला 'हो' दिला आणि दुसऱ्या दिवशीं अंतःपुरांत जाऊन राणीला जो सल्ला द्यावयाचा तो देऊन घरीं परत आला.

बिरबल निघून गेल्यावर राणीनें माळ्याला बोलाविलें आणि म्हणाली—" राजवाड्याच्या उद्यानांत जीं फुलझाडें आहेत त्यांना आज-पासून पाणी घालावयाचें बंद कर."

माळी म्हणाला—" राणी सरकार ! सर्व झाडें मरून जातील."



"मरूं देत ! बादशहा तुला रागावेल तर सांग कीं तूं माझ्या आज्ञेनें पाणी घालायचें बंद केलें आहेस. तुला याबद्दल शिक्षा किंवा दंड होऊं नये याची जबाबदारी मी घेतें. तूं अगदीं बेफिकीर रहा." बेगम म्हणाली.

एका आठवड्यानंतर अकबर खूप संतापून राणीकडे आला व म्हणाला—"तूं फुलझाडांना पाणी घालायचें बंद कां केलें आहेस हें नाहीं कळलें मला. तुझ्या आज्ञेनें त्यानें पाणी घालायचें बंद केलें आहे हें मला कळलें नसतें तर त्याचें डोकें आतांपर्यंत उडालेंच असतें. हा वेडेपणा तुला कोठला सुचला ? कीं डोहाळे लागले आहेत त्यांतला कांहीं हा प्रकार आहे ?"

"वेडबीड कांहीं नाहीं. कांहीं दिवसांपूर्वी मी रानांत फिरायला गेलें होतें. तेथें एक विचित्र गोष्ट माझ्या नजरेस आली. ऐन उन्हाळ्याचे दिवस होते आणि झाडें कशी हिरवीगार होतीं. कित्येक झाडें फुलांच्या व फळांच्या भारानें वांकून गेलीं होतीं. मी चवकशी केली कीं या झाडांना पाणी घालणारा माळी कोण ? पण मला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं माळी कोणीच नाहीं. तरी तीं झाडें इतकीं वाढलेलीं व हिरवीगार पाहून मला वाटलें कीं आपले माळी ह्या फुलझाडांचे इतके चोजले करतात म्हणून हीं अशीं खुरटलेलीं असावीं. म्हणून मी पाणीबिणी कांहीं घालावयाची जरूर नाहीं असें सांगितलें माळ्याला."

बादशहा सुज्ञ होता. त्यानें विचारलें—"असं ! बिरबल भेटला होता वाटतें ?"

राणीनें नुसतें स्मित केलें. त्या दिवसापासून बादशहा स्वतः पूर्वीप्रमाणें राणीची विचारपूस करूं लागला व त्यानें तिच्या औषध पाण्याची उत्तम व्यवस्था करून दिली.





# गुणी गणोबा

एका गांवीं गणू नांवाचा एक गरीब मुलगा रहात असे. लहानपणींच त्याचा बाप वारल्यामुळें त्याच्या आईनें सर्व हाल अपेष्टा सहन करून त्याला लहानाचें मोठें केलें. गणू स्वभावानें 'परोपकारी' निघाला. दुसऱ्याचें काम करण्यांत त्याला मजा वाटे. शेजारी पाजारी, ओळखीचे लोक, जो कोणी त्याला कामाला बोलवी त्यांच्या कामासाठीं गणू स्वखुशीनें जाई. दुसऱ्याचें काम करीत असतां त्याला स्वतःची किंवा आपल्या घरादाराची शुद्ध रहात नसे. तो पगार किंवा मजुरी देखील घेत नसे. गांवकरी त्याला परोपकारी गणोबा म्हणून हाक मारीत.

तो सर्व कामें करी. त्यामुळें त्याला सर्व कामें सहजीं करतां येऊं लागलीं. तो लोकांचीं कामें करी म्हणून लोक आनंदानें चार पैसे त्याच्या हातावर ठेवीत किंवा त्याला कांहीतरी खायला प्यायला देत. कोणी कांहीं दिलें नाहीं तर त्याला त्याचा राग लोभ नव्हता. कोणी दिलें तर तो आनंदानें घेई. हें सर्व पाहून त्याच्या आईला वाटलें गणू गुणी मुलगा निघणार.

परंतु गणोबांच्या परोपकारी स्वभावामुळें केव्हां केव्हां कामें होण्याऐवजीं बिघडून जात. तो पाणी आणायला नदीवर जाई. तेथें कोणी म्हातारा किंवा म्हातारी त्याला म्हणे—"अरे गणू जरा हें मडकें खांद्यावर दे रे !" कीं गणू म्हणें—"कशाला ? था, मीच घरीं पोंचवून येतों." असें सांगून तो स्वतःची घागर अगर मडकें तेथेंच नदी काठावर टाकून देई आणि लोकांची घागर किंवा मडकें त्यांच्या घरीं पोंचवून येई.

हें सर्व पाहून एकदां गणूची आई त्याला म्हणाली—" बाळा, तू नेहमीं दुसऱ्याचीं कामें करतोस. पण दुसरा कोणी कधीं तुझें काम करतो का ? तुझी सर्व मेहनत वाया जाते पहा ! तुला चार पैसे देखील कोणी उचलून देत नाहीं !"

" त्यांच्याजवळ द्यायलाच कांहीं नसलें तर त्यांला आतां आपण काय करायचें आई !" गणू म्हणे.

एकदां द्वादशी होती. त्याच्या आईनें मुद्दाम गणूला आवडते म्हणून खीर करण्याचा विचार केला. त्याला पैसे देऊन बाजारांत पाठवला. म्हणाली—" पाव शेर साखर व थोडी वेलची घेऊन ये."

गणू बाजारांत जायला म्हणून निघाला. पण वाटेंत लखुजी पाटील पडवींत बसले होते त्यांनीं बोलावलें आणि म्हणाले—" गणू ! एक काम कर, बाबा ! आमची मोलकरीण सखू अजून आली नाहीं. तिला जाऊन सांग, पाटलांनीं लवकर बोलाविलें आहे."

सखू रोज सकाळीं चार घरीं रतियाचें दूध द्यायला जात असे. त्या दिवशीं तिला थोडा उशीर झाला होता. गणूनें येऊन पाटलांचा निरोप सांगितला तेव्हां नुकतेंच दूध काढून आलें होतें. ती म्हणाली— " सख्ये बघ, आज किती उशीर झाला पाटलांच्या घरीं जायला. गाईनें लाथ मारली. पण मी सोडतें का ? पाय बांधून शेवटीं काढलेंच दूध. तूं एवढें रतियाचें दूध चार घरीं मी सांगतें तेथें घालून ये. मी जातें पाटलांकडे."

गणूनें विचार केला, सखूला मदत केल्यासारखें होईल व पाटलांचें काम पण पुरें केल्यासारखें होईल. म्हणून तो दूध घालायला निघून गेला. दूध घालून तो घरीं परत येत होता तेव्हां वाटेंत त्याला गोपाळभटजी भेटले. त्यांच्या डोक्यावर एक मोठें गाठोडें होतें. ते म्हणाले—" गणू, तूं कसा अगदीं देवासारखा आलास बघ. हें गाठोडें कांहीं मला उचलत नाहीं. एवढें घरीं पोंचतें करून दे बाबा !"

" द्या !" असें सांगून गणूनें तें गाठोडें उचलून घेतलें आणि भटजींच्या घरीं पोंचतें करून दुकानांत गेला.

तेथें दुकानांत कुलकर्ण्यांनीं पाव पोतें बाजरी विकत घेऊन ठेवली होती. कोणी गडी किंवा हमाल नव्हता तें पोतें न्यायला. त्यांनीं गणूला बोलावून म्हटलें—" गणू, मी किती वेळ झाला वाट पहात आहें. पण हमाल म्हणून नाहीं. एवढी बाजरी घरीं













पोंचती करतोस का ? घरीं सैंपाक तयार असेल. जेवून जा."

गणू कुळकर्ण्यांच्या घरीं त्यांची बाजरी पोंचती करून त्यांच्या घरींच पोटभर जेवला. भूक भागली होती. तो परोपकार करीत फार उशिरां घरीं पोंचला तेव्हां आईनें त्याला विचारलें—"अरे तूं सकाळीं गेलास दुकानांत, आणि इतक्या उशिरां परत येतो आहेस ? आहे कोठें साखर आणि वेलची ?"

"आतां जाऊन घेऊन येतों बघ !" गणू म्हणाला. "द्वादशी टळल्यावर आणून तरी काय उपयोग ?" आई त्याला रागावली.

त्या दिवसापासून गणूच्या आईला काळजी वाटूं लागली कीं या मुलाचें पुढें कसें व्हायचें ? तिनें दोघां तिघांचा सल्ला घेतला. तेव्हां ते म्हणाले—"त्याला एखाद्या चांगल्या गुरुकडे कां नाहीं पाठवीत ?"

हरभट दीक्षित म्हणून एक विद्वान गुरूकडे गणूच्या आईनें त्याला पाठविलें. आपल्याला बाहेर गांवीं गंमत पहायला मिळेल असा विचार करून गणू गुरुगृहीं जाण्यास तयार झाला.

गुरूला एकाच दिवसांत गणोबांच्या गुणांची पारख पटली. त्यानें वर्षभर गणूला खूप राबवलें. थोडेंसें लिहायला व वाचायला पण शिकवलें, नाहीं असें असें नाहीं. कांहीं कांहीं उत्तम सूक्तिवाक्यें पण त्याच्याकडून पाठ करून घेतलीं. उदाहरणार्थ—"परोपकारार्थमिदं शरीरम् !" म्हणजे हा देह परोपकार करण्यासाठीं आहे. त्याचप्रमाणें "सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः" सेवाधर्म हा योग्यांना देखील न कळणारा असा फार मोठा धर्म आहे !" वगैरे वगैरे.

गुरूचा आशीर्वाद घेऊन गणू घरीं परत निघाला.

[पुढें चालू]






# वर्षभरांत एक खोटें

एका धनी शेतकऱ्याला एका नोकराची गरज होती. त्याला असें कळलें कीं त्याच्याच गांवच्या एका गरीब शेतकऱ्याला एक होतकरू व मेहनती मुलगा आहे. त्यानें त्या शेतकऱ्याला बोलावलें.

"माझ्या मुलाला येत नाहीं असें एक काम नाहीं. घरांतलीं कामें द्या, तो करतो. गुरें चरायला घेऊन जायला सांगा, नाहींतर शेत नांगरायला सांगा, सर्व कामें करील. पण एक गोष्ट आहे. अगाऊच सांगून ठेवतों. वर्षभरांत तो फक्त एकदां सपशेल खोटें बोलतो." शेतकरी म्हणाला.

"वर्षभरांत फक्त एकदांच खोटें बोलतो! तरमग तो हरिश्चंद्राचा अवतार आहे! अरे ह्या कलियुगांत खरें बोलणारा आहे तरी कोण?" असें सांगून त्या धनी शेतकऱ्यानें गरीब शेतकऱ्याच्या मुलाला आपल्या घरीं नोकर म्हणून ठेवून घेतलें. मुलगा खरोखरच फार मेहनती होता. दोघां-तिघांचीं कामें तो एकटा करून दाखवी. तो कधीं खोटें बोलेल ही गोष्ट तो विसरून गेला. कारण त्याच्या तोंडून कधीं खोटा शब्द निघाला नाहीं.

गुढी पाडवा आला. शेतकऱ्याच्या शेतांत ह्या वर्षीं खूप बरकत झाली होती. धान्याचीं कोठारें भरून होतीं. तो घाईघाईनें खळ्यावर निघाला. बरोबर नोकर होताच. तेवढ्यांत त्याला घरीं हिशेबाची वही विसरून आल्याचें आठवलें. त्यानें वही घेऊन यायला नोकराला घरीं परत पाठवलें.

नोकर घराजवळ आला आणि जोर जोरानें रडूं लागला. लोक जमा झाले आणि विचारूं लागले—"अरे झालें काय सांगशील कीं नाहीं?" लोक जमा झालेले पाहून शेतकऱ्याची बायका मुलें घराबाहेर धांवत आलीं. त्यांनीं नोकराला रडत असलेला पाहून विचारलें—"अरे झालें काय?"

"माल...क! खळ्यांत आग! माल...क!" असें तुटक कांहींतरी बोलला आणि मोठ-मोठ्यानें रडूं लागला.

तें ऐकून मालकीण छाती बडवून रडूं लागली. आईबरोबर मुलें पण रडूं लागलीं. आग विझविण्यासाठीं लोक घागरी, मडकीं, काठ्या, शिड्या जें हाताला आलें घेऊन धांवले. गोंधळ उडून गेला.

सर्वांच्यापूर्वीं गणोबा शेतावर धांवून गेले. वाटेंत त्यानें केस पिंजारून घेतले. थोडी धूळ अंगावर व तोंडावर उडवून घेतली आणि शेतावर पोंचल्याबरोबर "मालक! मालकी....ण मुलें....!" असें मोठ्यानें रडत ओरडत कांहीं तरी सांगूं लागला.

तें ऐकून मालक खालींच बसला. विचारूं लागला—"झालें काय सांगशील कीं नाहीं?"

"भिंत पडली....! छपराखालीं....!" असें सांगून पुन्हां मोठ्यानें हंबरडा फोडून रडूं लागला. बिचारा शेतकरी घाबरून घराकडे धांवला. अर्ध्या वाटेंत त्याला बायको व मुलें आणि गांवकरी भेटले. म्हणाला—"परमेश्वरा! दया तुझी, वांचलों! बायका



पोरांवर दया दाखविलीस !" असें सांगत त्यानें देवाला नमस्कार केला.

"काय झालें तरी काय ? आग कशी काय लागली ?" शेतकऱ्याच्या बायकोनें विचारलें.

"आग ! कोठें लागली ? आपलें घर कसें काय एकाएकीं पडलें ? कोणाला दुखापत तर नाहीं झाली ?" शेतकऱ्यानें विचारलें.

"घर पडलें ? कोण म्हणतें ? खळ्यांत आग लागली म्हणून आम्ही सर्व धांवलों !" बायको म्हणाली.

"खळ्यांत आग लागली ? कोण म्हणतें ? घर पडलें म्हणून मी घरीं धांवत आलों." शेतकरी म्हणाला.

सर्व परस्परांचीं तोंडें पाहूं लागले. कोणालाच कांहीं उलगडा होईना. शेतकऱ्यानें गणोबांचा हात धरला आणि म्हणाला—"ह्याच गुलामानें सांगितलें कीं घर पडलें !"

"आणि ह्यानेंच तर सांगितलें कीं खळ्यांत आग लागली !" बायको म्हणाली.

शेतकऱ्यानें गणूचा हात धरून त्याला खूप बडवलें आणि म्हणाला—"हा सर्व तुझा उपद्व्याप !"

"माझ्यावर एवढी आग पाखडण्याचें कांहींच कारण नाहीं. माझ्या बाबांनीं तुम्हांला पहिल्यानें सांगितलें होतें कीं नाहीं, कीं मी वर्षांतून एकदां खोटें बोलतों म्हणून ? तुम्हाला अर्धें खोटें सांगितलें आणि अर्धें मालकिणीला."

"आला आहे अर्धें खोटें सांगणारा ! चालता हो ! पुन्हां माझ्या घरीं कधीं पाऊल टाकलेंस तर पहा, तंगडें मोडूनच ठेवीन." असें सांगून शेतकऱ्यानें त्याला धक्के मारून काढून लावलें. गणू हिरमुसल्यासारखें तोंड करून घरीं निघून गेला.





# अयोध्याकांड

निषादांचा राजा गुह, मी सर्व प्रकारें तुला सहाय्य करीन असें भरताला म्हणाला खरा, पण त्याच्या मनांत किंतु राहून गेला होता. त्यानें भरताला स्पष्टच विचारलें—"आपलें हें सैन्य पाहून मला व माझ्या प्रजेला शंका वाटूं लागली आहे. तुम्ही रामाला ठार करून आपलें राज्य निष्कंटक करण्यासाठीं तर जात नाहीं ना ?"

तें ऐकून भरताला वाईट वाटलें. पण त्यानें गुहराजाला दोष दिला नाहीं. तो म्हणाला "कैकेयीच्या मुलाविषयीं तुझ्या मनांत असा विचार यावा यांत तुझा कांहींच दोष नाहीं. मोठा भाऊ हा बापासारखा असतो. वडील वारल्यावर लहान भावंडांनीं त्याच्या आज्ञेप्रमाणेंच वागावयाचें असतें. म्हणून मी रामाला भेटून चुकीबद्दल माफी मागून त्याला परत अयोध्येला बोलावून घेऊन जाण्यासाठीं जात आहें."

गुह राजानें भरताचे पाय धरले व म्हणाला—"नीच कुळांत जन्मल्यामुळें माझ्या मनांत असले क्षुद्र विचार आले. क्षमा करा."

सूर्यास्त होऊन गेला व काळोख पडूं लागला. भरत व शत्रुघ्न दोघे रामाची आठवण काढून अश्रू ढाळूं लागले. गुहनें, रामानें संगमेश्वरीं एक रात्र कशी काढली याचें वर्णन करून सांगितलें. म्हणाला—"लक्ष्मणाला झोंप म्हणून मी कितीतरी सांगितलें. तूं सीता रामांची काळजी करूं नकोस त्यांच्या रक्षणाचा



सर्वांना माझें निमंत्रण आहे." भरद्वाज म्हणाले.

भारद्वाज मुनींच्या आज्ञेनें विश्वकर्मा आला व त्यानें एका क्षणांत सर्वांच्या राहण्यासाठीं घरें व राजवाडे बांधले व सर्व सुखसोयी करून दिल्या. अष्टसिद्धी व नवनिधींनीं येऊन पंचपक्वान्न युक्त भोजनाची व झोंपण्याची उत्तम व्यवस्था केली. देव, गंधर्व व अप्सरा यांनीं येऊन करमणुकीची व्यवस्था केली. एकूण भारद्वाज मुनींनीं सर्वांचे अपूर्व आतिथ्य केलें. सर्वांनीं स्वर्गांत गेल्याशिवायच स्वर्ग सुखाचा अनुभव घेतला. अयोध्या नगरी विसरले. रामाच्या दर्शनास रानांत जाण्यासाठीं निघालों आहों हें देखील विसरले. रामाला विसरले नाहींत ते फक्त भरत, शत्रुघ्न वसिष्ठादि मुनि वगैरे. असें तें आतिथ्य होतें.

ह्या आतिथ्यामुळें भारद्वाज मुनींच्या तपोबलाची कल्पना येते व त्यांनीं रचलेल्या मायानगरींत पामर नर कसा स्वतःला विसरून जातो व ज्ञानी व भक्त कसे स्वतःला सावरून राहतात हें कळून येतें. सैन्यांतील लोक मदिरापानांत मग्न झाले. परंतु भरतादि काहीं निग्रहक लोक समोर अप्सरांचें नृत्य चालू असून देखील चिखलांतल्या कमळासारखे भोगविलासापासून अलिप्त राहले. भरत हा खरा रामभक्त आहे हें भारद्वाज मुनींना यावरून कळलें.

दुसऱ्या दिवशीं, जणुंकाहीं रानांत झाडाखालींच रात्र काढली इतक्या अलिप्त भावनेनें, भरत भारद्वाज मुनींच्या आश्रमांतून निघाला. त्यानें मुनींना नमस्कार करून त्यांचा निरोप घेत असतां रामाचें निवासस्थान कोठें आहे असें विचारलें व तिकडे जाण्याचा मार्ग पण विचारला.

भारद्वाज मुनि म्हणाले–"अरे तूं मला राम कोठें राहतो हें विचारीत आहेस.



आतां मी याचें उत्तर काय देऊं? राम कोठें नाहीं हें आधीं मला सांग म्हणजे मी तुला रामाचा निवास कोठें आहे हें सांगेन. हें सर्व तुला माहीत आहेच. पण तूं विचारलेंसच म्हणून सांगणें भाग आहे. राम चित्रकूट पर्वतावर रहात आहे. तिकडे जायला दोन मार्ग आहेत, एक दक्षिणेकडून व दुसरा नैऋत्येकडून. सैन्याला सोयिस्कार असा जो मार्ग वाटेल त्या मार्गानें तूं जा."

तिघां मातांनीं भरद्वाज मुनींना नमस्कार केला. भरत समोरच उभा होता. कैकेयी नमस्कार करीत असतां भरतानें कठोर वचनांनीं तिची भर्त्सना केली. भरताला राग आला होता. पण भारद्वाज मुनि तें सर्व पाहून म्हणाले—"भरता! तुझी आई रामवनवासास कारण झाली हें खरें आहे. परंतु तुला मी एक गोष्ट सांगूं इच्छितों. राम वनवासाचा खरा लाभ ऋषी व मुनींना लाभला म्हणजे तुला कळेल कीं राम वनवासास गेला हें कांहीं वाईट झालें नाहीं.

पण भरताचें त्यामुळें समाधान झालें नाहीं. भारद्वाजमुनींना नमस्कार करून त्यानें त्यांचा निरोप घेतला आणि चित्रकूट पर्वताच्या दिशेनें चालूं लागला.

यमुना नदी पार करून सर्व मंदाकिनी नदीच्या काठीं येऊन पोंचले. नदीच्या दक्षिणेकडे चित्रकूट पर्वत होता. त्याच्याजवळ ते येऊन पोंचले. रामाचें निवासस्थान शोधून काढण्यासाठीं भरतानें कांहीं निवडक सैनिकांना पाठविलें. दूर एका जागीं त्यांना धूर दिसला. रामाचें निवासस्थान त्याच्या आसपासच कोठें असेल असें अनुमान करून त्यांनीं येऊन भरताला सांगितलें. भरतानें विचार केला कीं राम लक्ष्मण तेथें तरी असतील किंवा त्या जागीं राहणाऱ्या लोकांना राम कोठें राहतो हें माहीत असेल. म्हणून [illegible] घेऊन भरत त्या दिशेनें निघाला.

* * *



**रा**म चित्रकूट पर्वतावर रहायला येऊन दोन महिने लोटले होते. राम सीतेला बरोबर घेऊन मंदाकिनी नदीच्या काठीं फिरावयास जात असे. चित्रकूट पर्वताचें नैसर्गिक सौंदर्य पाहून सीतेच्या मनाला समाधान वाटे. राम सीतेला म्हणे—"तूं बरोबर आहेस व लक्ष्मण बरोबर आहे म्हणून आपल्याला चवदा वर्षे केव्हां निघून गेलीं हें कळणार देखील नाहीं."

त्या दिवशीं नित्यनियमाप्रमाणें सीता राम दोघं कांहीं वेळ फिरून मंदाकिनी नदीचें सौंदर्य पहात उभीं होतीं. तेव्हां त्यांना दूर हत्ती भिऊन धांवत असलेले दिसले. भरताचें अफाट चतुरंग सैन्य पाहून ते भिऊन पळत होते. रामानें लक्ष्मणाला हांक मारली व म्हणाला—"लक्ष्मणा! पहा तर हे हत्ती आणि वाघ सुद्धां कां पळत आहेत? कोणी शिकारीला तरी आला असेल किंवा या क्रूर जनावरांहूनहि जास्त क्रूर असें एखादें श्वापद आलें असेल!"

लक्ष्मण एका उंच झाडावर चढला व पाहिलें तेव्हां त्याला उत्तर दिशेला आकाशांत धुळीचे लोट दिसले व एक मोठें सैन्य पण येत असलेलें दिसलें. तो रामाला ओरडून म्हणाला—"दादा! एक मोठें सैन्य दिसतें आहे रे! वहिनींना गुहेंत सुरक्षित स्थानीं बसायला सांगून तूं धनुष्यबाण घेऊन ये!"

"पहा तर कोणाचें सैन्य आहे तें!" राम म्हणाला.

लक्ष्मणानें रथांवरच्या झेंड्यावरून अयोध्येचें सैन्य ओळखलें व म्हणाला—"तो कैकेयीचा पोर! त्याला सर्व राज्य मिळालें तरी संतुष्ट झालेला दिसत नाहीं. आपलें राज्य निष्कंटक करून टाकण्यासाठीं आपल्यावर








चालून आलेला दिसतो आहे. गर्वाचें घर खालीं. स्वारीला गर्व झालेला दिसतो आहे. याच्यामुळें तुला विनाकारण इतके कष्ट व हाल अपेष्टा सहन कराव्या लागल्या आहेत. इतके दिवस मी तूं कांहीं बोलशील म्हणून स्वस्थ बसलों. पण त्यानें तुझा अशा तऱ्हेनें उपमर्द करावा हें मला खपणार नाहीं. त्याची खोड मोडल्याशिवाय आज माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं. त्याच्याबरोबर कैकेयी आणि मंथरा दोघांना वाटेला लावूनच मी परत फिरेन."

रामाला उद्दंडपणाचें हें बोलणें थोडें देखील आवडलें नाहीं. म्हणाला—"लक्ष्मणा! काय झालें तरी काय तुला? अरे भरताविषयीं तूं असें बोलतोस? शोभतें का तुला? भरताचा स्वभाव तूं ओळखला नाहींस असेंच मला वाटतें. भरत माझ्याशीं युद्धाला येणार! अशक्य! तो मला भेटण्यासाठीं येत आहे. तो आजोळाहून परत अयोध्येला आला असेल. मी तेथें नाहीं व रानांत आहे हें ऐकून भेटण्यासाठीं व मला परत बोलावून घेऊन जाण्यासाठीं आला असेल. मला तरी असेंच वाटतें. तुला राज्य हवें असेल तर सांग. भरत आल्याबरोबर मी त्याला सांगतों. तो कधीं नकार देणार नाहीं."

तें ऐकून लक्ष्मणाला भावासमोर दुसऱ्या भावाविषयीं उर्मटपणानें बोलल्याबद्दल शरम वाटली. तो मान खालीं घालून उभा राहिला व म्हणाला—"होय दादा! तो आपल्याला भेटायला येत असावा. तूं म्हणतोस तें मला देखील खरें वाटतें."

रामानें लक्ष्मणाला झाडावरून उतरून खालीं यायला सांगितलें आणि स्वतः सीतेसह आपल्या पर्णकुटींत गेला.





# आयफेल टॉवर

सन १८८९ साली पॅरीस शहरीं एक अति भव्य असें प्रदर्शन झालें, त्या प्रसंगीं आयफेल नांवाच्या एका इंजिनिअरानें हा टॉवर (स्तंभ) बनविला. याची उंची ९८४ फूट आहे. यूरोप खंडांत याच्याहून उंच एकहि इमारत नाहीं. याच्या शिखरावरून साठ मैल दूर पर्यंतचा प्रदेश दिसतो.



मंडपद्वारीं चरण दुधानें
धुतले प्रेमें ओघाळून।
सर्वांनीं पाहिलें शिवाचें
मंगल रुद्ररूप जवळून ॥

शंकर जाउन उभे राहले
बोहोल्यावर हें पाहुन,
लवकर नवऱ्यामुलिस मेनका
स्मितवदनें आली घेऊन ॥

सप्तर्षींनीं मंगलाष्टकें
म्हणुन अक्षता टाकियल्या।
आशीर्वचनें सांगुन कांहीं
जुन्या कहाण्या सांगितल्या ॥

शिवपार्वतिनें प्रणाम केला
ब्रह्मा सरस्वति दंपतिला।
वडीलधाऱ्या देवांदींना
आणि वसिष्ठ अरुंधतिला ॥

सर्व सखींनीं खूप घेतली
हौस स्वतःची पुरवुनिया ॥
उमाशिवाला झोंपाळ्यावर
म्हटलीं गाणीं बसवुनिया ॥

मेनकेस अन् गिरिराजाला
भाग्य पाहुनी कन्येचें,
पाहुनि जोडी वाटे फिटलें
जणूं पारणें डोळ्यांचें ॥

समाधान वाटलें सुरांना
हेतु पूर्ण झाला म्हणुनी।
शापमुक्त पति झाला होता
हांसत होती रति म्हणुनी ॥

शेवट आनंदाचा झाला
कष्ट जाहले प्रथम जरी।
सर्व चांगलें होतें अंतीं
प्रथम वाटतें कठिन जरी ॥

★ [ संपूर्ण ] ★






[ ५ ]

[ मांत्रिकाचा शिष्य जयमल याच्या तोंडीं लखूला मांत्रिकाचें नांव ब्रह्मदंडी आहे हें व त्याच्याच आज्ञेनें एक शिंगी घोड्याचें रूप घेऊन तो आला होता हें कळलें. ब्रह्मदंडी मांत्रिकानें आपल्या मंत्रबळानें भूकंप करून दाखविला. नंतर त्यानें जयमलला आज्ञा केली कीं लखूला हस्तीसरोवरांत आंघोळ घालून घेऊन ये. पुढें वाचा. ]

ब्रह्मदंडी मांत्रिकाच्या आज्ञेप्रमाणें जयमल लखूला घेऊन हस्तीसरोवराकडे निघाला. लखूच्या मनांत विचार चालू होते. किती मोठा मंत्र असला म्हणून काय झालें, मंत्र-बळानें डोंगर हलवून सोडण्याची शक्ति त्या मंत्रांत असेलसें मला वाटत नाहीं.

या पर्वतांतच कांहीं विस्फोटक द्रव्यें नसतील कशावरून ? त्यांच्यामुळें स्फोट होत असावेत व हा मांत्रिक हें सर्व आपल्या मंत्रबळानें होत आहे अशी घमेंड करीत असावा. तोंपर्यंत दोघे त्या डोंगरांतल्या एका सपाट जागीं येऊन पोंचले. तेथें जवळच एक डोंगरी ओढा वहात होता व त्याचा खळखळ आवाज ऐकूं येत होता. दोघे तो ओढा ओलांडून जाण्यासाठीं पाण्यांत उतरल्या-बरोबर एक सिंह डरकाळ्या फोडीत आपल्या गुहेंतून बाहेर पळत आला व डोंगराच्या एका शिळेवर येऊन बसला.













"ह्या ओढ्याच्या डोहालाच हस्तीसरोवर हें नांव आहे. हा सिंह शेजारच्या एका गुहेंत राहतो. याचें विशेष तूं ओळखलें असशीलच ? पहा बिबळ्या वाघासारखे याच्या अंगावर ठिपके आहेत." जयमल सांगत होता. सिंह जोरजोरानें डरकाळ्या फोडीत होता व आतां त्यांच्यावर उडी मारण्याच्या बेतांत होता.

लखूनें पण सिंहाकडे पाहिलें व त्याला वाटलें कीं सिंह उडी मारणार. म्हणून त्यानें चटदिशीं एक बाण काढून त्या सिंहाला मारण्यासाठीं नेम धरला. पण त्याच वेळीं जयमल "ओंकारी !" "कोंकारी !" असें कांहींतरी ओरडला व लखूला अडवीत म्हणाला—"हें तूं काय करतो आहेस ? तूं या बाणानें का या सिंहाला मारणार आहेस ? पहा मी आपल्या मंत्रबळानें त्याचें तोंड बंद करून टाकतों. तूं देखील पाहिजे तर पहा बाण सोडून काय होतें तें."

लखूनें बाण सोडला. "सूं...." असा बाणाचा आवाज झाला आणि सिंहाच्या डोक्यांतून निघून बाण दूर सरोवरांत जाऊन पडला. सिंहाला जणूं कांहींच झालें नाहीं. जयमल म्हणाला—"पाहिलेंस, तुझा एक बाण फुकट मात्र गेला. हा ब्रह्मदंडीनें पाळलेला सिंह आहे. त्याचें म्हणणें आहे कीं त्यानें ह्या सिंहाची सृष्टि केली आहे. जगांत असा एक देखील सिंह नाहीं. पण मी त्याच्या बोलण्यावर कधीं विश्वास केला नाहीं. तो एक मांत्रिक आहे, फार तर महामांत्रिक आहे हें मी कबूल करतो. पण तो ब्रह्मदेव खास नाहीं. त्यानें बिबळ्या वाघाचें कातडें याच्या अंगावर चिकटवून ठेवलें असावें असा माझा समज आहे." जयमल म्हणाला.

"तें अशक्य आहे. एका जनावराचें कातडें दुसऱ्याच्या अंगावर चिकटवलें तरी तें त्याच्याशीं एकजीव कसें होणार ? तुझी ही चुकीची समजूत आहे." लखू म्हणाला.

"तर मग हा सिंह पिल्लू असतांनाच त्यानें त्याच्या अंगावर डाग देऊन हे कायमचे डाग केले असावेत !" जयमल म्हणाला.

"तें शक्य आहे. पण त्याची आपल्याला काय गरज ? ह्या सिंहामुळें माझ्या जिवाला तर कांहीं धोका नाहीं ! हें पहिल्यानें सांग." लखूनें आग्रह केला.

"तुझ्या जिवाला कांहीं धोका नाहीं. इतके दिवस मांत्रिकाबरोबर रहात आहें व त्याचा शिष्य म्हणून राहतों आहे तर या प्राण्यांना वश करून घेण्याइतकें मंत्रबळ नाहीं का माझ्या अंगांत ? त्या सिंहाला मी वश केला आहे म्हणून तो पहा ताटाखालच्या मांजरासारखा कसा स्वस्थ बसून राहिला आहे." जयमल आपल्या मंत्रबळाच्या फुशारक्या मारीत म्हणाला.

परंतु जयमलनें म्हटल्याप्रमाणें खरोखरच सिंहानें एकदां जोरानें आपली आयाळ हलविली. नंतर एक मोठी जांभई घेऊन शेपटी दाबून मागें वळला व पुन्हां गुहेंत जाऊन




बसला. लखू जयमलची ही मंत्रशक्ति पाहून चकित झाला. हा खरोखरच माझा मित्र आहे तर. या ब्रह्मदंडी मांत्रिकाच्या हातांतून खात्रीनें हा माझें रक्षण करूं शकेल.

जयमलनें त्या डोहांत अनेक वेळां बुड्या मारल्या. सुरकांड्या मारून मनमोकळेपणानें पोहला. पण लखू मात्र डोहाच्या काठावर उभा राहून गंमत पहात होता. लखू त्याला म्हणाला—"अरे, उभा राहून पाहतोस काय ? मार उडी ! आपण लवकर आंघोळ करून परत गेलें पाहिजे. तो ब्रह्मदंडी वाट पहात बसला असेल ना !"




लखूनें धनुष्यबाण काठावर ठेवले व डोहांत उडी मारली. त्यानें अंग चोळून छान आंघोळ केली. त्याला वाटत होतें कीं हीच आपली शेवटची आंघोळ. आज अक्ष-देडी खात्रीनें आपल्याला त्या काळभैरवा-समोर बळी देणार.

लखूनें मनांत उठलेली शंका जयमलला सांगून टाकण्याचें ठरविलें. पण जयमल पोहोत पोहोत फार दूर निघून गेला होता. लखू हळू हळू त्याच्याजवळ आला व त्याला विचारणार एवढ्यांत डोहापलीकडच्या रानांत तुफान यावें तशीं झाडें हालूं लागलीं व दगड सरकूं लागले. त्या पाठोपाठ हत्तींचें ओरडणें ऐकूं येऊं लागलें.

लखू तें ऐकून म्हणाला—"या बाजूला हत्ती येत आहेतसें वाटतें. त्यांचा कळप जर आला तर आपली धडगत नाहीं"

या डोहाचें नांवच हत्ती सरोवर आहे हें मी तुला पूर्वींच सांगितलें. मग यांत डुंबायला हत्ती येणार नाहींत तर कोण येणार?" जयमलनें हंसत विचारलें.

"होय का! तर मग चल, पळ काढूं या आपण, त्यांची नजर पडण्यापूर्वीं! पायां-खालीं तुडवून ते आपला चक्काचूर करतील." असें सांगून लखू जोरानें काठाकडे पोहोत निघाला.

जयमल घाबरलेल्या लखूकडे पाहून हंसूं लागला. त्याच वेळीं हत्तींचा एक कळप परस्परांच्या अंगाला अंगें घाशीत व सोंडेनें झाडांच्या फांद्या तोडीत व लहान लहान झाडें उपटीत डोहाकडे येऊं लागले. त्यांना पाहाल्याबरोबर जयमलनें बुडी मारली. नंतर वर येऊन त्यानें कांहीं तरी मंत्र म्हणून हातांतला चिखल हत्तींवर फेंकला. आणि आश्चर्य म्हणजे सर्व हत्ती दगडासारखे जागच्या जागीं उभे राहले.










"पाहिलेंस माझ्या मंत्राचें बळ ?" जयमलनें लखूस विचारलें. नंतर तो हळू हळू पोहोत पोहोत लखूजवळ आला. लखू आश्चर्यचकित होऊन त्याच्या मंत्रबळाचें कौतुक करीत पहात होता. जयमल देखील मोठा मांत्रिक आहे याची त्याला साक्ष पटली.

लखूच्या मनांतले विचार ओळखून जयमल म्हणाला–"भूतपिशाच व पशुपक्षी यांना मंत्रबळानें वश करून घेणें तसें कांहीं मोठें काम नव्हे. हीं कामें ब्रह्मदंडी सहज हसत खेळत करतो. पण ज्या दिवशीं भयंकर दरींत प्रवेश करून तेथील खजिना पदरांत पडेल तेव्हां कोण खरा मांत्रिक आहे हें कळेल."

"भयंकर दरी ! आणखी कोठें आहे का ? मी तर याच दरीला भयंकर दरी समजत होतों." लखू म्हणाला.

"भयंकर दरी कोठें आहे हें समजलें तर आणखी काय उरलें समजण्यासारखें ? तें कळावें म्हणून तर मी आजपर्यंत या ब्रह्मदंडी मांत्रिकाची सेवा करीत आहें." जयमल म्हणाला.

जयमल आणि ब्रह्मदंडी यांचें परस्परांशीं वैर असण्याचें कारण जयमलला आतां कोठें कळलें. कदाचित दोघेहि माझा या कामीं उपयोग करून घेण्याच्या प्रयत्नांत असतील.

जयमल उपरण्यानें आपलें अंग पुसून लखूला म्हणाला–"अरे ! चल लवकर उशीर झाला आपल्याला. लखू देखील अंग पुसून घाई घाईनें धनुष्यबाण घेऊन जयमलबरोबर निघाला. जयमल दोन पावलें पुढें टाकल्यावर मागें वळून म्हणाला–"अरे हो ! विसरलोंच की ! हा हत्तींचा कळप असाच दगडासारखा येथें राहला तर कांहीं दिवसांनीं मरून जाईल. यांचा जीव घेऊन आपल्याला तरी काय मिळणार !" असें सांगून त्यानें टाळी वाजवून कांहींतरी मंत्र म्हटला व हत्तीकडे वळून म्हणाला–"करा आंघोळ आतां !"

हत्ती जणुंकांहीं त्या आज्ञेचीच वाट पहात होते. भरभर पाण्यांत शिरून डुंबूं लागले.

जयमलनें एक खडा त्या सिंहाकडे फेंकला व म्हणाला–"चालूं दे आपली गर्जना !" लगेच सिंह धांवत त्या खडकावर जाऊन बसला व हत्तींना पाहून गर्जना करूं लागला. त्या गर्जनेनें लखूला कानाचे पडदे फुटल्यासारखें वाटलें. सिंहाच्या डरकाळ्या ऐकून हत्ती भयकंपित होऊन मोठमोठ्यानें ओरडूं लागले.

"मी आंघोळीला येतों त्यावेळीं प्रत्येक वेळीं हें दृश्य मला पहायला मिळतें. हत्ती व सिंह यांचें परस्परांवर ओरडणें सुरू झालें कीं दिगदिगंत दुमदुमून जातें. कांहीं वेळानें सर्व हत्ती परत रानांत जातात व सिंह गुहेंत जाऊन बसतो." जयमलनें वर्णन करून सांगितलें.

जयमल आपल्या शक्तीच्या फुशारक्या मारीत होता. लखूला तें त्याचें बोलणें विशेष आवडलें नाहीं. आपला कोणीच मित्र नाहीं. दोघे आपला स्वार्थ साधून घेण्यासाठीं



आपला उपयोग करून घेणार आहेत. जयमलला लखूच्या मनांत जे विचार चालू होते ते कळणें शक्य नव्हतें. तो आपल्याच रंगांत, जणुंकांहीं जगच जिंकून आलों आहों अशा तऱ्हेनें, बोलत होता.

"तूं म्हणालास आजपासून आपण दोघे भाऊ भाऊ. पण तुझ्या बोलण्यांत माझ्यावर येणाऱ्या संकटांतून माझी सुटका कशी होणार याचा तूं विचार करीत असल्याचा मला भास देखील झाला नाहीं." लखूनें स्पष्ट विचारलें.

जयमलनें एकदां डोंगराच्या शिखराकडे पाहालें. तेथें एका खडकावर बसून ब्रह्मदंडी

त्यांच्याकडे पहात होता. जयमलनें लखूला सावध केलें—"तो बघ ब्रह्मदंडी आपल्याकडे पहात आहे. तूं मोठ्यानें बोललास तर त्याला सर्व ऐकूं येईल व आपले सर्व बेत ढांसळून जातील. त्याचे कान फार तिखट आहेत. तुझें रक्षण करणें तुझ्यासाठींच नव्हे तर मला स्वतःसाठीं देखील आवश्यक वाटतें. त्या भयंकर दरींत जायला कोण योग्य आहे हें ब्रह्मदंडीवरोबर मला देखील कळलें. तूं स्वतःच पाहिलेंस कीं तुझ्या खांद्यावरचा तो सांपांचा तीळ पाहून ब्रह्म-दंडीला ब्रह्मानंद झाला होता. आज रात्रीं मंत्रबळानें तुला बोलायला लावून तो त्या भयंकर दरीचा मार्ग व त्यांत कोणकोणता खजिना आहे हें समजून घेईल. तें कळल्यावर आपण दोघे मिळून त्या ब्रह्मदंडीला यमलोकीं पाठवूं, घाबरूं नकोस."

"पण त्या पूर्वींच आपणां दोघांना तो यमलोकीं पाठवून देणार नाहीं कशावरून?" लखूनें शंका केली.

"तें अशक्य! कारण त्याला तूर्त धन आणि कीर्तीचा लोभ इतका वाटत आहे कीं विवेक नांवाची वस्तु त्याच्यांत थोडी देखील शिल्लक राहलेली नाहीं. तितकी बुद्धि उरली असती तर त्यानें आपल्याला असें एकत्र हिंडूं फिरूं दिलें नसतें." जयमलनें सांगितलें.

डोंगरावरून ब्रह्मदंडी दोघांकडे तीक्ष्ण नजरेनें पहात होता. तो एकदम कां कोणास ठाऊक, थोडा हंसला आणि थोड्या वेळानें ओरडून म्हणाला—"जयमल येतांना बरोबर समिधा देखील घेऊन ये! काळभैरवाला कडक भूक लागली आहे. हजार वर्षांनी फक्त एकदांच त्याला इतकी भूक लागते.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]




# अंगरक्षक

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाही. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या वाटेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं स्वतः राजा आहेस. तुला एखाद्या नोकरासारखा इतरांचें काम करीत असलेला पाहून मला तुझी कींव येते. परंतु कधीं कधीं विश्वासपात्र व स्वामिभक्त अशा नोकरावर देखील राजा कसा अन्याय करतो याचें एक उदाहरण म्हणून मी सुप्रभाकर नांवाच्या राजाची गोष्ट सांगणार आहें. असें सांगून वेताळानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

फार पूर्वीं एका गांवीं सुप्रभाकर नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच्याकडे पुष्कळ नोकर होते. राजाचें आपल्या नोकरांवर स्वतःच्या मुलासारखें प्रेम होतें. नोकर-देखील फार स्वामिभक्त होते. त्यांतल्या



त्यांत धीरू नांवाच्या एका नोकरावर राजा फार विश्वास करीत असे. म्हणून त्यानें त्याला स्वतःचा अंगरक्षक म्हणून नेमलें होतें.

धीरू पहाऱ्यावर होता म्हणून राजाला रात्रीं निश्चिंतपणें झोपतां येई. धीरू डोळ्यांत तेल घालून राजाचें रक्षण करी. राजा कधींकधीं मंत्री किंवा सेनापति यांच्याजवळ देखील ज्या गोष्टी बोलत नसे त्या धीरूजवळ बोलण्यांत त्याला संकोच वाटत नसे. धीरू इतका विश्वासपात्र नोकर होता.

एके दिवशीं राजानें झोपण्यापूर्वी धीरूला सकाळीं शिकारीला जायचें आहे असें सांगितलें व त्यासाठीं आवश्यक ती सर्व तयारी करून ठेवायला पण सांगितलें.

राजानें आज्ञा केल्याप्रमाणें धीरूनें सर्व तयारी रात्रींच करून ठेवली आणि ज्यांना ज्यांना ती गोष्ट कळविणें आवश्यक होतें त्यांना कळविली. उजाडण्यापूर्वी राजा उठला व धीरूला हाक मारून विचारलें—"शिकारीला जायची सर्व तयारी आहे का?"

धीरू पुढें येऊन म्हणाला—"सर्व तयारी आहे महाराज! परंतु आज महाराजांनीं शिकारीला जाऊं नये असें मला वाटतें." कारण विचारतां तो म्हणाला—"मला आज एक वाईट स्वप्न पडलें आहे. पहाटेचीं स्वप्नें खरीं निघतात असें थोरांमोठ्यांचें सांगणें आहे. मला असें स्वप्न पडलें कीं रथाचे घोडे एकाएकीं बुजले आणि वाटेल तसे पळूं लागले. म्हणून रथ रस्त्यावरून घसरला आणि एका खड्ड्यांत पडून तुटून गेला. घोडे, सारथी व रथांत बसलेला मनुष्य सर्व रथाखालीं पडून चिरडून मरून गेले."

नोकराला पडलेलें स्वप्न खरें आहे कीं खोटें ह्याची खात्री करून घेण्यासाठीं राजा स्वतः शिकारीला गेला नाहीं. स्वतः ऐवजीं एका योद्ध्याला शिकारीला पाठविलें.



धीरूचें स्वप्न खरें ठरलें. एका टेकडीवर चढत असतां घोडे बुजले व रस्ता सोडून पळूं लागले. म्हणून रथ टेकडीवरून खालीं कोसळला व धीरूनें सांगितल्या प्रमाणें सारथी व रथांत बसलेला मनुष्य दोघे रथाखालीं चिरडून मरून गेले.

संध्याकाळीं ही गोष्ट राजाला कळली. राजानें धीरूला बोलावून त्याला शाबासकी दिली व एक मोठें बक्षिस पण दिलें.

पुढें कांहीं दिवसांनीं दिवाळी आली. दिवाळीच्या आदल्या दिवशीं रात्रीं धीरूला आणखी एक स्वप्न पडलें. दिवाळीचे दिवे सगळीकडे लागले आहेत आणि ज्या बुरजावर उभा राहून राजा दिवाळीची गंमत पहात असे तो बुरूज एकाएकीं मोडला व कोसळून खालीं पडला.

धीरूनें स्वप्नाची गोष्ट राजाला सांगितली व दिवाळीच्या दिवशीं बुरुजावर चढूं नये अशी विनंति केली. धीरूला पडलेलें स्वप्न खरें निघालें होतें. म्हणून राजानें या खेपेस धीरूच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें ठरविलें. तो रात्रीं बुरुजावर चढला नाहीं आणि दिवाळीची गंमत पहायला वेष पालटून पायींच राजधानीभर हिंडला.



परंतु घरीं येऊन पाहतो तर धीरूनें सांगितल्याप्रमाणें बुरूज कोसळल्यामुळें राजवाड्यांत खळबळ उडून गेली होती. प्रजेला वाटलें कीं नित्याप्रमाणें राजा बुरुजावरून गंमत पहात असणार व या अपघातांत प्राणास मुकला असणार.

अशा तऱ्हेनें दुसऱ्या वेळेस धीरूनें सावध केल्यामुळें राजाचें रक्षण झालें होतें. राजानें त्या करितां धीरूला मोठें बक्षिस देऊन त्याचा गौरव केला.

पुढें कांहीं दिवसांनीं धीरूला आणखी एक वाईट स्वप्न पडलें. धीरूच्या बरोबर

आणखी एक जण राजाच्या उद्यानांत संध्याकाळीं फिरत होते. दोघे रातराणीच्या झाडाशेजारून जाऊं लागले. एकाएकीं एक सांप झाडाखालून आला व धीरूबरोबरच्या माणसाला चावला. तो मनुष्य जागच्या जागीं तडफडून मरण पावला.

स्वप्नाच्या विषयीं विचार करीत असतां धीरूला वाटलें तो दुसरा मनुष्य दुसरा कोण असणार? स्वतः महाराजच असणार. तेव्हां महाराजांच्या जिवाला आज धोका आहे. त्यांनीं आज संध्याकाळीं बागेंत फिरायला जाऊं नये.

संध्याकाळीं फिरायला निघण्यापूर्वीं धीरूनें पहाटे पाहिलेल्या स्वप्नाची गोष्ट सांगून महाराजांनीं आज बागेंत फिरायला जाऊं नये अशी विनंति केली. दोन्ही वेळेस धीरूनें सांगितल्याप्रमाणें स्वप्नांतली गोष्ट खरी निघाली. म्हणून राजा स्वतः फिरावयास बागेंत गेला नाहीं. पण त्यानें एका नोकराला धीरूबरोबर फिरायला जायला सांगितलें. धीरूचें स्वप्न खरें निघतें कीं खोटें हें राजाला पहावयाचें होतें. धीरू बागेंत फिरायला गेला. धीरूनें स्वप्नांत पाहिलें होतें अगदीं तसेंच झालें. ते रातराणीच्या



झाडाजवळून जात असतां झाडाखालून एक सांप फूत्कार सोडीत आला व धीरूच्या बरोबर जाणाऱ्या नोकराला चावला. तो मनुष्य तेथल्या तेथें तडफडून मरण पावला. हें सर्व एक दोनच मिनिटांत घडलें.

धीरूचें स्वप्न तिसऱ्या वेळींसुद्धां खरें ठरलें व या खेपेस देखील राजाचा जीव वांचला. परंतु या वेळीं राजानें धीरूची पाठ थोपटली नाहीं, कीं त्याला कांहीं बक्षिस पण दिलें नाहीं. उलट त्याला अंगरक्षकाच्या जागेवरून कमी केलें आणि दुसऱ्या कोणत्या तरी कामावर नेमलें.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा! सुप्रभाकर महाराजांनीं धीरूला दोन वेळां शाबासकी दिली व बक्षिस दिलें. पण तिसऱ्या वेळीं देखील त्यानें सांगितल्या-प्रमाणें त्याचें स्वप्न खरें ठरलें असूनहि बक्षिसाऐवजीं दंड कां दिला? त्याची बदली केली हा देखील एक दंडच नव्हे का? राजाच्या मनांत विचार तरी काय होता? कीं स्वतःच्या जिवाबद्दल त्याच्या मनांत विरक्ति उत्पन्न झाली होती? तें कांहीं असो, तूं या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून दिली नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर आदळतील."

"धीरूला अंगरक्षकाच्या कामावरून राजानें कमी करून त्याला दुसरें काम दिलें हें ठीकच केलें. अंगरक्षक रातभर जागा राहून राजाचें रक्षण करण्याचें सोडून झोंपा काढूं लागला. झोंपल्याशिवाय स्वप्नें कशी पडणार? ही गोष्ट राजाच्या लक्षांत आली असली पाहिजे. त्यानें दोन वेळां त्याचा प्राण वांचवला. याबद्दल राजानें त्याला दोन्ही वेळ बक्षिस दिलें व शाबासकी पण दिली. परंतु तिसऱ्या वेळीं मात्र राजाला वाटलें कीं या नोकराला झोंपा काढण्याची संवय आहे. झोंपणारा अंगरक्षक निरुपयोगी आहे. म्हणून त्या कामावरून त्याला काढून त्याला दुसरें काम दिलें. दुसरें काम करीत असतां त्याला नोकराला पडणाऱ्या स्वप्नांचा फायदा राजाला झालाच असता. म्हणून नोकरीवरून काढून न टाकतां त्याला राजानें बदली दिली."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह नाहींसा झाला व पूर्वीप्रमाणें झाडाला जाऊन लटकूं लागला.






# मृगशीर्ष

मृगाचा पाऊस असें आपण म्हणतो. मृगशीर्ष हें एक नक्षत्र आहे. या मृगशीर्ष नक्षत्राविषयीं ग्रीक भाषेंत एक पौराणिक कथा सांगतात.

ग्रीस देशांत समुद्रकाठीं एक वृद्ध जोडपें रहात असे. म्हातारा शेती करी व मधमाशा पाळी. त्यांच्या गरजा फार थोड्या होत्या. ईश्वर कृपेनें त्यांच्या सर्व गरजा त्या गरीबीच्या स्थितींत पण भागत असत. पण त्यांना ह्या गरीबीची एवढी काळजी वाटत नव्हती. मूलबाळ कांहीं नाहीं म्हणून दोघें फार दुःखी होतीं.

एकदां रात्रीं समुद्रांत मोठें वादळ आलें. व जोरजोरानें पाऊस पडूं लागला. दोघें आपल्या झोंपडींत काकडत बसलीं होतीं. तेवढ्यांत त्यांच्या झोपडीच्या दाराजवळ एक मनुष्य आला व दार उघडायला सांगितलें. म्हाताऱ्यानें लगेच दार उघडून त्याला आंत बोलाविलें. कोरडे कपडे अंगांत घालायला दिले. म्हातारीनें एक वासरूं कापून त्याचें मांस शिजवून आपल्या पाहुण्याला जेवायला वाढलें. त्यांच्याकडे एकच एक बिछाना होता. पण तोच त्यांनीं त्या पाहुण्याला अंथरून दिला व दोघें काकडत एका कोपऱ्यांत शेगडीपाशीं रात्रभर बसून राहलीं.

सकाळीं उजाडल्यावर पाहुणा निघाला तेव्हां त्याला पोंचवायला म्हातारा कांहीं अंतर चालत आला. निरोप घेत असतां पाहुण्यानें विचारलें—"आजोबा! तुमची कांहीं इच्छा अपूर्ण राहिली असेल तर सांगा, मी पुरी करतों."

"आतां या वृद्धापकाळीं कसली इच्छा उरणार? पण मूल नाहीं म्हणून मनाला फार वाईट वाटतें." म्हातारा म्हणाला.

सौ. कमलाबाई पवार



"मी सांगतों तसें करा. काल रात्रीं तुम्हें जें वासरूं कापलेंत त्याच्या चामड्याची पिशवी शिवून त्यांत समुद्राचें पाणी भरून नऊ महिने ठेवा. ती चामड्याची पिशवी शेगडी जवळ पुरून ठेवून द्या. नऊ महिन्यांनंतर तुम्ही पिशवी उघडून पाहलीत तर तींत तुम्हांला एक मूल दिसेल." असें सांगून तो पाहुणा समुद्रांत चालत जात एकदम अदृश्य झाला.

म्हाताऱ्याला फार आश्चर्य वाटलें. झोंप-डींत आल्यावर पाहुण्यानें जें कांहीं सांगितलें होतें त्यानें म्हातारीला सांगितलें व त्या प्रमाणें केलें. वासराचें कातडें काढून त्याची पिशवी शिवली व तींत समुद्राचें पाणी भरून शेगडीजवळ जमिनींत ती पुरून ठेवली.

नऊ महिन्यानंतर त्यानें ती पिशवी बाहेर काढून उघडली तेव्हां त्या विक्षिप्त पाहुण्यानें सांगितल्याप्रमाणें खरोखरच एक सुंदर मुलगा त्या पिशवींत खेळत असलेला त्याला दिसला. त्याचें नांव त्यांनीं दोघांनीं मिळून मृगशीर्ष असें ठेवलें.

मुलगा लहानाचा मोठा झाला. रूपानें तो जणुं कांहीं मदनाचा पुतळाच होता. तरुण वयांत आल्यावर तो रानटी जनावरांची शिकार करण्यांत पटाईत निघाला. त्याला एक दिव्य शक्ति प्राप्त होती. तो जसा जमिनीवर चाले किंवा धांवे तसें पाण्यावर देखील त्याला चालतां व धांवतां येत असे.

आईवडील वारल्यावर त्याला पोटा-पाण्याची काळजी पडली. म्हणून तो उदर-निर्वाहासाठीं एका गांवाहून दुसऱ्या गांवीं हिंडूं लागला. त्यानें एका नवीन द्वीपांत जायचें ठरविलें आणि पायींच समुद्र पार करून तो परदेशांत गेला.

त्या देशाचा राजा एक शूर योद्धा होता. त्यानें मृगशीर्षाचें प्रेमानें स्वागत केलें व त्याच्या आदरातिथ्याची उत्तम व्यवस्था करून दिली. परंतु या आदरातिथ्याचा मृगशीर्षानें सदुपयोग करण्याऐवजीं दुरुप-योग केला. त्याची वक्रदृष्टि राजकन्येकडे वळली व त्यानें तिच्याशीं लग्न करण्याचें ठरवून राजाकडे मागणी घातली.

पाण्यावर चालण्याच्या दिव्यशक्तीव्यति-रिक्त मृगशीर्षांत राजकुमारी भाळून जाईल असा एकहि गुण नव्हता. त्याचा जन्म तरी उच्चकुळांत झाला म्हणावा तर तसेंहि नव्हतें. अर्थातच मृगशीर्षाला आपला जांवई करून घ्यायला राजा मुळींच तयार झाला नाहीं. पण त्यानें त्याला स्पष्ट शब्दांत नकार दिला नाहीं. त्यानें एक युक्ति योजली. त्या बेटावर रानटी श्वापदांचा उपद्रव वाढूं लागला होता. राजानें विचार केला त्या श्वापदांचा संहार करण्याचें काम मृगशीर्षाला द्यावें, म्हणजे त्याचा प्रश्न परस्पर सुटेल. त्यानें तसें त्याला सांगितलें देखील. म्हणाला—"जर तूं या श्वापदांचा संहार केलास तर मी तुझें लग्न राजकन्येशीं करून देईन."

मृगशीर्ष शिकार करण्यांत देखील पटाईत होता. तो रोज आठ दहा रानटी जनावरांची शिकार करी. एका महिन्याच्या





आंत त्यानें सर्व रानटी जनावरांचा संहार केला व राजानें सांगितलेली अट पुरी केली.

राजाची ही युक्ति हुकली. तरी तो म्हणाला—"तूं शिकार करण्यांत पटाईत आहेस खरा. माझ्या शिपायांकडून मी तुझ्या शिकारींतल्या कौशल्याची फार वाखाणणी ऐकली आहे. मला असेंहि कळलें आहे कीं तुझ्या भीतीनें श्वापदें आपल्या गुहेंतून बाहेर देखील निघत नाहींत. म्हणून आणखी कांहीं दिवस त्यांची वाट पहाण्यासाठीं थांबलेलें बरें."

पण मृगशीर्षाला खरा मुद्दा कळला होता. तो कांहीं दिवस थांबला. एकहि श्वापद दिसलें नाहीं. तो येणार हें राजाला माहीतच होतें. त्याच्यासारख्या क्रूर नरपशूशीं राजकन्येचा विवाह करून देण्यास तो मुळींच तयार नव्हता. म्हणून त्यानें दुसरी एक युक्ति योजली. त्यानें आपल्या सैनिकांकरवीं मृगशीर्षाला खूप दारू पाजली व तो छान झिंगल्यावर राजकन्येला त्यानें पळवून न्यावें असें त्याच्या मनांत भरवून दिलें. जो वाघांसिंहांची शिकार करूं शकतो त्याच्यासमोर राजाचे शिपाई किंवा प्रत्यक्ष राजा काय करूं शकणार?

मृगशीर्ष असा विचार करून मूर्खासारखा राजकन्येच्या महालांत शिरला. राजा हजर होताच. त्यानें त्याला लगेच कैद करून तुरुंगांत टाकलें व ज्या डोळ्यांनीं त्यानें राजकन्येकडे वाईट नजरेनें पाहलें ते डोळे काढून टाकायला सांगितलें. राजाच्या हुकमाप्रमाणें सैनिक त्याचे डोळे काढून त्याच स्थितींत त्याला समुद्रकाठीं सोडून निघून आले.

अशातऱ्हेनें मृगशीर्ष आंधळा होऊन असहाय स्थितींत समुद्रकिनाऱ्यावर आक्रोश



करीत हिंडूं लागला. रात्रीची वेळ होती त्याचा आक्रोश कोणाच्या कानीं पडणार?

पण सुदैवानें त्याला दुरून कोणी तरी बोलत असल्याचा आवाज ऐकूं आला. त्या आवाजाच्या रोखानें तो चालूं लागला. तो आवाज खरोखरी समुद्रांतून येत होतो. पण मृगशीर्षाला जमीन काय किंवा पाणी काय सर्व सारखेंच होतें. तो चालत चालत एका बेटावर येऊन पोंचला. त्या बेटावर एक ज्वालामुखी पर्वत होता. बेटावर राहणाऱ्या लोकांना फक्त एकच एक डोळा होता. त्यांनीं प्रेमानें त्याचें आतिथ्य केलें. त्यांचा नायक त्याला म्हणाला—"मी सांगतों तसा तूं पूर्व समुद्राच्या काठीं जाऊन सूर्याचें दर्शन केलेंस तर तुला पुन्हां डोळे येतील. नायकानें आपल्या एका अनुयायाला मृगशीर्षाबरोबर वाट दाखवायला पाठविलें. त्याच्याबरोबर मृगशीर्ष पूर्व समुद्राच्या काठीं येऊन पोंचला. ते खूप दमून गेले होते. ते पोंचले तेव्हां रात्र पडली होती. म्हणून सकाळपर्यंत सूर्योदयाची वाट पहात त्यांना बसावें लागलें.

सूर्योदय झाल्यावर सूर्याचीं कोंवळीं किरणें पडतांच मृगशीर्षाला पुन्हां छान दिसूं लागलें. मृगशीर्ष ज्वालामुखीच्या पर्वतावर परत आला.



तेथील लोकांचे त्यानें आभार मानले व ज्या राजानें त्याचे डोळे काढवले होते त्याला त्याचें प्रायश्चित्त देण्यासाठीं निघाला.

राजाला ती गोष्ट कळली. तेव्हां तो आपल्या मुलीला घेऊन पळून गेला. मृग-शीर्षाला त्याचा पत्ता लागला नाहीं. म्हणून कंटाळून तो भीसभर रानांत शिकार करीत हिंडूं लागला. त्याचा नांवलौकिक वाढत गेला. पण या प्रसिद्धीमुळें त्याला गर्व चढला. त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं या जगांत मी एक देखील रानटी जनावर किंवा विषारी प्राणी जिवंत राहूं देणार नाहीं.

त्याची ती प्रतिज्ञा ऐकून भूदेवीला फार राग आला. निरपराध जनावरांचा असा संहार करणें तिला आवडलें नाहीं. म्हणून तिनें एक अति भयंकर असा राक्षसी विंचू मृगशीर्षावर सोडला. मृगशीर्षानें त्याच्यावर बाण सोडले आणि तलवारीचे वार केले. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट तो विंचूच मृगशीर्षाचा पाठलाग करूं लागला. तेव्हां मृगशीर्ष पळूं लागला. त्याला वाटेंत सात गंधर्वकन्या भेटल्या. तो विंचवाची गोष्ट पार विसरून गेला व गंधर्वकन्यांच्या पाठीमागून पळूं लागला. तो त्यांच्या अगदीं जवळ पोंचला आणि एकीचा हात धरणार एवढ्यांत ती वटवाघळाचें रूप घेऊन उडूं लागली व तिच्याबरोबर इतर सहा जणी पण वाटवाघळाचें रूप घेऊन उडूं लागल्या. तो त्यांच्याकडे आकाशांत पहात उभा राहिला. तेवढ्यांत विंचवानें त्याला आपली नांगी मारली.

आज देखील आपल्याला आकाशांत वृश्चिक राशीजवळ पश्चिमेकडे मृगशीर्ष नक्षत्र दिसतें. तेथून कांहीं अंतरावर पश्चिमेकडे कृत्तिका नक्षत्र दिसतें. म्हणे, आकाशांत आजपावेतों हीं तिन्ही पळत असतांना दिसतात.





# बुद्धीचा नजराणा

चित्रपुरी नांवाच्या एका गांवीं विचित्रवर्मा नांवाचा एक राजा राज्य करीत असे. तो वयानें तरुण होता. त्याला राज्यव्यवस्थेचा अनुभव मुळींच नव्हता. पण त्याच्याकडे एकाहून एक बुद्धिमान व सूज्ञ असे मंत्री होते. त्यांच्या सल्ल्याशिवाय तो एकहि काम करीत नसे.

चित्रपुरी लगतच्या प्रदेशाला अंगदेश म्हणत. तें राज्य चित्रपुरीहून फार मोठें होतें. तेथें वर्धन नांवाचा राजा राज्य करीत असे. चित्रपुरी राज्य जिंकून आपल्या साम्राज्यांत मिळविण्याची इच्छा त्याच्या मनांत बरेच दिवसांपासून होती. परंतु चित्रपुरीचा राजा पराक्रमी होता; म्हणून त्याचें धाडस झालें नाहीं. परंतु तरुण युवराज गादीवर बसल्यावर राजानें चित्रपुरी-वर स्वारी करण्याचा निश्चय केला. त्यानें कांहींतरी वितुष्ट काढून स्वारी करावी. असा विचार करून त्यानें आपल्या मंत्र्यांना बोल-विलें आणि त्यांचा सल्ला घेतला.

प्रधान म्हणाला—"आपला विचार बरोबर आहे. परंतु चित्रपुरीच्या राजाचे मंत्री जर का हुशार असतील तर त्याला जिंकणें सोपें नाहीं. म्हणून प्रथम त्याचे मंत्री बुद्धिमान आहेत कीं नाहींत हें पाहिलें पाहिजे. शत्रूच्या बळाबळाची चांगली माहिती करून घेतल्याशिवाय स्वारी करणें शहाणपणाचें होणार नाहीं."

राजा म्हणाला—"ठीक आहे. मला तें कबूल आहे. मग लिहा पत्र चित्रपुरीच्या राजाला." राजाच्या आज्ञेप्रमाणें प्रधानांनीं एकपत्र चित्रपुरीच्या राजाला लिहिलें. प्रधान म्हणाले—"हें पत्र प्रथम चित्रपुरीच्या राजाला लिहावें व काय उत्तर येतें याची वाट पहावी."

श्री. बा. गो. कामत



त्या पत्रांत लिहिलें होतें कीं "आपण आपल्या राज्यांतून थोडीशी बुद्धि आमच्या येथें शक्य तितक्या लवकर पाठवून धावी."

वर्धन राजाचा दूत पत्र घेऊन चित्रपुरीला आला. राजानें पत्र वाचलें व त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें तें पत्र आपल्या चतुर मंत्र्यांना वाचायला दिलें. पत्र वाचून ते देखील चकित झाले. काय उत्तर लिहावें कोणाला कांहींच सुचेना. त्यांनीं एखादी वस्तु मागविली असती तर ती पाठवून देणें कठीण नव्हतें. पण बुद्धि कशी पाठवावयाची? ह्या विचित्र पत्राच्या मुळाशीं कांहींतरी दुष्ट हेतु असावा असें सर्वांना वाटलें. पण तो हेतु काय हें त्यांना कळेना. आपल्या सर्वांच्या बुद्धीची परीक्षा घेण्यासाठींच वर्धन राजाचा हा डाव असला पाहिजे असे सर्वांचें मत पडलें. पण याला तोड काय?

विचित्रवर्मा देखील बराच वेळ विचार करीत बसला. पण वृद्ध मंत्र्यांना किंवा प्रधानांनाच जर कांहीं सुचलें नाहीं तर त्याच्यासारख्या तरुण युवराजाला काय सुचणार. त्या वेळीं वयानें सर्वांत लहान अशा बृहस्पति नांवाच्या मंत्र्यानें उभा राहून विनंति केली कीं या पत्राचें उत्तर मी द्यायला तयार आहें. पण मला चार महिन्यांचा अवधी देण्यांत यावा.

विचित्रवर्मानें ती विनंति मान्य केली व वर्धन राजाच्या दूताच्या हातीं पत्र लिहून कळविलें कीं आपलें पत्र पावलें. पत्राचें उत्तर पाठविण्यास कमींत कमी चार महिन्यांचा अवधी देण्याची कृपा करावी.

तीन महिने लोटल्यावर बृहस्पति एक मोठें गांठोडें नोकराच्या डोक्यावर ठेवून घेऊन आला व म्हणाला—"ह्यांत बुद्धि घेऊन आलों आहें. परंतु जरा काळजीपूर्वक पोंचती करण्याची व्यवस्था करावी. कारण ह्याला धक्का लागतां कामा नये आणि बाहेरची हवा किंवा वारा लागतां काम नये. गांठोडें काळजीपूर्वक बांधलें आहे हें वर्धन राजा समक्षच सोडावें.





प्रत्येकानें तें गांठोडें उचलून हात लावून पाहिलें. पण त्यांत काय आहे हें मात्र कोणाला कळलें नाहीं. विचित्रवर्मानें देखील विचारलें नाहीं. बृहस्पतीच्या चातुर्यावर त्याचा पूर्ण विश्वास होता. म्हणून त्यानें तें गांठोडें एका दूताच्या हातीं अंगदेशाच्या राजाकडे पाठविलें व बरोबर एक चिठ्ठी गांठोड्याला गांठ मारून ठेवून दिली. चिठ्ठींतला मजकूर असा होता—"आपण लिहिल्याप्रमाणें ह्यांत बुद्धि पाठविली आहे. पोंच कळविण्याची कृपा करावी."

ठरल्याप्रमाणें विचित्रवर्माकडून बुद्धि आलेली पाहून वर्धन चकित झाला. त्यानें फार काळजीपूर्वक गांठोडें सोडलें. त्यांत एक मडकें होतें व मडक्यांत एक मोठा भोपळा होता. तो भोपळा त्या मडक्यांत कसा घातला हें कोणाला कळेना. मडक्याचें तोंड भोपळ्यापेक्षां तर फारच लहान. मडक्याला कोठें सांधा नाहीं. हें सर्व पाहून वर्धन व त्याच्या मंत्र्यांचें डोकें चालेना. मडक्याच्या तोंडाला एका दोऱ्यानें एक चिठ्ठी बांधलेली होती. ती उलगडून वर्धन राजाच्या मंत्र्यानें वाचली. चिठ्ठींत पुढील मजकूर पण होता—"ह्या मडक्यांत बुद्धि पाठवीत आहें. मडकें फोडल्याशिवाय अलगद काढून घ्यावी."

राजा व मंत्री परस्परांचीं तोंडें पहात बसले. कोणाला तें सर्व कळेना. परीक्षा घ्यायला गेलों होतों आणि परीक्षा द्यायची पाळी आली आहे. कारण मडकें मोठें असलें तरी त्याचें तोंड लहान होतें व आंतला भोपळा कापलेला नव्हता. सबंध होता व ताजा पण दिसत होता. आंत गेला कसा हें कळलें

तर कदाचित तो बाहेर कसा काढावयाचा हें कळेल. पण कांहींच उलगडा होईना.

शेवटीं वर्धन राजानें आपल्या प्रधानांना उद्देशून म्हटलें—"मला वाटलें होतें तेवढे विचित्रवर्मा किंवा त्याचे मंत्री मूर्ख नाहींत. चतुर आहेत व कदाचित आपल्याहूनहि जास्त चतुर आहेत."

विचित्रवर्माला अंगदेशांतल्या दरबारांत बुद्धीच्या परीक्षेसंबंधी जो वृत्तांत घडला तो ठीक ठीक कळला नाहीं. पण तिकडून कांहींच उत्तर न आलेलें पाहून त्याला वाटलें, बहुतेक त्याच्या कल्पनेप्रमाणें त्याला बुद्धि मिळाली असावी. त्यानें बृहस्पतीला बोलावून त्याचें अभिनंदन केलें व म्हणाला—" अमात्य ! तुमच्या चातुर्यामुळें आज आमच्या प्रतिष्ठेचें रक्षण झालें. त्यामुळें राज्याला नवीन प्रतिष्ठा पण मिळाली. तुमच्यासारख्या चतुर अमात्यांची राज्य कारभाराला नेहमीं गरज असते. वर्धन राजाची चांगलीच खोड मोडली. पण मला हें सर्व झालें कसें हें कळलें नाहीं."

बृहस्पति म्हणाला—"मी एक सोपी युक्ति केली. माझ्या परसांत मी तांबडा भोपळा लावला होता. त्याला फुलें येऊं लागली होतीं. मी एक मडकें घेऊन फळ येणारें फूल त्यांत घालून ठेवून दिलें. तीन महिन्यांनीं फळ छान मोठें झालें. मी सुरीनें त्याचें देठ कापून भोपळ्यासकट मडकें एका गाठोड्यांत बांधून वर्धन राजाकडे तें पाठवून देण्यास विनंति केली. या पलीकडे मी कांहीं एक केलें नाहीं. त्यानें बुद्धि मागविली होती ती अशा तऱ्हेनें पाठवून दिली. परंतु ती ओळखण्यासाठीं देखील बुद्धीची आवश्यकता आहे. ती त्यांच्याकडे होती कीं नाहीं मला माहीत नाहीं.







# गुणी गणोबा

गुरूचा निरोप व आशीर्वाद घेऊन गणोबा घरीं निघाले. वाटेंत त्यांनीं विचार केला, रिकाम्या हातानें घरीं जाणें बरोबर नाहीं. कांहीं तरी मिळकत करून मग घरीं जावें. म्हणून गणोबांनीं राजाच्या पदरीं कांहीं दिवस नोकरी करण्याचें ठरविलें.

त्या प्रमाणें गणोबा राजधानीकडे निघाले. जात असतां समोर एक तरुण मनुष्य धांवत येत असलेला दिसला. त्याच्या मागून दोन शिपाई धांवत येत होते व ओरडत होते, "पकडा ! पकडा त्याला !"

गणोबांनीं पाहिलें, त्या तरुणाचे केस विखुरलेले होते, कपडे फाटलेले होते व सर्व अंग धुळीनें माखलेलें होतें. गणोबांना वाटलें, तो कांहीं तरी गुन्हा करून पळून जात असावा. गणोबांनीं विचार केला, आपण याला धरून दिलें तर राजाचें काम केल्याबद्दल राजा बक्षिस देईल. त्याप्रमाणें ठरवून गणोबांनीं त्या तरुणाला धरून ठेवलें. शिपायांनीं येऊन त्याला पकडलें व एका झाडाला घट्ट बांधून ठेवलें. त्यांनीं गणोबांचे आभार मानले व म्हणाले—"हा एक राजद्रोही आहे. हा पळून जात होता. आमचे सेनापति आपणांला याबद्दल इनाम देतील. दोन दिवस आम्ही याचा सारखा पाठलाग करीत धांवत होतों. थोडा वेळ आम्हीं शेजारच्या गुहेंत विश्रांति घेतों. तुम्ही याच्यावर नजर ठेवा."

गणोबांनीं ती कामगिरी पत्करली. एक शिपाई कांहीं वेळ विश्रांति घेऊन गांवांत जाऊन लवकर येतों असें सांगून निघून गेला. दुसरा शिपाई घोरत पडला होता. गणोबा पाहारा देत बसले होते.



थोड्या वेळानें त्या तरुणानें खूण करून गणोबांना जवळ बोलावलें व खुणेनेंच तहान लागली असल्याचें सांगितलें. गणोबांनीं शेजारच्या ओढ्यावरचें पाणी एका द्रोणांत आणून त्याला प्यायला दिलें. पाणी प्याल्या-वर तो तरुण गणोबांना म्हणाला—"तूं कोण आहेस मला माहीत नाहीं. पण तूं परोपकारी दिसतो आहेस. म्हणून तुझ्याजवळ खरी गोष्ट मी सांगत आहें. हे दोघे सेनापतीच्या हुकमानें मला धरायला निघाले होते. मी आपला जीव वांचविण्यासाठीं पळत होतों. तूं पकडलेंस म्हणून त्यांच्या हातीं सांपडलों. मी या देशाचा युवराज आहें. माझे वडील वारल्यावर मी गादीवर बसणार होतों. सेनापतीनें मला तुरुंगांत टाकून स्वत : गादी बळकावण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा तो बेत फसला व मी त्यांच्या हातून निसटलों. राजद्रोही सेनापतीला मदत करणें बरोबर होईल, कीं मला, याचा तूंच विचार कर."

तो तरुण पुढें म्हणाला—"एक शिपाई सेनापतीला ही बातमी देण्यासाठीं गेला आहे. सेनापति येण्यापूर्वीच तूं मला सोडवलेंस तर मी जन्मभर तुझे उपकार विसरणार नाहीं."

तें सर्व ऐकून गणोबांना आश्चर्य वाटलें. त्या तरुणाच्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसला. आपण राजाच्या पदरीं नोकरी करायला निघालों होतों, पण आपल्या हातून राजद्रोह घडणार होता. जास्त वेळ विचार करीत बसलों तर युवराजाची सुटका होणें अशक्य आहे. म्हणून गणोबांनीं लगेच दोरी सोडून त्या तरुणाला सोडविलें. त्या तरुणानें त्या उपकाराबद्दल गणोबांचे आभार मानून गणोबांना सावध केलें. म्हणाला—"तूं मला सोडविलें आहेस हें सेनापतीला कळलें तर तो तुला फांशी देईल. म्हणून तूं लवकर पळून जा."



पण गणोबा म्हणाले—"युवराज! मला हें सर्व कांहीं कळत नाहीं. दुसरा संकटांत असेल तर त्याला मदत करावी, मला एवढेंच कळतें. मला माझ्या आईनें हेंच शिकविलें आहे. या सैनिकांनीं मदत मागितली मी दिली. तुम्ही खरी वस्तुस्थिति सांगितलीत तेव्हां माझी चूक माझ्या लक्षांत आली. म्हणून मी आपल्याला सोडविलें. आतां तुम्ही लवकर निघून जा आणि बंडखोरांना पकडून शिक्षा करा."

"तूं सुद्धां चल कीं माझ्या बरोबर! उगीच संकटांत कां उडी घेतोस?" युवराजानें विचारलें.

"तुम्ही माझी काळजी करूं नका. मी एकटा दहापांच जणांना पुरेसा आहें. मी यांना येथें अडकवून ठेवतों. तुम्ही लवकर जाऊन राजभक्त सैनिकांना बोलावून घेऊन या व यांना कैद करून शिक्षा करा." गणोबा म्हणाले.

युवराज निघून गेल्यावर गणोबा एका झाडाखालीं बसून झोंपलेला शिपाई केव्हां उठतो व गांवांत गेलेला शिपाई केव्हां येतो याची वाट पहात बसले. थोड्या वेळानें गुंगींत घोरत पडलेला शिपाई उठला. तरुण



सुटलेला पाहून तो घाबरला. गणोबांनीं पुढें येऊन त्याला विचारलें—"काय हो, तुम्ही त्या चोराला कां सोडलेंत? तो राजद्रोही आहे ना?"

"मी सोडला? तूंच सोडला असशील त्याला." घाबरून गेलेला शिपाई म्हणाला.

"उलट्या चोराच्या बोंबा? स्वतः अपराध करून माझ्यावर आळ आणतोस होय?" गणोबांनीं दरडावून विचारलें. आणखी पुढें म्हणाले—"मला सोडावयाचें होतें तर मी त्याला पकडून कां दिलें असतें? मी पाणी प्यायला गेलों होतों आणि

येऊन पाहतों तों हा पळून गेलेला. मी ह्याला पकडलें होतें ह्या गोष्टीवर आतां कोण विश्वास करणार ? तुझ्यामुळें माझें बक्षिस पण मारलें गेलें. मला असें वाटतें आहे कीं तूंच खरा राजद्रोही आहेस. त्यानें तुला लांच देऊन आपली सुटका करून घेतली असावी."

शिपाई निरुत्तर होऊन त्याच्या तोंडाकडे पाहूं लागला. म्हणाला—"मी अगदीं खरें सांगतों, मी झोंपलेला होतों. मला वाटलें कीं तुम्ही दोघं पळून गेलां आहां. मग तो स्वतःला सोडवून कसा पळून गेला ? आतां सरदार आले तर मी त्यांना काय उत्तर देऊं?"

तितक्यांत सेनापति दोघां तिघां सैनिकांना घेऊन तेथें आला. "आहे कोठें तो ?" त्यानें विचारलें—"तुम्ही त्याचें डोकें कापून मला आणून दाखविलेंत तर मी प्रत्येकाला एकेक जहागीर देईन." दोघां शिपायांना सरदार म्हणाला.

"मालक ! मी त्याला धरून दिलें होतें. विचारा पाहिजे तर या दोघांना ! मला त्या बद्दल बक्षिस मिळालें पाहिजे." गणोबा म्हणाले.

युवराज पळून गेल्याची गोष्ट जेव्हां सरदाराला कळली तेव्हां त्याला भयंकर राग



आला व तो तलवार उपसून दोघांना मारण्यास धांवला.

पण गणोबा मध्यें पडले व म्हणाले—"सरदार ! हे दोघे त्याचा पाठलाग करीत येत असलेले मी पाहिलें. म्हणून मी त्याला धरलें. दोघांनीं त्याला धरून या झाडाला बांधून ठेवलें. एक जण आपल्याला बोलवायला गेला व दुसरा लक्ष ठेवायला मला सांगून झोंपी गेला. मी बराच वेळ वाट पाहिली, आपण आला नाहीं. मला तहान लागली होती. म्हणून ओढ्यावर पाणी प्यायला गेलों होतों. येऊन पाहतों तों चोर पळालेला. झोंपलेला शिपाई तसाच झोंपलेला होता. आतां चोर कसा पळाला हें देव जाणें. खरें पाहतां या दोघांचा अपराध नाहीं."

सेनापतीनें सर्व शिपायांना युवराजाला हुडकून काढायला सांगितलें. म्हणाला—"येथेंच कोठें झाडींत लपून बसला असेल." शिपाई त्याला शोधूं लागले.

इतक्यांत युवराज दहावीस सैनिकांना बरोबर घेऊन तेथें आला व त्यानें सेनापतीला व त्याच्याबरोबर आलेल्या चौघां शिपायांना कैद केलें. युवराज राजद्रोही सेनापति व शिपाई सर्वांना धरून राजधानीकडे निघाला तेव्हां



गणोबादेखील बरोबर निघाले. सेनापतीला न्यायाधिशासमोर उभें करण्यांत आलें. तो म्हणाला—"मला या कटासंबंधानें कांहींच माहीत नाहीं. परंतु शिपायांच्या जबान्या घेण्यांत आल्या. त्यानंतर स्वत: गणोबांची साक्ष झाली. गणोबांनीं आपल्या साक्षींत 'युवराजांचें डोकें कापून आणून दाखविलें तर प्रत्येकाला एकेक जहागीर देईन' असें प्रलोभन दिलें होतें हें सांगितलें. त्याच्या आधारें सेनापतीला राजद्रोहाबद्दल फांशीची शिक्षा झाली व शिपायांनीं सेनापतीला या कामीं मदत दिली असली तरी त्यांनीं तें प्राणभयानें केलें होतें असें सांगून न्यायाधिशानें त्यांना नुसती तंबी देऊन सोडून दिलें.

गणोबांच्या मदतीनें युवराज वांचल्याची गोष्ट जेव्हां राजघराण्यांतल्या लोकांना कळली तेव्हां त्यांनीं त्या उपकाराबद्दल गणोबांचे फार फार आभार मानले व त्यांना खूप खूप बक्षिसें देऊन त्यांचा गौरव केला. युवराजानें आपल्या पदरीं नोकरी करण्यासाठीं पुष्कळ आग्रह केला. पण गणोबांनीं आई घरीं वाट पहात असेल असें सांगून निरोप घेतला. जातांना परत येऊन युवराजांचें दर्शन करीन असें वचन पण दिलें.

राजमातेनें गणोबांच्या आईसाठीं मुद्दाम कांहीं भेट म्हणून बरोबर बांधून दिली. वाटेंत चोर व भामटे त्रास देतील. सोबतीला कांहीं शिपाई पाठवितों असें युवराज म्हणाला.

"पण मला कोणाचें भय नाहीं. मी स्वत:चें रक्षण करण्यास समर्थ आहें!" असें सांगून गणोबांनीं युवराजांचा निरोप घेतला.

[पुढील अंकीं—'प्राणरक्षण']



ज्याचं त्याला






# बहीण भाऊ

डेमास्कस नगरांत अयूब नांवाच्या एका मोठ्या व्यापाऱ्याला नक्षत्रासारखीं दोन सुंदर मुलें होतीं. मुलाचें नांव गनी व मुलीचें नांव फितना असें होतें. अयूब एकाएकीं त्याच वेळीं आजारी पडला व मरण पावला. त्यानें अलोट संपत्ति मागें सोडली होती. ती त्याच्या दोघां मुलांना मिळाली. दोघं तरुण होतीं.

आपल्या वडिलांच्या दुकानांतल्या कोठा-रांत सामान पहात असतां गनीला "बगदाद" असा शिका लागलेलें कांहीं सामान दिसलें. दहा बीस गाठी होत्या. आंत जर व रेशमी कापड होतें. तें सर्व सामान घेऊन जाऊन बगदादच्या बाजारांत व्यापार कर-ण्याचा अयूबचा विचार होता. त्यांत त्याला पुष्कळ फायदा होइल अशी अशा होती. मनुष्य एक विचार करतो, पण परमेश्वराच्या मनांत दुसरेंच कांहींतरी असतें.

गनीनें विचार केला, वडिलांचें हें काम तडीस नेण्याची जबाबदारी त्याच्यावर आहे. त्यानें बहिणीचा निरोप घेतला आणि व्यापाऱ्यांच्या एका तांड्याबरोबर बगदादला निघाला. तो सुखरूप बगदादला येऊन पोंचला. त्यानें तेथें एका मोठ्या व्यापाऱ्याला साजेल असें मोठें घर भाड्यानें घेतलें. गाद्या गिर्द्या, गालीचे, पडदे वगैरे लावून घर खूप सजविलें.

नंतर त्यानें उंटावरचा माल उतरवून घरांत ठेवला व बाजारांत निघाला. त्यानें नमुन्यासाठीं प्रत्येक मालांतून थोडा थोडा माल बरोबर घेतला होता. त्यानें मालाचा नमुना दाखविल्याबरोबर बगदादचे व्यापारी त्यावर तुटून पडले व गनीनें जी मागितली ती किंमत द्यायला तयार झाले. गनीला फार आनंद झाला. या गांवांत मालाला चांगली किंमत मिळते हें त्याला कळलें व त्यानें बगदादला कायमचेंच दुकान ठेवण्याचा निश्चय केला. त्यानें सुमारें एक वर्षभर बगदादला राहून व्यापार केला व त्याला पुष्कळ फायदा झाला.

दुसऱ्या वर्षाच्या सुरवातीला तो एकदां बाजारांत गेला तेव्हां सर्व दुकानें बंद असलेलीं त्याला दिसलीं. चवकशी करतां कळलें कीं गांवांतला एक मोठा व्यापारी त्या दिवशीं वारल्यामुळें सर्व व्यापारी दुकानें बंद करून त्याला पोंचवण्यासाठीं कबरस्थानांत गेले आहेत. गनीनें विचार केला कीं आपण सुद्धां गेले पाहिजे. त्याप्रमाणें तो निघाला. वाटेंतच त्याला शवयात्रेची मिरवणूक दिसली.

कबरस्थानांत एक मोठा तंबू होता. सर्व त्या तंबूंत उभे राहाले. गनी बाजूला एका माणसाशीं बोलत एका झाडाखालीं उभा राहिला. तंबूंत मेणबत्त्या लावल्या होत्या व लोक समोर उभे राहून मृतात्म्याला शांति मिळो अशी देवाजवळ प्रार्थना करीत होते.

त्यानंतर गनीला एका गोष्टीचें आश्चर्य वाटलें, सर्व लोकांना मेजवानी देण्यांत आली.



मेजवानी झाल्यावर लोक कबरीच्या चारी बाजूला घोळका करून बसले. ही मंडळी बहुतेक रात्रभर अशीच बसून राहणार असा विचार करून गनीनें हळूच तेथून पाय काढला. त्याचें आणखी एक कारण होतें. त्याच्या घरांत तो एकटाच होता. मालकाच्या गैर हजेरींत नोकर चाकर देखील निष्काळ-जीपणानेंच वागतात. त्याला घरांत चोरी होईल कीं काय ही खरी भीति होती.

कबरस्थानापासून गांवाच्या सिंहद्वारापर्यंत पोंचेतों चांगला काळोख पडला होता. दारें बंद होऊं झाली होतीं. गांवांत प्रवेश

श्री ना. गो. देसाई

मिळणें अशक्य होतें. घरांत चोरी होईल ह्या काळजीबरोबर रात्र कशी काढावयाची या विवंचनेंत तो पडला. पण एक जुनी पडकी मशीद त्याला दिसली. तींत शिरून तो फरशीवर झोंपण्याचा प्रयत्न करूं लागला. परंतु त्या मशिदीच्या पांढऱ्या फटफटीत भिंती जणुंकांहीं चांवायला धांवत होत्या.

इतक्यांत दुरून त्याला कोणी तरी चालत येत असल्याची चाहूल लागली. त्यानें उठून पाहिलें. दोघे हबशी एक मोठी पेटी खांद्यावर घेऊन चालत होते आणि एक जण एक मशाल घेऊन वाट दाखवीत पुढें चालत होता. गनी भिंतीआड उभा राहून ते कोठें जातात व काय करतात हें पाहूं लागला. थोड्या वेळानें ते तिथे मशीदीच्या भिंतीजवळ पेटी ठेवून एक खड्डा खणूं लागले. नंतर त्यांनीं ती पेटी खड्ड्यांत पुरून टाकली आणि निघून गेले.

गनी तें दृश्य पहात होता. उजाडल्यावर तो त्या जागीं आला व त्यानें ती जागा खणून पेटी बाहेर काढली. पेटीला कुलूप होतें. पण गनीनें तें कुलूप दगडानें फोडलें व पेटी उघडली तर त्याला पेटींत एक सुंदर स्त्री बेशुद्ध स्थितींत पडून असल्याचें दिसलें.



त्याच्या पोटांत धस्स झालें. त्यानें तिच्या नाकाला हात लावून पाहिला. अजून श्वासोच्छ्वास चालू होता.

गनीनें विचार केला कीं कोणी तरी दुष्टपणानें तिचा प्राण घेण्यासाठीं तिला विष दिलें असावें व ती बेशुद्ध झाल्यावर पेटींत बंद करून तिला पुरून टाकण्याचें ठरविलें असावें.

गनीनें धीर करून तिला बाहेर काढलें व जमिनीवर ठेवलें. त्या असहाय स्थितींत त्याला ती फारच सुंदर दिसली. तिच्या अंगावर मूल्यवान वस्त्रें व आभूषणें होतीं. त्यावरून ती उच्च कुळांतली होती याविषयीं त्याला शंका उरली नाहीं.

तिला जमिनीवर ठेवल्यावर ती त्या बेशुद्ध स्थितींतच एक दोनदां शिंकली. नंतर ओकली. ओकताना तिच्या तोंडांतून एक हिरवी काळी गोळी पडलेली त्याला दिसली. ती भांगेची गोळी होती. अर्धवट बेशुद्ध स्थितींतच ती कोणातरी दासीला बोलवीत होती—"मला तहान लागली आहे. पाणी घेऊन ये. कोणी बोलत कां नाहीं?"

थोड्या वेळानें तिला शुद्ध आली. तिनें डोळे उघडून पाहिलें व मोठ्यानें ओरडली—





"अग बाई! हें काय? मी कोठें आहें? येथें तर कोणीच दिसत नाहीं."

गनी पुढें येऊन म्हणाला—"माझें नांव गनी आहे. मी बगदादचाच एक व्यापारी आहें. आपण कोण हें मला माहीत नाहीं. पण तुम्हांला भ्यायचें कारण नाहीं. तुमच्यावर एक मोठें संकट आलें होतें. ऐन वेळीं अल्लानेंच मला येथें पाठविलें."

गनीचा रूपरंग पाहून तो अनोळखी होता तरी त्या तरुणीला बोलायला थोडें धाडस वाटलें. तिनें विचारल्यावर गनीनें सर्व वृत्तांत सांगितला. म्हणाला—"अवेळीं या निर्जनस्थानीं ही एवढी मोठी पेटी खड्ड्यांत पुरून ठेवण्यांत कांहींतरी दुष्ट हेतु असावा असा मला संशय आला. म्हणूनच मी पुन्हां खड्डा खणून पेटी बाहेर काढली व बंद पेटींतून तुम्ही निघालांत."

ती तरुणी म्हणाली—"तर मग तुम्ही लवकर मला या पेटींत बंद करा व पेटी खेचरावर घालून मला आपल्या घरीं घेऊन चला. मी तेथें गेल्यावर सर्व कांहीं सांगेन."

तों पर्यंत चांगलें उजाडलें होतें. गनी एक खेचर भाड्यानें घेऊन आला व त्याच्या पाठीवर ती पेटी ठेवून निघाला. तिच्या त्या अप्रतिम सौंदर्यावर तो भाळला होता यांत शंका नाहीं. त्याच्या मनाची खात्री होती कीं तिच्याशीं लग्न झाल्यावर आपलें आयुष्य सुखी होईल.

गनीनें घरीं आल्यावर सर्व प्रकारें तिच्या आतिथ्याची सोय करून दिली. त्याच्या घरांतला श्रीमंती थाट पाहून त्या तरुणीला तो श्रीमंत व्यापारी असावा या बद्दल शंका उरली नाहीं. त्याच्या सौंदर्यावर पण ती मोहित झाली.

गनीनें घरीं आल्यावर नोकराला पाठवून खाण्यासाठीं उत्तमोत्तम फळफळावळ, मिठाई व पेयें मागविलीं. नोकर गुलाबाचीं व मोगरीचीं फुलें पण बरोबर घेऊन आला. तें सर्व पाहून तिला फार आनंद झाला व गनीवरचें प्रेम द्विगुणित झालें. जेवण झाल्यावर गनीला तिनें सर्व वृत्तांत सांगितला. म्हणाली—

"माझें नांव कूतल कुलब! माझा जन्म खलिफांच्या महालांत झाला व मी तेथेंच लहानाची मोठी झाल्यें. वयांत आल्यावर खलीफांची नजर माझ्याकडे वळली. त्यांनीं माझ्याशीं लग्न करण्याचें ठरविलें. माझ्या राहण्यासाठीं त्यांनीं एक स्वतंत्र महाल बांधून दिला. माझ्या तैनातीला सतत दहा दासी असत. वस्त्राभूषणांची माझी सर्व हौस त्यांनीं भागविली. परंतु आमच्या लग्नांत एक मोठें विघ्न आलें. खलीफांना युद्ध करण्यासाठीं परदेशीं जावें लागलें.

"खलीफांची माझ्यावर मर्जी झाल्यापासून जुबेदा बेगम यांच्या मनांत मत्सर वाढूं लागला. माझ्याकडे ज्या दासी होत्या त्यांपैकीं एक जुबेदा बेगम यांच्याकडे पूर्वी कामीं होती. जुबेदा बेगमनें तिला लांच देऊन माझा कांटा दूर करण्याचा प्रयत्न चालू केला.



"काल या दासीनें मला प्यायला म्हणून एक मादक पेय दिलें. तें प्याल्यावर मी जवळ जवळ बेशुद्धच पडलें. त्याच वेळीं तिनें ती भांगेची गोळी माझ्या तोंडांत कोंबली असावी. आतां मला आठवतें मी पुष्कळ तडफड केली. हात पाय आपटले. पण पुढें काय झालें, हें मात्र मला आठवत नाहीं. मी पूर्णपणें बेशुद्ध झाल्यावर जुबेदा बेगमनें मला त्या पेटींत घालून हबशी गुलामांकरवीं पुरून टाकलें असावें. अल्लाची कृपा म्हणूनच मी वांचल्यें. आतां खलीफा परत आल्यावर मी महालांत नाहीं

असें पाहून फार काळजींत पडतील. त्यांच्या मनांत बरे वाईट सर्व विचार येतील. कदाचित माझ्या विषयीं त्यांच्या मनांत संशय येईल. आला नाहीं तर लोक त्यांचे कान भरून देतील.

"आणखी एका गोष्टीचें मला दुःख वाटत आहे. खलीफांना आपलें मन देण्या-पूर्वी आपली भेट कां झाली नाहीं? काय करावें अगदीं सुचत नाहींसें झालें आहे मला!" बोलतां बोलतां कुतलकुलब मध्येंच थांबली.

खलीफांशीं लग्न करण्याची तिच्या मनांत इच्छा आहे, हें ऐकल्यावर गनीच्या मनांतले मनोरे ढांसळले. आपण मूर्खासारखे स्वप्नें पहात होतों. आकाशांतले तारे तोडूं पहात होतों. केवढा मूर्खपणा! आणि हें कळल्या-वर कीं, तिचें आपल्यावर देखील प्रेम आहे व वचनबद्ध असल्या कारणानें ती आपल्याशीं लग्न करूं शकत नाहीं, त्याचें दुःख जास्तच वाढलें. कुतलकुलबचा विचार मनांतून काढून टाकणें देखील त्याला शक्य राहिलें नव्हतें. पण तिच्याशीं गुपचुप लग्न करून घेऊन खलीफाला फंसविणें त्याला शक्य नव्हतें-कारण तिचें प्रेम खलीफांवर देखील होतें. आतां आपल्या असफल प्रेमाचें ओझें हृदयांत बाळगून आयुष्यभर रडण्याशिवाय दुसरा उपाय उरला नव्हता. त्यानें तिचा आदर सत्कार करण्यांत कोणत्याहि प्रकारें तिला उणीव भासूं दिली नाहीं.

दोघे बरोबर जेवायला बसत. खूप गप्पा मारीत. गनीवरचें तिचें प्रेम वाढतच गेलें व तें लपवून ठेवणें देखील तिला शक्य नव्हतें. पण गनीनें मात्र स्वतःचें मन आवरून ठेवलें.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# भितरी भागूबाई

त्या दिवशीं आजोबा बाजारांतून रेवडी घेऊन आले. सर्व मुलें "मला रेवड्या" "मला रेवड्या" असें ओरडत आजोबांना बिलगलीं. धाकटा बाळू मात्र नुसता जाऊन बिलगला. त्यानें रेवड्या मागितल्या नाहींत.

"घे ना! चांगल्या आहेत, गोड गोड! पहा तर सर्व कसे चावून चावून 'कुड्म' 'कुड्म' आवाज काढीत आहेत." आजोबा म्हणाले.

पण बाळू म्हणाला—"मला नाहीं आवडत!"

"खोटें आजोबा! रेवड्या खाल्या तर दांत पडतील अशी भीति वाटते त्याला." मुलें म्हणाली.

"असें होय!" म्हणत आजोबांनीं आराम खुर्चीत अंग टाकलें व नाकांत तपकीर कोंबली.

"एक गोष्ट सांगा, बाबा!" मुलांनीं गिला केला.

"गोष्ट! बरें सांगतों! भितऱ्या भागु-बाईची गोष्ट! काय बाळू!" आजोबा म्हणाले.

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. तो होता भितरा. त्याच्या जवळ अर्धा बिघा जमीन होती. कोणाच्या वाटेस तो जात नसे. कोणी त्याची खोडी काढली तरी तो त्याला कांहीं म्हणत नसे. कांहीं म्हटलें तर भांडण होईल व भांडण झालें तर मारामारीपर्यंत मजल येऊन पोंचेल. मारामारी झाली कीं डोकीं फुटतील, पंचनामा होईल व कोर्टांतल्या वाऱ्या सुरू होतील.

'जमीन मऊ पाहून लोक कोपरानें खणूं लागतात' अशी एक म्हण आहे. त्या

सौ. रमाबाई सोमण

न्यायाप्रमाणें प्रत्येक जण त्या शेतकऱ्याला त्रास देई व आपण कां कोणाशीं भांडावें असा विचार करून सर्व सहन करून घेई.

त्या शेतकऱ्याच्या जमिनीला लागून दुसऱ्या एका शेतकऱ्याची जमीन होती. तो तर आपल्या शेजाऱ्याचा स्वभाव खूप ओळखीत असे व मर्जी येईल तें करीत असे.

एकदां त्या गरीब स्वभावाच्या शेतकऱ्याच्या शेतांत शेजाऱ्याची म्हैस शिरली व सर्व शेत उध्वस्त करून निघून गेली. उगाच कशाला भांडण असा विचार करून तो स्वस्थ बसला.

पुढें कांहीं दिवसांनीं शेजारचा शेतकरी त्या गरीब शेतकऱ्याच्या शेतांतलें उभें पीक कापून घेऊन गेला. त्याच्या मित्र मंडळींनीं त्याला येऊन सांगितलें तेव्हां तो म्हणाला—"होतें कितीसें पीक! तेवढ्यासाठीं आपला जीव कशाला धोक्यांत घालूं?"

हळूं हळूं शेजारचा शेतकरी अगदीं बेफिकीर झाला. त्यानें एके दिवशीं त्याच्या शेतांतल्या झाडाच्या फांद्या तोडून नेल्या. तें मात्र त्या गरीब शेतकऱ्याला आवडलें नाहीं. तो म्हणाला—"कायरे बाबा! तूं मला विचारल्या शिवाय माझ्या झाडाच्या फांद्या कां तोडून नेल्यास?"

"नशीब समज! सर्व झाड मी नाहीं तोडून नेलें तुझ्या झाडाचीं मुळें माझ्या शेतांत शिरून माझ्या शेताची नासाडी करीत आहेत. त्याच्या फांद्या माझ्या शेतावर आल्या, मी तेवढ्याच तोडून घेतल्या. त्यांत काय तुझें बिघडलें?" शेजारचा शेतकरी म्हणाला.

"तुला काय वाटेल तें कर!" असें सांगून तो भित्रा शेतकरी निघून गेला. आणि पुढें कांहीं दिवसांनीं खरोखरच त्याचें झाड त्याच्या शेजाऱ्यानें कांपलें व त्याचें शेत पण बळकावलें.





# अयोध्याकांड

भरताला दुरून रामाचा आश्रम दिसला.

त्यानें वसिष्ठ मुनींना विनंती केली कीं मी पुढें जातों व आपण माता व इतर वृद्ध लोकांबरोबर यावें. सुमंत व शत्रुघ्न दोघांना बरोबर घेऊन तो पुढें निघाला. रामाच्या आश्रमाकडे जाणारी पायवाट त्याला दिसली.

रामाच्या पर्णकुटीजवळ आश्रमाच्या ईशान्य दिशेला होमकुंड व यज्ञवेदिका होती. राम आश्रमासमोर आंगणांत तपस्वी वेषांत लक्ष्मण व सीतेसह बसलेला होता. त्या वेषांत रामाला पाहून भरत स्वतःचें देहभान विसरून धांवत गेला व रामाच्या पायां पडून त्यानें आंसवांनीं रामाचे पाय धुवून काढले.

शत्रुघ्नानें पण रामाला नमस्कार केला. रामानें भरत व शत्रुघ्न दोघांना प्रेमपूर्वक आलिंगन करून दोघांचें सांत्वन केलें.

नंतर त्यानें भरतावर प्रश्नांची जणूंकांहीं झडीच लावली—"किती वाळला आहेस, ओळखत देखील नाहींस. इकडे रानांत कशाला आलास? बाबांना फार त्रास सोसावा लागला असेल नाहीं? कारण मी घरीं नाहीं व तूं देखील नाहींस. कशी आहे त्यांची प्रकृति? आणि आपल्या सर्व मातांची प्रकृति कशी काय आहे? रानांत येण्यापूर्वी राज्याची सर्व नीट व्यवस्था करून आला आहेस ना? कारण राजाचें तें पहिलें



कर्तव्य आहे. सर्व मंत्री तुला राज्यकारभार चालवायला मदत करतात ना ?"

माझा राज्याभिषेक झाला असावा, असें समजून राम हे प्रश्न विचारीत आहे, असा विचार करून भरतानें विचारलें—"दादा! थोरला भाऊ जिवंत असेपर्यंत धाकट्याला आपल्या वंशांत कोणी गादीवर बसविलें आहे का ? तूं अयोध्येला चल आणि आपल्या वंशाचा उद्धार कर. आपले बाबा देवाघरीं गेले. तुझ्या नामाचा जप करीतच त्यांनीं प्राण सोडला. ते वारले तेव्हां त्यांचा एक देखील मुलगा त्यांच्याजवळ नव्हता. तुझ्या हातानें तर्पण झाल्याशिवाय त्यांना उदक पोंचणार नाहीं. कारण शेवटपर्यंत ते तुझीच आठवण काढीत होते!"

वडिलांच्या मृत्यूचा शोक-समाचार अशा अनपेक्षित रीतीनें ऐकून राम बेशुद्ध होऊन पडला. लक्ष्मणानें धांवत जाऊन पाणी आणलें आणि रामाच्या तोंडावर शिपडलें. थोड्या वेळानें राम शुद्धीवर आला. मृत्यु-समयीं आपल्या वृद्ध पित्याची सेवा न करूं शकल्याबद्दल रामाला फार वाईट वाटलें.

आंघोळी आटोपल्यावर रामानें तर्पण करून वडिलांचें श्राद्ध केलें व सर्व पर्णकुटींत परत आले.

कांहीं वेळानें सर्वलोक येऊन पोंचले. सर्वांनीं रामलक्ष्मणास मुनिवेषांत पाहिलें. दुःखावेगामुळें कोणाच्या तोंडून शब्द उमटेना. रामानें वसिष्ठ मुनींना व मातांना प्रथम नमस्कार केला. नंतर इतर सर्व वडील-धाऱ्यांना नमस्कार केला. सीतेनें आपल्या सर्व सासवांना नमस्कार केला व सेवेला अंतरलें असें सांगून त्यांची क्षमा मागितली. कौसल्येनें सीतेला हृदयाशीं ओढून धरलें व म्हणाली—"तूं जनकराजाची मुलगी व दशरथाची सून. तुला हा वनवास सोसावा लागावा! दैवानेंच पाठ फिरवल्यावर कोण काय करणार ?"

नंतर ती सुमित्रेला म्हणाली—"पहा तुझा मुलगा पण किती वाळला आहे! पण तो खरा भाग्यवान! कारण रामाच्या सह-वासाचें व त्याची सेवा करण्याचें भाग्य त्याला एकट्यालाच लाभलें. भरत किती गुणी मुलगा आहे! तो रामाला अयोध्येला परत बोलावून घेऊन जाणार व सर्वांचें दुःख दूर होणार."

सर्वांनीं नदीवर जाऊन आंघोळी आटो-पल्या. तेथें रामानें केलेलें पिंडदान पाहून व दशरथ राजाची आठवण काढून सर्व अयोध्यावासी रडले. सर्वांनीं दशरथाचें स्मरण करून नमस्कार केला. नंतर चित्रकूट पर्वतावरचीं क्षेत्रें पहात सर्व बराच वेळ हिंडले. त्यामुळें सर्वांचीं मनें थोडीं हलकीं झालीं.

लक्ष्मणानें सर्वांच्या खाण्यापिण्याची व राहण्याची व्यवस्था करून दिली. सावकाश जेवणें खाणें आटपून विश्रांति घेतल्यावर सर्व वडाच्या झाडाखालीं एकत्र जमा झाले.

वसिष्ठ मुनींच्या शेजारीं राम व भरत बसले. मंत्री व अयोध्येचे मुख्य नागरिक पुढें बसले. आतां या सभेंत भरत काय म्हणतो याकडे सर्वांचें लक्ष होतें.



पण रामच प्रथम बोलला. म्हणाला—"भरता! वल्कल धारण करून तूं वनांत कां आलास ? मला सर्व माहीत आहे, तरी पण विचारतों."

भरत म्हणाला—"दादा! आतां मी तरी काय बोलूं ? सर्वांनीं बोलावें व मी ऐकावें अशी माझी स्थिति झाली आहे. माझ्यासाठीं माझ्या आईनें काय नाहीं केलें ! तुझ्या-सारख्या भावाला वनवास दिला व आपल्या बाबांना स्वर्गवास देऊन मला राज्याचा लाभ करून दिला. निदान तूं तरी आपल्या धाकट्या भावावर थोडी दया कर आणि

असें कांहीं बोलूं नकोस. तूं अयोध्येला परत चल. राज्याभिषेक करून घे आणि सर्वांना सुखी कर. ही प्रार्थना करण्यासाठीं मी आलों आहें व आपल्या मातांची व सर्व अयोध्यावासियांची हीच इच्छा आहे. त्यांना नकार देऊं नकोस."

असें सांगून भरतानें रामाला साष्टांग नमस्कार केला व त्याचे पाय घट्ट धरून जमिनीवर पडून राहिला.

रामानें भरताला उठवून त्याचे डोळे पुसले आणि म्हणाला—"भरता! तूं आईला असें तोडून बोललास हें बरोबर नाहीं. लहानांनीं मोठ्यांना उलट उत्तर द्यायचें नसतें किंवा त्यांचा अपमान होईल असें बोलावयाचें नसतें. तुला हें कळत नाहीं असें नाहीं. फक्त दुःखावेगानें तूं हें सर्व बोलला आहेस."

थोडा वेळ थांबून पुन्हां राम म्हणाला—"मला वडील लोकांची आज्ञा आहे कीं मी वनवास करावा. मग मी राज्य कसें करूं? तूं राज्य कर. हें सर्व बाबांसमक्ष ठरलें आहे व जगाला माहीत झालें आहे. त्यांचा शब्द मोडणें बरोबर होईल का? तूंच विचार कर. मी चवदा वर्षे रानांत राहून घरीं परत येईन व त्यानंतर पाहिजे तर राज्य करीन. बाबांच्या आज्ञेपलीकडे मला राज्याचा लोभ नाहीं."



ती रात्र तशीच गेली. दुसऱ्या दिवशीं सर्व स्नानादि आटोपून व पूजा, जप वगैरे संपवून राम होता तेथें आले. पण कोणी कांहीं बोलला नाहीं. पण भरत धीर करून म्हणाला—"तूं माझ्या मातेच्या इच्छेनें मला हें राज्य दिलेंस. मी तें तुला देत आहें. तूं त्याचा सांभाळ कर. याचा सांभाळ करण्याची शक्ति फक्त तुझ्यांतच आहे. बाबांनीं तूं युवराज म्हणून तुला राज्यव्यवस्थेचें शिक्षण पण म्हणूनच दिलें आहे. तूं राजा झाला नाहींस तर त्यांचे ते परिश्रम व्यर्थ जातील असें नाहीं का तुला वाटत?"

भरत जें बोलला तें ऐकून सर्वांना आनंद झाला. सर्वांनीं त्याची वाखाणणी केली.

रामानें भरताला उपदेश केला—"भरता! जो या जगांत जन्म घेतो त्याला मरण हें अनिवार्यच आहे. मनुष्यानें किती प्रयत्न केला तरी त्याचा मृत्युकाळ प्रत्येक क्षण जवळ येत असतो. वार्धक्य येऊन शरिरांतली शक्ति क्षीण झाल्यावर मनुष्य असहाय व परस्वाधीन होऊन जातो. तरुणपणींच मनुष्यानें जागरूक राहून या सर्वांचा विचार





करावयाचा असतो. गेलेली संधि पुन्हां हातीं येत नाहीं. मृतासाठीं किती शोक केला तरी त्यापासून विशेष लाभ होत नाहीं. आपल्या बाबांनीं अनेक पुण्य-कार्यें केलीं आहेत. त्यांच्या आज्ञेप्रमाणें तूं त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून राज्य करावें आणि त्यांच्याच आज्ञेप्रमाणें मी वनवासास जावें हें आपलें दोघांचें कर्तव्य होय !"

तें सर्व ऐकून भरत म्हणाला—"मी कर्तव्यधर्माचा विचार करून मातेला दोष दिला नाहीं किंवा बाबांची निंदा करीत नाहीं. परंतु तूंच विचार कर व मला सांग, बाबांनीं, माझ्या आईनें जीव देईन असें धमकावून सांगितल्यामुळेंच तुला वनवास दिला व मला राज्य दिलें, हें तरी बरोबर केलें का ? वडिलांच्या हातून नकळत ही जी चूक झाली त्याचें पाप त्यांना भोगावें लागूं नये या साठीं अन्याय कार्य न होऊं देणें हें देखील मुलाचें कर्तव्य नाहीं का ?"

पण राम का हा तर्क कबूल करणार ? तो म्हणाला—"भरता ! तुला माहीत नाहीं, तुझ्या आईशीं ज्यावेळीं बाबांचा विवाह झाला होता त्यावेळीं कैकेय राजाला बाबांनीं वचन दिलें होतें कीं त्यांच्या मागें भरतालाच राज्य मिळेल. तुझ्या आईनें त्याची आठवण करून देऊन बाबांकडून त्या वचनाचें पालन करविलें असें नाहीं का तुला वाटत ?"

तेव्हां जाबाली ऋषि म्हणाले—"अरे, कोण बाप आणि कोण पुत्र ! आपल्या पितरांसाठीं श्राद्ध तर्पण करणारे सर्व माझ्या मतें मूर्ख आहेत. जा आणि खुशाल राज्य कर ! प्रत्येक जण आपल्या पाप पुण्याप्रमाणें जगांत जन्म घेतो व त्यांप्रमाणेंच जगांत सुखी किंवा दुःखी होतो. एकटाच या जगांत येतो व एकटाच जातो. हें जग

म्हणजे एक पडाव आहे. कांहीं वेळ येथें मनुष्याला थांबावें लागतें. एवढेंच खरें आहे व बाकी सर्व मिथ्या !"

"पण आपण हें सर्व नास्तिकासारखें बोलत आहां ! आपण नास्तिक असाल असें मला किंवा बाबांना स्वप्नांत देखील कधीं वाटलें नाहीं." राम म्हणाला.

वसिष्ठ त्यावर म्हणाले—"राम ! जावाली नास्तिक नाहींत. तूं राज्याभिषेकाला कबूल व्हावें या साठीं ते हें सर्व म्हणाले." नंतर वसिष्ठ ऋषींनीं देखील रामाला राज्याभिषेक करून घ्यायला सांगितला. पण रामानें आपला निश्चय सोडला नाहीं.

तेव्हां भरत सुमंत्राला म्हणाला—"दुर्वा आणून रामाच्या पर्णकुटीच्या दारासमोर आणून टाका. मी त्यावर बसून रामाला अयोध्येला नेण्यासाठीं आमरण उपवास करतों."

"काय करूं रामा ?" सुमंत्रांनीं रामालाच विचारलें. तेव्हां भरत स्वतःच उठला व दुर्वा तोडून आणून त्यानें रामाच्या पर्णकुटी समोर घातल्या व त्यावर पडून राहिला.

"तें सर्व पाहून राम स्मित करून म्हणाला—"भरता ! तुला हें शोभत नाहीं. तूं क्षत्रिय आहेस. कोणाला कर्ज देऊन तें वसूल न झालें तर त्यासाठीं असलें काम कोणी असहाय व हताश झालेला ब्राह्मण करील. तूं ऊठ आणि अयोध्येला जाऊन राज्य कर !"

भरत उठला नाहीं. सर्व लोकांना उद्देश्यून म्हणाला—"तुम्ही सर्व गप्प कां ? रामाला कां नाहीं सांगत ?"

"पितृआज्ञेचें मी पालन करीत आहें असें राम म्हणत असतां आम्ही तरी काय बोलणार ?" एक वृद्ध नागरिक म्हणाला.



# चीन देशाची भिंत

ही चीन देशाच्या उत्तरेला एक जुनी किल्लावजा भिंत आहे. ह्या भिंतीची लांबी १,४०० मैल, उंची २० ते ३५ फूट व रुंदी १० ते १२ फूट आहे. शिह्वांग नांवाच्या एका चीनी चक्रवर्तीनें इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकांत ही बांधविली.



होति शुद्धिपण कांपत होतें
थरथर त्याचें सारें अंग।
अरुण मुखाचा त्याच्या झाला
फक पांढरा होता रंग॥

उभा राहिला कसा तरी मग
दिधला पत्नीनें त्या हात।
तेजहीन तो झाला पाहुनि
वदली–"झाला अपुला घात!"

अग्नि निघाला हलबल होउनि
शिवगण आनंदित झाले।
उभा पडका होता त्याचे
केस उपटले जे कुरळे॥

थोडुं लागले शेपुट पाडुनि
पळूं लागला गरीब तो।
जीव वांचला त्याचा, कारण
दूर पोंचला होता तो॥

देवलोकिं जाउनी अग्निनें
सांगितला सारा वृत्तांत।
ब्रह्मदेव वदला–"हे अग्नी!
भ्यालासी तूं वृथा मनांत!

"एक सांगतों, समजुन घे तूं
शक्ति शिवाला असती दोन,–
गंगेजवळी एक नि दुसरी
जवळि तुझ्या, ह्या दोनच दोन॥

"युक्ति सुचवितों कर तूं तैसें,
उपाय एकच हा असतां।
जिथें वाहते भागीरथि, जा
वेळ वृथा ना घालवितां॥

"तुझ्या जवळच्या शिवशक्तीला
गंगेमध्यें दे टाकून।
काय काय त्यानंतर घडतें
सांग येउनी तें पाहून॥






[ ६ ]

[ब्रह्मदंडी मांत्रिकाचा शिष्य जयमल याच्याबरोबर लखूनें हस्ती सरोवरांत आंघोळ केली. परत येतांना जयमलनें लखूला मांत्रिकामुळें त्याच्यावर येणाऱ्या संकटाची कल्पना करून दिली. दोघे गुहेजवळ पोंचत असतां ब्रह्मदंडीनें त्यांना ओरडून समिधा घेऊन यायला सांगितलें. पुढें वाचा]

त्याचा काय विचार असेल ? काळ भैरवाला भूक लागली आहे म्हणजे तो कोणाचा तरी बळी देणार! ब्रह्मदंडी त्यांच्याकडे पाहून हंसला होता. तो असेंहि म्हणाला होता कीं काळभैरवाला भूक लागली आहे. तें ऐकून लखू घाबरून गेला होता. त्याला वाटलें कीं, कदाचित मांत्रिकानें दोघांचें बोलणें ऐकलें असावें. या जगांत आतां किती दिवस रहायला मिळतें हें चारपांच तासांतच ठरणार आहे.

लखू या सर्व गोष्टींचा विचार करीत जयमलबरोबर झाडाखालीं समिधा गोळा करीत होता. दोघांनीं दोन मोठ्या मोळ्या करून डोक्यावर उचलून घेतल्या आणि मांत्रिकाच्या गुहेकडे दोघे निघाले. दोघे गुहेजवळ येऊं लागले तसतसा मांत्रि-



काच्या मंत्रजापाचा आवाज मोठमोठा होऊं लागला. जयमल व लखूनें आपापली मोळी गुहेसमोर टाकली आणि गुपचूप गुहेंत प्रवेश केला.

ब्रह्मदंडी मांत्रिक काळभैरवाच्या मूर्ती-समोर पद्मासन घालून बसला होता व जोर जोरानें मंत्र म्हणत मधून मधून त्या मूर्तीवर दगड फेंकीत होता,—गणेशचतुर्थीला गणपती-वर फुलें आणि पत्री वाहतात तसें. तें पाहून लखूला आश्चर्य वाटलें. ही काय पूजा झाली? असें खुणावून त्यानें जयमलला विचारलें. त्यानें खुणेनें हें देखील विचारलें—“हा काय प्रकार आहे?" पण जयमलनें नाकावर बोट ठेवून वजावून सांगितलें. एक शब्द देखील बोलूं नकोस.

इकडे ब्रह्मदंडी काळभैरवाला प्रसन्न करण्यासाठीं त्याच्यावर दगड आणि गोटे यांचा वर्षाव करीत होता व तिकडे मल्लपुरांत राजा व प्रजा या काळजींत पडले होते कीं केव्हां आणि कोठून शत्रुसैन्य चालून येतें आहे. राजा व मंत्री यांना वाटत होतें कीं शत्रु सैन्याची जमवाजमव डोंगरावर करीत असावा. म्हणून त्यांनीं डोंगरावर काय होत आहे हें पाहून येण्यासाठीं व टेहेळणीसाठीं थोडें सैन्य पाठविलें होतें. जर शत्रुसैन्य येतांचें असेल तर तें कापून काढण्यांत यावें अशी आज्ञा पण त्या सैन्याला देण्यांत आली होती. परंतु ह्या सैन्यानें डोंगराळ प्रदेशांत पाऊल टाकल्याबरोबर भूकंपासारखा सर्व डोंगर हादरला व अर्धें अधिक सैन्य दग-डांच्या वर्षावाखालीं चिरडून गेलें. उरलेल्या सैनिकांनीं येऊन डोंगराविषयीं त्यांच्या डोक्यांत ज्या ज्या कल्पना आल्या, येऊन त्यांचें वर्णन सांगितलें.

एका गुप्त जागीं राजा आपला मंत्री, सेनापति व नवीन नेमलेले राजगुरु यांच्यासह बसून गुप्त मंत्रणा करीत होता. सेनापति व मंत्री यांचें म्हणणें ऐकून घेतल्यावर राजा राजगुरूला म्हणाला—“आपण सर्व ऐकलेंच आहे. सैनिकांच्या बोलण्यावर कितपत विश्वास करावा हें कळत नाहीं. म्हणे, डोंगरावर सैन्य आहे. असें देखील कांहीं जण म्हणाले कीं डोंगरांत एक मांत्रिक राहतो. तो अंगाला रक्त फासून बसतो!"

राजगुरूनें सर्व कांहीं शांतपणें ऐकून घेतलें व म्हणाला—“दोन्ही गोष्टी बरोबर असूं शकतील असें कां समजूं नये?"

“म्हणजे मांत्रिकाचें शत्रुसैन्याशीं संग-नमत असेल असें वाटतें का आपणांला?" राजानें प्रश्न केला.

“हें बरोबर आहे कीं तें, हें मी निश्चितपणें सांगूं शकेन कीं नाहीं, मला स्वतःलाच शंका आहे. परंतु एवढें मात्र निश्चित सांगतां येईल कीं जे सैनिक त्या डोंगराळ प्रदेशांत हिंडून आले आहेत त्यांचीं डोकीं ठिकाणावर नाहींत. कारण कांहीं सैनिक असें देखील म्हणाले कीं मांत्रिकानेंच भूकंप करविला होता. आणि त्या डोंगरांत विलक्षण रानटी जनावरेंपण आहेत म्हणें." राजगुरु म्हणाला.



“तशीं रानटीं जनावरें नसतील असें वाटतें का आपल्याला? प्रथम माझासुद्धां विश्वास बसत नव्हता. परंतु या मांत्रिकाची गोष्ट ऐकल्यापासून मात्र...." बोलतां बोलतां मंत्री मध्येंच थांबला. “मंत्री! मी देखील थोडाफार मंत्रशास्त्राचा अभ्यास केला आहे!" राजगुरु थोडा रागानेंच म्हणाला.

“गुरुवर! एवढ्यासाठींच तर आपल्याला बोलाविलें आहे. आपल्या मदतीशिवाय आम्ही तरी काय करूं शकणार!" राजा राजगुरूला समजावून सांगण्यासाठीं म्हणून नम्रपणें म्हणाला.




"नुसता अंदाज लावून अनुमानानें सांगितलेल्या गोष्टींवर कसा विश्वास करावयाचा! महाराजांनीं स्वतःच्या अंगरक्षकाबरोबर दोघांतिघां सैनिकांना पाठवून डोंगराळ प्रदेशांतल्या परिस्थितीचें अध्ययन करून यायला त्यांना सांगावें, व त्यांच्या कडून जी माहिती मिळेल त्याच्या आधारें पुढें जें कांहीं करावयाचें असेल तें ठरवितां येईल!" असें सांगून राजगुरु तेथून रागारागानें उठून निघून गेला.

राजाच्या आज्ञेनें त्याचा अंगरक्षक सैनिकांबरोबर डोंगराळ प्रदेशाची माहिती काढण्यासाठीं निघाला. ते डोंगराच्या पायथ्याशीं येऊन पोंचले.

समोर डोंगर उभा होता. भूकंप होऊन गेल्यामुळें त्याच्याकडे पाहणाऱ्याला भीतिच वाटत होती. दगडावर दगडांचा ढीग असल्याकारणानें सर्व दृश्य जास्तच भयंकर दिसत होतें. अंगरक्षकाची घोड्यावरून उतरण्याची छातीच होईना. बरोबरच्या सैनिकांची गाळण उडून गेली होती.

"तुमच्यापैकीं कोणी पूर्वीं या डोंगरावर चढून गेला आहे का? या डोंगराळ प्रदेशाची माहिती असणारा कोणी आपल्याबरोबर असता तर बरें झालें असतें!" राजाचा अंगरक्षक दोघां सैनिकांना म्हणाला.

दोघां सैनिकांपैकीं एकजण पूर्वीं तो डोंगर चढून आला होता. पण शत्रु सैन्याविषयींच्या बातम्या, विक्षिप्त रानटी बनाबरांच्या आणि मांत्रिकाच्या गोष्टी ऐकल्यानंतर त्याचें पाऊल पुढेंच पडेना. त्याची आठवण झाल्यावर तर त्याच्या सर्व अंगावर शहारेच उभे राहिले. तो म्हणाला—

"मालक! त्या डोंगरावर कांहीं पाहण्यासारखें नाहीं, मी निश्चितपणें सांगूं शकतों. समजा, वर शत्रूचें सैन्य जर असेल किंवा



मांत्रिक असेल तर त्यांच्याविषयीं परत जाऊन सांगायला आपण जिवंत परत येऊं कीं नाहीं ह्याची मला शंका वाटते आणि डोंगरावर कोणीच नसेल तर, मग डोंगर चढून जाणें देखील फुकट आहे." सैनिक म्हणाला.

अंगरक्षकाला त्या सैनिकाचा तर्क पटला. त्यानें विचार केला कीं परत जाऊन डोंगरावर कोणी नाहीं असें सांगितलें कीं झालों मोकळे. पण एक शंका मनांत राहून गेली. बरोबरच्या सैनिकांचा काय विश्वास ? जर का दोघांनीं किंवा दोघांपैकीं एकानें राजाची कृपा संपादन करून घेण्यासाठीं, डोंगरावर चढून आम्ही गेलोंच नाहीं असें सांगितलें तर ! छे, तें कांहीं उपयोगी नाहीं. डोंगरावर चढून तेथें कोणी आहे कीं नाहीं हें पाहून खात्री करून घेतलीच पाहिजे. मरण आलेंच तर शत्रूशीं युद्ध करीत मेल्यामुळें स्वर्ग मिळेल आणि जर जिवंत परत राजधानींत गेलों तर राजाकडून बक्षिस मिळेल. कोणी वाट दाखवणारा भेटेल तर !

अंगरक्षक व सैनिक ज्या झाडाखालीं उभे राहून बोलत होते, त्या झाडावर लखूचा बाप लपून बसला होता. मुलगा त्या विक्षिप्त प्राण्याच्या पाठीवर बसून निघून गेला तेव्हां पासून तो येथें बसून डोंगरावर व दरींत घडणारी प्रत्येक गोष्ट पहात होता. मांत्रिकाचें गुहेंतून आंत बाहेर जाणें येणें, लखूची एका तरुणाशीं मैत्री, ब्रह्मपुराच्या सैन्याची स्वारी, भूकंप वगैरे गोष्टी त्यानें पाहिल्या होत्या.

त्या मांत्रिकाच्या तावडींतून मुलाची सुटका कशी होते या काळजींत तो पडला होता. एकट्यानें तेथवर जाण्याचें साहस त्याच्याकडून होत नव्हतें. झाडावर बसून अंगरक्षक व सैनिकांचा परस्परांशीं झालेला संवाद त्यानें ऐकला होता. यांना आपण मदत केली तर आपलें कामदेखील अनायासें होईल असा विचार करून तो हळूच झाडावरून खालीं उतरला आणि दुसऱ्या एका झाडाखालीं बसून झोपेंत घरळतात तसा घरळूं लागला. अंगरक्षक व राजाच्या सैनिकांनीं तें ऐकलें व घाबरूनच गेले. त्यांनीं वळून पाहिलें, तेव्हां त्यांना झाडाखालीं म्हातारा दिसला.

"मांत्रिक हाच तर नसेल ! ह्याची लांब दाढी पहा ! स्वारी घोरत पडली आहे. याची मान उडवून मोकळे होऊं या !" अंगरक्षकानें असें म्हणत तलवार उपसली.

तें ऐकून म्हातारा अंगडाई आल्यासारखें करून डोळे उघडून त्यांच्याकडे पाहूं लागला. त्याच्या वागण्यावरून अंगरक्षकाला वाटलें कीं हा मांत्रिक नसावा. त्यानें तलवार म्यानेंत ठेवली व जवळ येऊन विचारूं लागला— "कोण तूं ? काय काम आहे तुझें येथें ?"

म्हाताऱ्यानें उत्तर देण्यापूर्वीच एक सैनिक म्हणाला—"शत्रूचा सैनिक किंवा हेर असावा !" "मालक ! मी शत्रुसैनिक नाहीं किंवा हेरपण नाहीं. मी रानांत राहतों व कंदमुळें खाऊन आपली उपजीविका करतों." म्हातारा म्हणाला.

"तसें असेल तर तुझ्या केसाला देखील धक्का लागणार नाहीं. मी ब्रह्मपूरच्या राजाचा



अंगरक्षक आहें. मी तुला आश्वासन देतों. येथें कोणी शत्रु असेल तर त्याचा नायनाट करण्यासाठीं मी आलों आहें. तुला या डोंगरावरच्या वाटा माहिती आहेत का ?" अंगरक्षकानें विचारलें.

"या सर्व माझ्या पायाखालच्या वाटा आहेत. डोळे मिटून अगर काळोख्या रात्रीं देखील तुम्ही सांगाल तेथें बिनचूक जाऊं शकेन." म्हातारा म्हणाला.

"आम्हांला अशाच वाटाड्याची गरज होती. तर मग हो पुढें आणि चल बघूं ! तूं इकडे रानांत राहतोस म्हणून. नाहींतर

मी राजाला सांगून मोठें इनाम देववलें असतें तुला ! मग येतोस ना वाट दाखवायला ?" अंगरक्षकानें विचारलें.

पण म्हाताऱ्याच्या कानावर त्यांतला एक देखील शब्द पडला असेलसें दिसत नव्हतें. कारण तो त्यावेळीं दुसऱ्याच एका विचारांत मग्न झालेला होता. या अंगरक्षकाला मदत करतां आली तर आपल्या मुलाला सोडवून घेऊन यायला कांहीं तरी मार्ग निघेल, असा विचार करून तो "या !" असें म्हणून आपली तलवार उपसून घाटी चढूं लागला.

अंगरक्षकानें त्याची ती तलवार पाहून चकित होऊन त्याला विचारलें—"रानांत राहून कंदमुळें खाणाऱ्याला ही तलवार कशाला हो ?" "मी देखील एक जुना सैनिक आहें. मी बब्रुपुराच्या राजाच्या पदरीं, म्हणजे या राजाच्या बापाच्या पदरीं नोकरी केली आहे. तेव्हांपासून माझ्या कमरेला ही तलवार आहे." म्हातारा अभिमानानें म्हणाला.

तें ऐकून सैनिक व अंगरक्षक थोडे चपापले. अंगरक्षक हळूच आपल्या सैनिकांना म्हणाला—"कांहीं भ्यायचें कारण नाहीं. यानें विश्वासघात केला तर ही तलवार त्याच्या छातींत आरपार जाईल ! तुम्ही भिऊं नका. आपण पाठीमागून त्याच्यावर आपली नजर सारखी ठेवली म्हणजे पुरें आहे."

म्हाताऱ्याच्या कानावर ते शब्द पडले. पण त्यानें कांहींच ऐकूं आलें नाहीं असें वर-करणी दाखविलें. संशय येऊं नये म्हणून त्यानें मागें वळून देखील पाहिलें नाहीं. निमूटपणें डोंगर चढत राहिला.

(पुढें चालू)





# गुणी गणोबा

राजानें दिलेल्या हजार मोहोरांची थैली घेऊन गणोबा आपल्या गांवीं निघाला. तो ज्या वाटेनें जात होता ती वाट एका रानांतून जात होती. तो एका टेकडीजवळ वळणावरून जात असतां समोर एका झाडाला एक तरुण गळ्याला फांशी लावून घेण्याच्या बेतांत त्याला दिसला. त्याच्या अंगांत नवे कपडे होते. गणोबांनीं दोरी कापून टाकली आणि त्या तरुणाला विचारलें—

"भल्या गृहस्था ! तुला वेडबीड तर नाहीं लागलें ? जिवावर एवढा उदार कां झालास ? तुला माझ्या मदतीची गरज असेल तर सांग !"

तें ऐकून तो तरुण म्हणाला—"मला या आयुष्याचा वीट आला आहे. गांवच्या लोकांसमोर उजळ माथ्यानें हिंडणें देखील मला अशक्य आहे. आज कमींत कमी शंभर मोहोरा मला मिळतील तर मला बायकोला तोंड दाखविणें शक्य आहे. पण मला शंभर मोहोरा कोण देणार ?" असें सांगून तो रडूं लागला.

गणोबांनीं त्याला धीर दिला व म्हणाले—तूं या साध्या गोष्टीसाठीं आत्महत्येला तयार झालास ? मी देतों तुला शंभर मोहोरा. तुझ्यावरचें संकट टळलें तर मला आनंदच होईल. हा घे शंभर मोहोरा आणि जा घरीं ! सुखानें संसार कर !" असें सांगून गणोबांनीं त्याला शंभर मोहोरा दिल्या.

तो तरुण त्या मोहोरा घेऊन पळाला. त्याला पळत असलेला पाहून गणोबांना आश्चर्य वाटलें. हा असो पळतो कां चोरासारखा ?




तेवढ्यांत गणोबांना दूर एका जागीं एक लहानसें गाठोडें दिसलें. तें गाठोडें त्या तरुणाचें असावें व स्वारी घाईंत विसरून गेली असावी असा विचार करून गणोबांनीं तें गाठोडें सोडून पाहिलें. त्या तरुणानें अंगांत घातले होते अगदीं तसलेच नवे कपडे त्या गाठोड्यांत होते. गणोबांनीं ते कपडे अंगांत घातले व आपले कपडे गाठोड्यांत बांधून घेतले आणि निघाले.

ज्या तरुणाचें नांव रघुनाथ असें होतें. दुर्दैवानें त्याला वाईट संगत लागली व वडिलोपार्जित सर्व धनदौलत जुगार व दारू या दोन व्यसनांत तो घालवून बसला. रघुनाथाचें लग्न पांच वर्षांपूर्वी झालें होतें, पण बायको माहेरींच होती. सासऱ्यानें निरोपावर निरोप पाठविले कीं बायकोला घेऊन जावें. बायकोला घेऊन आला नाहीं म्हणून गांवचे लोक हंसत होते.

ज्या लोकांनीं कर्ज दिलें होतें त्यांनीं फिर्याद केली आणि गहाण पडलेलें घर लिलाव होण्यापर्यंत मजल आली होती. या संकटांतून त्याला कांहीं तोड सुचत नव्हती. त्याच्या आईला त्यानें काढलेल्या कर्जाची कल्पना देखील नव्हती. म्हणून तिनें मुलाला रागें भरून बायकोला घेऊन येण्यासाठीं पाठविलें.

सासुरवाडी, जांवयाचा मान व्हावयास पाहिजे तसाच झाला. त्याला नवीन धोतर जोडी मिळाली. सासऱ्यानें आग्रह करून चार आठ दिवस ठेवून घेतलें. आठव्या दिवशीं मुलीची पाठवणी झाली. दोघं नवरा बायको आपल्या गांवीं निघालीं. संध्याकाळची वेळ होती. काळोख पडूं लागला होता. दोघं एका झाडाखालीं चादर अंथरून झोंपीं गेलीं. बायकोचा डोळा लागल्याबरोबर रघुनाथ उठला व टेकडीच्या आड एका झाडाला दोरी बांधून फांस गळ्यांत घातला मात्र, गणोबांनीं येऊन दोरी तोडून टाकली. जणूं देवानेंच गणोबांना तिकडे पाठविलें होतें.

रघुनाथाला भय वाटत होतें कीं गणोबा शंभर मोहोरा कदाचित परत मागतील. आणखी एक दुष्ट विचार त्याच्या मनांत आला. गणोबांनीं दिलेल्या शंभर मोहोरा फक्त घर सोडवून घेण्याला उपयोगी पडतील. पण पुढें संसार चालवायला हातांत पैसे कोठें आहेत? म्हणून त्यानें गणोबांची थैलीच उडवण्याचा विचार केला.

त्या प्रमाणें रघुनाथ एक दगड घेऊन गणोबांच्या वाटेवर झाडाआड लपून बसला. गणोबा आल्यावर त्यानें पाठी मागून दगड मारला. गणोबा बेशुद्ध होऊन जमिनीवर पडले. रघुनाथानें त्यांची थैली उचलली व मोहरा काढून घेऊन पळून गेला.

त्याला वाटलें कीं आतां बायको झोंपली आहे तिकडे परत जावें व बायकोला बरोबर घेऊन घरीं जावें. आजपर्यंत मूर्खपणा केला तो आतां पुरे झाला. या पुढें जुगारीला व दारूला राम राम ठोकावयाचा. त्यानें एक दुष्कर्म केलें खरें, पण त्याला ही सद्बुद्धि आली.



त्याला वाटलें, बायको पुन्हां माहेरी तर गेली नसेल? कारण तो उठून घेऊन बराच वेळ झाला होता. पुन्हां एक विचार आला, आतां आपल्या हातांत दगड पैसा आहे. बाजारांत जाऊन दोन नवीन दागिने कां घेऊन येऊं नये? ते घेऊन पुन्हां बायकोच्या माहेरी जाऊं व हे दागिने देऊन तिची सम-जूत घालत तिला परत बोलावून घेऊन येऊं.

रघुनाथ बाजारांत पोंचला तेव्हां छान उजाडलें होतें. दुकानें उघडली होतीं. एका सराफ्याच्या दुकानांत जाऊन त्यानें निरनिराळे दागिने पहावयास सुरवात केली. परंतु

रघुनाथानें दिलेल्या मोहोरा पाहून व त्यावर राजाची मुद्रा पाहून सराफयाला थोडा संशय आला. त्यानें नोकराकरवीं ठाण्यावर ती बातमी पोंचती केली व रघुनाथाला गप्पां-मध्यें गुंतवून ठेवला.

शिपायांनीं येऊन रघुनाथाला संशयावरून कैद केलें व त्याला राजासमोर हजर केलें. राजानें आपली थैली व मोहोरा ओळखल्या. बरोबर एक हजार होत्या. बिचारा रघुनाथ एक मोहोर देखील खर्च करूं शकला नव्हता.

"तुला ही थैली कोठें मिळाली?" राजानें दरडावून विचारलें. रघुनाथ गणोबांना ओळखत नव्हता. म्हणाला—"एका उदार दानी माणसानें दिली." "कां दिली?" म्हणून विचारतां त्याच्याजवळ उत्तर नव्हतें.

"कोठला राहणारा तूं?" म्हणून विचारतां रघुनाथानें खोटा पत्ता सांगितला. त्या गांवच्या चार चौघांची ओळख विचारली असतां रघुनाथ निरुत्तर झाला. संशय पक्का झाला. राजानें पुरी चवकशी होईपर्यंत रघुनाथाला कैदेंतच ठेवायला सांगितलें आणि गणोबा सुखरूप घरीं पोंचले कीं नाहीं याची चवकशी करून येण्यासाठीं राजानें शिपाई पाठविले.



इकडे रघुनाथाची बायको जानकी नवरा उठून निघून गेल्यावर थोड्या वेळानें जागी झाली. पण तिच्या नवऱ्यानें अनुमान केल्या-प्रमाणें ती माहेरी गेली नाहीं. ती सासरी निघाली होती व सासरीच जाण्याचें तिनें मनाशीं पक्कें ठरविलें होतें. माहेरी गेली तर लोक विचारतील कीं नवरा कोठें गेला? मग उत्तर काय द्यावयाचें? तिला खालीं पहावें लागेल. येणाऱ्या जाणाऱ्याला विचारून सासरच्या गांवीं जाण्याचें ठरवून ती निघाली.

थोडें अंतर चालत गेल्यावर तिला गणोबा बेशुद्ध होऊन पडलेले दिसले. त्यांचें तोंड रक्तबंबाळ झालें होतें व त्यांच्या अंगांत तिच्या माहेरच्या लोकांनीं दिलेलेच कपडे पाहून तिला वाटलें कीं तो तिचाच पति असावा. तिनें आपल्या नवऱ्याला नीट पाहिलें तरी कोठें होतें? रंगा रूपानें गणोबामध्यें तिला विशेष फरक दिसला नाहीं.

कोणी तरी आपल्या पतीलाच मारहाण केली असावी असा विचार करून तिनें पाणी शिंपडून तोंडावरचें रक्त पुसून काढलें. गणोबा शुद्धीवर आले व डोक्याला हात लावून पाहिला तर एक मोठें टेंगूळ. हाताला





थोडें रक्त पण लागलें होतें. त्याच वेळीं त्याला दूर जानकी पाठमोरी उभी असलेली दिसली. तिनेंच त्याच्या तोंडावर पाणी शिंपडलें व त्याची सेवाशुश्रूषा केली हें कळायला त्याला फारसा वेळ लागला नाहीं.

त्याची थैली नाहींशी झालेली होती. त्यानें तिला विचारलें—"माझी थैली दिसली का बाई तुम्हांला?" पण जानकी लाजेमुळें तोंड फिरवून कांहींच बोलली नाहीं.

गणोबा उठून उभे राहाले, अंगा कपड्यावरची धूळ झाडून टाकली आणि आपल्या गांवीं निघाले. जानकी देखील त्याच्या पाठोपाठ निघाली. गणोबांनीं मागें वळून पाहिलें व विचारलें—

"कोण तुम्ही? तुमच्याबरोबर दुसरें कोणी नाहीं का? कोठें जायचें आहे तुम्हांला?" पण उत्तर न आलेलें पाहून त्यानें विचारलें—"पाहिजे तर तुम्हांला तुमच्या घरीं पोंचवायला मी येतों बरोबर?"

जानकीला वाटलें कीं डोक्याला जबर जखम लागल्यामुळें पतीला स्वतःची शुद्ध राहाली नसेल म्हणून ती म्हणाली—"आणखी कोण माझ्याबरोबर येणार? आणि मी आणखी कोठें जाणार?"

गणोबांना जानकी काय बोलते आहे, याचा उलगडा होईना. ते निस्संकोच म्हणाले—"मी आपल्या घरीं चाललों आहें. तुम्हांला हरकत नसेल तर या. माझी आई सर्व चवकशी करून तुम्हांला तुमच्या घरीं पोंचती करील."

तरी जानकीला गणोबा आपले पति नाहींत हें कळलें नाहीं. ती त्यांच्या पाठोपाठ गणोबांच्या घरीं आली. गणोबांची आई मुलाची वाटच पहात होती. तिनें जानकीला पाहून प्रथम तिच्या विषयींच चवकशी केली.



गणोबा आईला सांगूं लागले—"आई! ह्या बाई कोण हें मला माहीत नाहीं. वाटेंत मला भेटली. एकटी आहे असें वाटतें. माझ्याबरोबर आली आहे. रानांत तिला एकटीला सोडून येणें बरोबर दिसलें नाहीं म्हणून घेऊन आलों. तिला विचारलें तर लाजेनें तोंड फिरवून उभी राहते व कांहीं बोलत नाहीं. तूंच तिला विचारून तिची सर्व चवकशी कर. तिच्या घरीं तिला आपण पोंचवूं या!"

नंतर गणोबांनीं गुरुगृहीं त्यांनीं जो विद्याभ्यास केला होता त्याचें वर्णन सांगून एका राजकुमाराचें त्यानें कसें रक्षण केलें, वाटेंत आत्महत्या करणाऱ्या एका तरुणाला वांचवून त्याला शंभर मोहोरा देऊन कसा उपकार केला व शेवटीं चोरानें दगड मारून थैली कशी चोरून नेली हें सांगितलें.

जानकी भिंतीआड उभी राहून सर्व ऐकत होती. तिला आतां कळलें कीं गणोबा तिचा नवरा नाहीं. तो आत्महत्येचा प्रयत्न तिच्या नवऱ्यानेंच तर केला नसेल? त्याचें रक्षण करून गणोबांनीं त्याला शंभर मोहोरा पण दिल्या होत्या. नवरा कोठें गेला हें कळायला मार्ग नव्हता.



इतक्यांत राजाचे शिपाई चवकशीसाठीं आले. त्यांनीं गणोबांना सांगितलें कीं माल-मुद्दलासकट चोर पकडला आहे. गणोबा म्हणाले कीं माझी थैली चोरीला गेली खरी, पण त्यांत नऊशें मोहराच होत्या. कारण हजार मोहोरांपैकीं शंभर मी एका तरुणाला दिल्या होत्या. त्यांनीं अंगांत घातलेले कपडे दाखविले व म्हणाले—"बहुतेक हे कपडे त्याचेच असावेत." शिपाई म्हणाले—"अगदीं असेच कपडे चोराच्या अंगांत आहेत."

गणोबांना तेव्हां कळलें कीं ज्याला त्यांनीं शंभर मोहोरा दिल्या होत्या त्यानेंच शेवटीं

असा वात केला. आपल्याच पतीनें परोपकारी गणोबांचा अपकार केल्याचें ऐकून जानकी रडूं लागली व गणोबांच्या पायां पडून पतीला माफ करण्यासाठीं विनंति केली.

गणोबांनीं तिला धीर दिला व शिपायांबरोबर ते राजदरबारीं गेले. कैदेंत पडलेल्या रघुनाथाला त्यांनीं ओळखलें. रघुनाथानें केलेल्या अपराधाबद्दल पश्चात्ताप व्यक्त करून माफी मागितली. म्हणाला—"मी आपल्या मूर्खपणानें आपलें सर्वस्व घालवून बसलों व शेवटीं आपल्या उपकारकर्त्याचा घात करायला तयार झालों. हें सर्व माझ्या कृतकर्माचें फळ होय."

गणोबांनीं रघुनाथाच्या वतीनें राजाजवळ विनंति केली कीं त्या तरुणाला माफ करण्यांत यावें व जरूर असेल तर त्याच्या ऐवजीं ते स्वत: तुरुंगवास भोगायला तयार आहेत. त्याची बायको किती गुणी आहे? बिचारी पहिल्यानेंच माहेरून सासरीं येत होती व पतीच्या चुकीमुळें तिला दुःख सहन करावें लागणार होतें. तिचें आयुष्य सुखी व्हावें म्हणून तिच्या पतीला आपल्या हजार मोहोरा देण्यांत याव्या अशी विनंति पण त्यांनीं केली. कोणाला दुखवणें किती सोपें पण कोणाला सुखी करणें किती कठीण आहे?

गणोबांच्या विनंतीस मान देऊन राजानें त्या तरुणाला क्षमा केली व पुष्कळसें धन देऊन दोघां नवरा बायकोस निरोप दिला.

गणोबा त्या तरुणाला आपल्या घरीं बोलावून घेऊन गेले आणि म्हणाले—"आतां यापुढें तरी संभाळून रहा. ह्या स्त्रीच्या रूपानें तुला एक रत्न मिळालें आहे. तिच्या रक्षणाची जबाबदारी तुझ्यावर आहे."

[पुढल्या अंकीं आणखी एक गोष्ट]



# वाईट झालें, पण बऱ्यासाठीं

**चीन** देशांत एक म्हातारा रहात असे. त्याच्याजवळ एक घोडा होता. एकदां तो घोडा कोठें तरी नाहींसा झाला. शेजार पाजारच्या लोकांनीं येऊन म्हाताऱ्याला धीर दिला कीं देव करतो तें बऱ्यासाठींच करतो.

म्हातारा म्हणाला—"माझा घोडा हरवला हें देखील माझ्या बऱ्यासाठींच असेल कदाचित!" कांहीं दिवसांनीं तो घोडा परत आला तेव्हां तो आणखी एक घोडा बरोबर घेऊन आला.

शेजारच्या लोकांनीं येऊन म्हाताऱ्याचें अभिनंदन केलें. म्हातारा म्हणाला—"पण कदाचित याचा परिणाम वाईटहि होऊं शकेल!"

त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्या म्हाताऱ्याचा मुलगा त्या नव्या घोड्यावर बसून कोठें तरी जात असतां घोड्यावरून खालीं पडला व त्याचा पाय मोडला.

शेजार पाजारच्या लोकांनीं येऊन सहानुभूति व्यक्त केली तेव्हां म्हातारा म्हणाला—"कदाचित हें माझ्या बऱ्यासाठींच असेल!"

त्याच सुमारास चीन देशावर हूण लोकांनीं स्वारी केली. देशांतल्या तरुणांना सैन्यांत भर्ती करूं लागले. म्हाताऱ्याचा मुलगा लंगडा होता म्हणून त्याला भर्ती केलें नाहीं.





# अकलेचा कांदा

आजोबा घरीं आले तेव्हां सर्व बाळूची थट्टा करण्यांत रंगले होते.

"काय रे, तुम्ही त्याच्या पाठीस कां लागला आहां?" आजोबांनीं विचारलें.

पण बाळूनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

यमू म्हणाली–

"आजोबा आम्ही सर्व लपंडाव खेळत होतों. बाळू म्हणाला मी देखील खेळणार. आम्ही त्याला किती सांगितलें तुला येणार नाहीं, पण त्यानें हट्ट केला म्हणून आम्ही त्याला खेळायला घेतलें. तो ओरडत गेला, "थांब इतक्यांत येऊं नकोस!" एका टोपली मागें लपून ओरडला–"आतां आलास तरी चालेल." तो कोठें आहे हें चोराला कळलें व चोरानें त्याला जाऊन धरलें. म्हणून सर्व हंसत होते."

"एवढेंच का?" असें म्हणत आजोबा खालीं बसले. बाळूला प्रेमानें मांडीवर घेऊन ते म्हणाले–"अगदीं तुझ्याच सारखा समुद्रांत राहणारा एक प्राणी आहे, बघ! त्याला पाय, शेपूट व डोकें आहे. कोळी मासे धरायला आले कीं तो देखील तुझ्यासारखा एका जागीं लपून बसतो. एवढेंच नव्हें, तो कोठें लपून बसला आहे हें कोळ्यांना कळूं नये म्हणून काळ्या रंगाचा एक तऱ्हेचा द्रव तो सोडीत असतो, आणि तोच त्याचा काळ ठरतो. कारण त्या काळ्या द्रवाच्या अनुरोधानें कोळी त्या प्राण्याला धरतात."

"आजोबा, म्हणजे तो खुळाच आहे म्हणावयाचा. खंड्या, म्हणजे सुतार पक्षी काय करतो माहीत आहे ना?" एका मुलानें उठून विचारलें.

सौ. रमाबाई सोमण

"मला नाहीं बुवा माहीत! सांग बघू!" आजोबा म्हणाले.

"त्याच्या पिलांना धरून कोणी नेऊं नये म्हणून प्रथम तो झाडाच्या अगदीं शेंड्यावर आपलें घरटें बांधतो. पिलें अंड्यांतून बाहेर आल्यावर तीं खालीं पडून मरतील असा विचार करून तो आपलें घरटें थोडें खालीं बांधून त्यांत पिलांना आणून ठेवतो. पिलें जसजशीं मोठीं होत जातात तसतसें तो आपलें घरटें खालीं खालीं आणीत जातो. शेवटीं घरटें इतकें खालीं आणून ठेवतो कीं कोणी सहज पिलांना उचलून घेऊन जातो."

"अकलेचा कांदा! त्याला एवढें सुद्धां कळत नाहीं म्हणवयाचें!" बाळू म्हणाला.

आजोबांनीं बाळूला मांडीवरून खालीं उतरवून ठेवलें आणि नाकांत तपकीर कोंबीत म्हणाले–"अरे खुळ्या मनुष्य तरी तेंच करतो."

"म्हणजे असले अकलेचे कांदे माणसांत सुद्धां असतात, म्हणतां?" मुलांनीं विचारलें.

आजोबा म्हणाले–"पशुपक्ष्यांना मुळीं अकलच नसते म्हणून त्यांच्या हातून असला मूर्खपणा होतो. पण मनुष्य अकल असून देखील मूर्खपणा करतो त्याला काय म्हणावयाचें?"



"कसें हो?" मुलांनीं विचारलें.

आजोबा गोष्ट सांगूं लागले–

"एकदां एका राजानें वाटसरूंसाठीं रस्त्याच्या बाजूला एक विहीर खणून ठेवली होती. सर्वांनीं राजाची स्तुति केली आणि त्याचे आभार मानले. कारण जवळपासच्या गांवांत पिण्याच्या पाण्याची फार टंचाई होती. पण दैवयोग असा कीं एक मनुष्य त्या विहिरींत पडला. मग काय लोकांनीं राजाची निंदा सुरू केली. काय पण विहीर बांधली आहे. कित्येकांनीं असें म्हणायला देखील मागें पुढें पाहिलें नाहीं कीं येथें

विहिरीची मुळीं गरजच काय होती. विहीर नसती म्हणून काय बिघडलें असतें ?" जें तोंडाला आलें तें लोक बोलूं लागले.

"म्हणजे दहा माणसें दहा तऱ्हेनें बोलूं लागलीं म्हणून राजा मूर्ख ठरेल का ? बोलणारे लोकच मूर्ख ठरले." एक मुलगा म्हणाला.

"कसें अगदीं बरोबर बोललास. पण कोणी जाणून बुजून मूर्खासारखा वागत नाहीं ! पण चांगले समजूतदार शहाणे लोक सुद्धां अगदीं साध्या व्यवहारांत कधीं कधीं मूर्खासारखे वागतात ! उदाहरण म्हणून एक दोन गोष्टी सांगतों." आजोबा म्हणाले.

एकदां एका राजाच्या कानावर तक्रारी येऊं लागल्या कीं त्याच्या राज्यांत वाघांचा सुळसुळाट वाढूं लागला आहे. तो राजा स्वभावानें फार दुष्ट होता. लोक नुसतें त्याचें नांव ऐकूनच थरथर कांपत असत. तो राजा जागोजागीं आपले हुकूम दगडावर लिहून ठेवीत असे. प्रजा राजाच्या आज्ञे-प्रमाणें वागत असे. कधीं राजाच्या आज्ञे-विरुद्ध वागण्याची कोणाची छाती नव्हती. राजानें एक आज्ञा त्याच्या राज्यांतल्या वाघांच्या नांवीं काढून ती आज्ञा एका दगडावर खोदून ठेवली. "सर्व वाघांना



कळविण्यांत येत आहे कीं त्यांनीं एका आठवड्याच्या आंत या जंगलांतून निघून जावें. पण वाघ ती आज्ञा वाचून का जंगल सोडून निघून जाणार ? वाघांचा सुळसुळाट तसाच चालू होता. आतां राजाला अकलेचा कांदा नाहीं म्हणावयाचा तर काय म्हणावयाचें ? त्याला राजमद इतका चढला होता कीं त्याला वाटत होतें कीं श्वापदें देखील त्याच्या आज्ञेला भिऊन पळून जातील."

आणखी एक गोष्ट सांगतों. ऐका–

एकदां एका राजाच्या पदरीं एक मंत्री होता. तो प्रजावत्सल होता. तो नेहमीं प्रजेचें हित कसें होईल याचा रात्रंदिवस विचार करीत असे. कोणी प्रजेचें हित कसें होईल हें सुचविलें तर मंत्री त्याला बक्षिस देऊन त्याचा गौरव करीत असे. मंत्र्याची शाबासकी मिळविण्यासाठीं एका अधिकाऱ्यानें सुचविलें कीं राजधानीच्या पूर्वेला जो एक मोठा तलाव आहे तो आटवून त्यांत भात शेती केली तर देशांत सुकाळ होईल.

मंत्र्याच्या बायकोला ती सूचना ऐकून थोडें आश्चर्य वाटलें. तिनें विचारलें–"तें बरोबर आहे, पण तळ्यांतल्या पाण्याचें काय करावयाचें ?"





त्या अधिकाऱ्यानें विचार करायला क्षणभर देखील न थांबतां उत्तर दिलें–"शेजारीं दुसरा एक तलाव बांधून त्यांत सर्व पाणी सोडून देतां येईल. काय पण अकल? तुम्ही सुद्धां ऐकून हंसूं लागलात ना? पण तो अकलशून्य होता असें थोडेंच आहे. मंत्र्याची शाबासकी मिळविण्यासाठीं त्यानें ती सूचना केली होती."

आजोबा थोडा वेळ तपकीर ओढण्या-साठीं थांबलेले पाहून मुलें म्हणालीं–"आजोबा! अशाच कांहीं गमतीदार गोष्टी सांगा हो!"

"अरे अशा गोष्टी ना? माझ्या डोक्याला जितके केस आहेत तितक्या माझ्या डोक्यांत आहेत." आजोबा म्हणाले आणि डोकें खाजवूं लागले. थोड्या वेळानें गोष्ट सुरू केली–"एका राजाकडे एक नोकर होता. आलें कोठें व कसें लागतें, हें त्याला माहीत नव्हतें. एकदां बोलतां बोलतां त्यानें आपल्या साथी नोकरांना विचारलें–"आल्याचीं झाडें जास्त कोठें होतात?"

दुसरा म्हणाला–"आलें झाडाला नाहीं लागत. जमिनींत होतें."

पण पहिला नोकर त्याला कबूल होईना. म्हणाला–"चूक! मला माहीत आहे झाडालाच लागतें. शंभर रुपयांची पैज!" नंतर त्यानें दोघां तिघांना जाऊन तोच प्रश्न केला आणि प्रत्येकानें तेंच उत्तर दिलें. कोणी झाडाला लागतें असें उत्तर दिलें नाहीं. म्हणून पहिला नोकर हारला. पण तो दुसऱ्या नोकराला शंभर रुपये देत म्हणाला–"मी हारलों म्हणून काय झालें? आलें झाडालाच लागतें, हें मला नक्की माहीत आहे. अरे, ह्या सर्व लोकांना काय माहीत?" सशाला शिंगें असतात असें सांगणाऱ्या मूर्खासारखाच हा एक मूर्ख होता, आणखी काय?

माहिती कांहीं नसते व माहिती असल्याचा आव आणून असे मूर्खासारखे कांहीं लोक कांहीं तरी बोलतात झालें. आणखी एक गोष्ट ऐका–

एका राजाला दोन मुलें होतीं. दोघांचा वादविवाद चालू होता. तांदूळ कोठून येतो? मोठा म्हणाला–"पोत्यांतून!" धाकटा म्हणाला–"कणगींतून" पण दोघांपैकीं एक जण देखील कधीं शेतांत गेला असेल तर शपथ!"

अशीच एक गोष्ट आहे. एका चित्रकारानें दोन बैल झुंजत आहेत असें एक चित्र तयार केलें. मान खालीं करून ते नाकानें फूत्कार सोडीत होते. ते आपल्या शेपट्या उडवीत होते. सर्व दृश्य अगदीं कसें स्वाभाविक वाटत होतें. सर्व त्या चित्राची प्रशंसा करीत होते.

चित्रकार गर्वानें फुलून गेला. एकदां त्या चित्रकाराच्या गुराख्यानें तें चित्र पाहिलें आणि जोरजोरानें हंसूं लागला. म्हणाला–"धनी! काय व हें?"

चित्रकार म्हणाला–"आहे कीं नाहीं गमतीचें चित्र! मी काढलें आहे तें. तुला काय कळणार आमची चित्रकला? आहेत कीं नाहीं खरोखरचे बैल?"



"आहेत बरूच! पण झुंजतांना बैल अशा शेपट्या उडवीत नाहींत. शेपटी दाबून धरतात." गुराख्यानें अगदीं बरोबर सांगितलें होतें. त्याची चूक त्याच्या पदरांत बांधून दिली होती. पण त्यानें त्या चित्रांत कांहीं बदल केला का?

कांहीं लोक 'अव्यापारेषुव्यापार' करूं लागतात. म्हणजे त्यांना माहिती मुळींच नसतें. पण नेमकें तेंच काम करायला धांवतात. एका गांवांत एक आंधळा रहात असे. त्याला पाहून त्याच्या एका नातेवाइकाला त्याची दया आली. तो म्हणाला—"बिचाऱ्यानें सूर्याचें तोंड कधीं पाहिलेलें नाहीं. तें कसें असतें आपण त्याला सांगूं या. असें सांगून तो म्हणाला—"सूर्य या घंटेसारखा असतो." असें सांगून त्यानें घंटा वाजवून दाखविली. त्यानंतर घंटेचा आवाज ऐकल्यावरोवर आंधळा विचारी—"कोण? सूर्य आला का?" त्याच्या त्या नातेवाइकाला त्याचें जास्तच दुःख वाटलें. तो म्हणाला—"सूर्य असा चमकतो!" असें सांगून एक मेणबत्ती आंधळ्यासमोर दाखवीत म्हणाला—"पाहिजे तर हात लावून पहा!" त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्या आंधळ्याच्या हातांत मुलांनीं एक बांसुरी आणून दिली. ती हातांत घेऊन तो आंधळा म्हणाला—"अरे हा तर सूर्य दिसतो आहे. आतां नाहीं सोडणार याला!" मुलांनीं किती सांगितलें कीं ती बांसुरी आहे सूर्य नाहीं, पण आंधळा म्हणूं लागला—"तुम्हांला काय माहीत?" मुलें हंसूं लागलीं.

आतां तुम्हींच सांगा कीं तो आंधळा वेडा कीं सूर्य कसा असतो हें सांगणारा वेडा!"



# घमेंड जिरली

एक गरीब लाकूडतोड्या रानांत लाकडें तोडून त्यांची एक मोळी बांधून बाजारांत विकायला घेऊन आला. बाजारांत खूप गर्दी होती. लाकूडतोड्या 'बाजू' 'बाजू' असा ओरडत रस्त्यानें चालत होता. लोक त्याचा आवाज ऐकून बाजूला सरत होते. परंतु एक घमेंडखोर शेठ बाजूला झाला नाहीं. त्यामुळें त्याचे कपडे लाकडांत अडकून फाटून गेले. त्याला फार राग आला. त्यानें लाकूडतोड्याच्या विरुद्ध न्यायाधिशाकडे फिर्याद केली.

न्यायाधिशानें लाकूडतोड्याला कित्येक प्रश्न केले. पण त्यानें एका प्रश्नाचें देखील उत्तर दिलें नाहीं. शेवटीं न्यायाधिशानें कंटाळून विचारलें—"या मुक्याला माझ्याकडे कशाला घेऊन आलां आहां?"

"साहेब! हा नेहमींच असें एक न एक सोंग करतो. हा मुका आहे तर 'बाजू बाजू!' असें ओरडत कसा बाजारांत आला?" शेठ म्हणाला.

"होय का? म्हणजे तो ओरडत असून व तें ऐकून देखील तुम्ही बाजूला सरकला नाहींत. ही तुमचीच चूक आहे! तुमची फिर्याद रद्द करण्यांत येत आहे!" न्यायाधिशानें निवाडा दिला.



# कृताकृत

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडावरून प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझी ही चिकाटी पाहून मला कधीं कधीं तुझें कौतुक करावेंसें वाटतें. कारण कृताकृत नांवाच्या एका ब्राह्मणाप्रमाणें हातीं घेतलेलें काम तडीस नेण्यासाठीं तूं झटत आहेस. काम पुरें होईपर्यंत तुला चैन पडणार नाहीं हें मी पाहातों आहें. तरी तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी कृताकृताची गोष्टच तुला सांगतों. ऐक!" असें सांगून त्यानें गोष्ट सुरू केली.

कृताकृत हा एक ब्राह्मण होता. तो वैदिक कार्य करण्याचें सोडून जुगार खेळूं लागला व दारू पिऊन गुंडगिरी करूं लागला. कधीं कधीं झिंगल्यावर तो रात्रीं स्मशानांत जात असे. जें मिळेल तें खायचें, विधिनिषेध कांहीं नाहीं. एकूण तो कुळभ्रष्टच झाला असें म्हटलें तरी चालेल.

**वेताळाच्या गोष्टी**

एकदां तो स्मशानांत हिंडत असतां स्मशानांत कित्येक चिता जळत होत्या आणि भुतांचें नृत्य चालू होतें. एका भुतानें त्याला विचारलें—"मला खायला नरमांस आणून देतोस कीं मी तुलाच खाऊन टाकूं?"

"मी नरमांस आणून द्यायला तयार आहें. पण त्याबद्दल तूं मला काय देणार, सांग!" कृताकृतानें विचारलें.

"तूं एका निरोगी ब्राह्मणाचें मांस आणून दिलेंस तर मी तुला संजीवनीमंत्र शिकवून देईन!" भूत म्हणालें.

"त्या एका मंत्रावर भागणार नाहीं. तूं मंत्रवलेले फासे सुद्धां दिले पाहिजेस. जुगारांत माझा पराभव होता कामा नये! हें कबूल असेल तर तूं मागितल्याप्रमाणें ब्राह्मणाचें मांस मी आणून द्यायला तयार आहें." कृताकृत म्हणाला.

"कबूल! मी तुला मंत्रवलेले फासे पण द्यायला तयार आहें!" भूत म्हणालें.

कृताकृतानें निरोगी ब्राह्मणाला ठार करून त्याचें मांस आणून द्यायचें ठरविलें. परंतु तें



काम सोपें नव्हतें. म्हणून त्यानें आपल्या भावाचाच वध केला आणि त्याचें मांस आणून भुताला दिलें. भुतानें वचन दिल्याप्रमाणें एक मंत्रवलेला फाशाचा जोड आणि संजीवनी मंत्र कृताकृताला दिला.

एकदां संजीवनी मंत्राची परीक्षा करून पाहण्यासाठीं कृताकृत स्मशानांत गेला आणि एका चांडाळाच्या प्रेतावर त्याचा प्रयोग करूं लागला. त्यानें अर्धा मंत्रच म्हटला असेल कीं प्रेताचा डावा हात हलूं लागला. नंतर डावा पाय हलूं लागला व हळूं हळूं डावा डोळा उघडून तो चांडाळ कृताकृताकडे

पाहूं लागला. अजून उजवें अंग मेलेलेंच होतें.

तें भयंकर दृश्य पाहून कृताकृत घाबरला आणि अर्धा मंत्र विसरून गेला. आतां त्या चांडाळाला अर्धमृत स्थितींत ठेवून तेथें फार वेळ उभा राहण्याची त्याची छाती होईना. म्हणून कृताकृत तेथून पळाला. चांडाळाचें अर्धवट जिवंत झालेलें प्रेत पण उभें राहालें आणि लंगडत त्याच्या पाठी-मागून निघालें.

कृताकृत पळत घरीं गेला व दरवाजा बंदकरून थरथर कांपत पांघरूण घेऊन झोंपण्याचा प्रयत्न करूं लागला. पण झोंप लागते का ? डोक्यांत त्या चांडाळाचें भूत बसलें होतें ना ? थोड्या वेळानें त्याला "ऊनाधिकाकृतंकृतम् !" चा जप करीत कोणी येत असल्याचा आवाज ऐकूं आला. तो चांडाळच आहे याची खात्री पटल्यावर कृताकृत बिछान्यावरून उठला व दार उघडून पळाला. पण ठेच लागून खालीं पडला. तरी उठून एका घोड्यावर बसून दूरच्या एका गांवीं निघून गेला.

त्याची समजूत होती कीं आतां चांडाळ पाठलाग करीत येणार नाहीं. तो संवयी-



प्रमाणें पुन्हां जुगार खेळूं लागला. आतां तर त्याच्याजवळ मंत्रवलेले फासे होते. म्हणून त्याला जुगारींत चांगलेंच यश मिळूं लागलें. हळूं हळूं तो श्रीमंत झाला. त्याच्या दिवाण-खान्यांत नेहमीं जुगार खेळणारांची गर्दी जमा होऊं लागली. त्याची मित्र मंडळी जमत, जुगार खेळत व दारू पिऊन मारामारी देखील करीत. त्यांत त्याचें नुकसान होई. पण एकदां लागलेलें व्यसन सुटतें का ?

एकदां तो आपल्या जुगारी मित्रमंडळी-बरोबर जुगार खेळण्यांत गर्क झाला असतां चांडाळ लंगडत लंगडत दत्त म्हणून समोर येऊन उभा राहाला आणि "ऊनाधिका कृतंकृतं !" चा जप करूं लागला.

कृताकृत त्याला पाहून जोरानें ओरडला व मागच्या दारानें पळून गेला. त्यानें तें गांव देखील सोडलें आणि आणखी एका दूरच्या गांवीं जाऊन राहूं लागला. त्याच्या घरीं जे लोक होते ते सर्व चांडाळाच्या त्या अर्धमृत प्रेताला पाहूनच जागच्या जागीं गार झाले.

नव्या गांवीं कृताकृत कांहीं दिवस वेष पालटून भटकत राहिला. हळू हळू त्याची भीति कमी होऊं लागली. जुगार खेळून



पुन्हां पैसे मिळवूं लागला आणि चैन करूं लागला.

एकदां कृताकृत आपल्या घरीं निश्चितपणें घोरत पडला असतां चांडाळ लंगडत "उनाधिकाकृतंकृतम् !" असें ओरडत येऊन पोंचला. कृताकृत जागा झाला तेव्हां समोर चांडाळाला उभा पाहून घाबरून गेला आणि पळण्यासाठीं माडीवरून उडी टाकली आणि खालीं फरशीवर आदळून आपटून मरण पावला. येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा ! मला हें कळलें नाहीं कीं तो चांडाळ "उनाधिकाकृतंकृतम् !" असें कां ओरडत होता ? त्याचा अर्थ काय ? तूं माहीत असून सांगितला नाहींस तर तुला त्याचा परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"उनाधिकाकृतंकृतम् ! याचा अर्थ, कमी केलेलें, अधिक केलें किंवा कांहींच केलें नाहीं असा होतो. तात्पर्य स्पष्टच आहे. सुरू केलेलें काम जे लोक पुरें करण्याचें धाडस किंवा चिकाटी दाखवीत नाहींत ते तें काम अर्धवट सोडून देतात. उत्तम पुरुष हातीं घेतलेलें काम पुरें करतात किती त्रास किंवा कष्ट सहन करावे लागले तरी माघार घेत नाहींत. त्यांना इहलोकीं सुख मिळतें. अर्धवट काम करणारांना इहलोकीं दुःख व परलोकीं पण दुःख सहन करावें लागतें. चिकाटी ही यशाची गुरु किल्ली आहे !"

अशा प्रकारें राजाचें मौन भंग झाल्यामुळें वेताळ पुन्हां प्रेतासह नाहींसा झाला आणि झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





# बहीण भाऊ

[२]

जुबेदानें नोकरांकरवीं कूतल कुलूबला पुरून टाकवलें खरें, परंतु खलिफांनीं घरीं परत आल्यावर ती कोठें आहे असें विचारलें तर त्यांना काय उत्तर द्यावयाचें या विचारांत ती पडली. पण तिला सयुक्तिक असें उत्तर सुचेना.

तिनें आपल्या म्हाताऱ्या दासीला बोलावून तिचा सल्ला घेतला. म्हातारी वस्ताद होती. म्हणाली—"बेगम साहबा ! एक उपाय आहे. कराल तर सांगतें. तसे पुष्कळ उपाय आहेत. पण हा उपाय तुम्ही केलात तर आपल्याला खात्रीनें यश येईल. सुताराला बोलावून एक पुतळा तयार करायला सांगा. तो पुतळा एक सुंदर ताबूत तयार करून त्यांत ठेवून द्या. नंतर दासींना बरोबर घेऊन महालाच्या एका कोपऱ्यांत कोठें तरी तो पुरून टाका, म्हणजे झालें."

"खलिफांनीं विचारलें कीं कूतल कुलूब कोठें आहे तर सांगा कीं खलिफा गेल्यावर त्यांच्या विरहानें ती एकाएकीं मरण पावली व खलिफांना परत पुष्कळ दिवस लागतील असें समजून तिला मूठमाती देणें भाग पडलें. तिच्या दर्जाला साजेल अशी अत्युत्तम कबर पण तिच्या प्रेतावर बनवली आहे."

खलिफा आपल्या प्रेमिकेची कबर पाहून शोक करतील व तिच्या आत्म्याला शांति मिळो व कयामतच्या रात्रीं तिची पुन्हां भेट घडो अशी खुदाजवळ प्रार्थना करतील. त्यांना शंका आली तर ते कबर खणवून

श्री ना. गो. देसाई



पाहतील तेव्हां उत्तमोत्तम कपड्यांत कूतल कुलबचा पुतळा दिसेल. 'किती काळवंडला आहे' असें म्हणा, म्हणजे खलिफा त्याला हात सुद्धां लावणार नाहींत. प्रेताला हात लावणें धर्मविरुद्ध आहे याची आठवण करून द्यायला विसरूं नका.''

जुबेदा बेगम खूष झाली. तिनें दासीनें सांगितल्याप्रमाणें एक लाकडाचा पुतळा करवून घेतला. त्या पुतळ्याला उंची वस्त्रें व दागिने घालून तोंडावर बुरखा घातला व दासीनें सांगितल्याप्रमाणें थाटामाटानें तो पुतळा पुरून टाकला. त्या जागेवर मेणबत्त्या लावून ठेवून दिल्या. नंतर त्या जागीं एक सुंदर कबर बनविली. अंतःपुरांतील सर्व स्त्रिया व दासदासी या काळीं वस्त्रें घालून मूठ-मातीच्या संस्काराला हजर होत्या. सर्व महालांत कूतल कुलब वारल्याची बातमी पसरली. मसूरसारख्या खलिफांच्या मित्र-मंडळींना देखील ती बातमी खरी वाटली.

खलिफा कांहीं दिवसांनीं मोहीम संपल्यावर बगदादला परत आले. कूतल कुलब वारल्याचें ऐकून ते बेशुद्ध होऊन धाडकन जमिनीवर पडले. शुद्धीवर आल्यानंतर त्यांनीं कबरीचें दर्शन घेण्यासाठीं जायचें ठरविलें.

''खलिफा कबरीजवळ गेले. कबरीच्या चारी बाजूला काळे गालिचे घातलेले पाहून व मेणबत्त्या जळत असलेल्या पाहून खलिफा दोन मिनिटें कबरीजवळ मौन उभे राहाले व नंतर आपल्या महालांत परत गेले.

परंतु पुन्हां त्यांना शंका वाटली कीं कदाचित हें सर्व खोटें असेल. म्हणून त्यांनीं कबर खणवून खात्री करून घेतली आणि एक आठवडाभर कुराणाचा पाठ करून घेण्याची व्यवस्था केली. रात्रं दिवस तो पाठ चालू होता. खलिफा तासन् तास बसून कुराणपाठ ऐकत.





कित्येक दिवस दुःखामुळें झोप आली नाहीं. कुराणपाठ होऊन गेल्यावर ते घरीं आले व झोंपी गेले. सर्व लोक आपापल्या घरीं निघून गेले.

खलिफांच्या सेवेला ज्या दासी आल्या होत्या त्यांचें आपसांत हळूं हळूं बोलणें चालू होतें. अर्थातच खलिफांची झोप मोडली. परंतु त्यांनीं झोप मोडली असल्याचें दाखविलें नाहीं. दासींचें बोलणें चालू होतें—

''खलिफांना उगीच त्रास झाला. त्या कबरीवर त्यांनीं उगाच आसवें गाळलीं. त्या कबरींत लाकडाचा पुतळा तर आहे.''

''खरें प्रेत जुबेदा बेगमनें दूर मशिदीच्या भिंतीजवळ गुपचुप पुरून टाकलें आहे. तिनेंच तिचा कांटा दूर करविला !''

खुदाची मेहरबानी होती म्हणून ती कशी तरी वांचली. डेमास्कसला कोणी गनी नांवाचा व्यापारी आहे त्याच्याकडे ती राहते आहे, म्हणे. जुबेदा बेगमला सुद्धां ही गोष्ट आतां कळली आहे. तेथें तो गनी आणि कूतल कुलब मजा करीत आहेत आणि इकडे खलिफा मात्र तिच्या नांवानें आंसवें गाळीत आहेत.'' तें ऐकून खलिफा उठून बसले आणि विचारूं लागले—''जाफर कोठें आहे? जाफर! बोलवा त्याला!'' जाफर आल्यावर ते त्याला म्हणाले—''जा, आतां नीघ! डेमास्कसच्या व्यापाऱ्याच्या घरीं जा आणि घराचा ताबा घे. माझी कूतल कुलब तेथें आहे तिला घेऊन ये आणि त्या गनीच्या मुसक्या बांधून त्याला माझ्यासमोर हजर कर. त्याची चामडी लोळवितों.''

जाफरनें एका सरदाराबरोबर कांहीं सैनिकांना गनीच्या घरीं पाठविलें. सरदाराला त्यानें बजावून सांगितलें कीं तो गनी घरांत आहे कीं नाहीं याची पहिल्यानें माहिती काढून त्याच्या घराला वेढा दे. गनी हातचा



निसटून गेला तर तुला व मला फांशीची शिक्षा होईल."

खलिफांचा सरदार आपल्या सैन्यासह गनीच्या घराजवळ आला तेव्हां गनी व कूतल कुलूब दोघांनीं माडीवरच्या खिडकींतून त्यांना पाहिलें. कूतल म्हणाली—"पळ काढ आतां! खलिफा तुला जिवंत सोडणार नाहींत!"

सैनिकांनीं तोंपर्यंत घराला वेढा दिला होता. पळावें कसें हें त्याला कळेना. कूतल कुलूबनेंच एक युक्ति काढली. तिनें त्याचे कपडे फाडले. ते एका मडक्यांत कोंबले व मडकें डोक्यावर घ्यायला सांगितलें. नंतर म्हणाली—"तूं समोरच्या दारानेंच बाहेर जा! तुला गुलाम नोकर समजून कोणी ओळखणार नाहीं. माझी काळजी करूं नकोस. माझ्या केसाला देखील धक्का लागायचा नाहीं."

कूतल कुलूबनें सांगितल्याप्रमाणें शिपायांनीं गनीला अटकाव केला नाहीं. तो बाहेर गेल्यावर सरदार घरांत शिरला तेव्हां कूतल कुलूब जणुं कांहीं त्यांची वाट पहातच बसली होती. सरदार समोर आल्याबरोबर तिनें लवून सलाम केला.

सरदार तिला म्हणाला—"गनीला कैद करून घेऊन यायला मला हुकूम झाला आहे! आहे कोठें तो? तुला माहीत आहे का?"

"मला माहीत आहे. तो आपल्या बहिणीला भेटून येतों असें सांगून निघून गेला आहे. यापलीकडे मला कांहीं माहीत नाहीं. ही पेटी माझी आहे. हिच्यांत माझ्या सर्व वस्तू आहेत. म्हणून ही पेटी संभाळून उचलून घ्या." कूतल कुलूब म्हणाली.

सरदार व सैनिक निघून गेल्यावर जाफर त्यांच्या पाठोपाठच गनीच्या घरीं आला. त्यानें कुलूबनें सांगितल्याप्रमाणें पेटी उचलून घ्यायला सांगितलें. कुलूब खलिफां-कडे स्वखुशीनें जायला तयार झाली. तिला घेऊन जाफर खलीफांकडे गेला. तो म्हणाला—"तो डेमास्कसचा व्यापारी आम्ही त्याच्या घरीं पोंचण्याच्या आंत घराबाहेर निघून गेला होता. तो आल्याबरोबर त्याला धरून आणण्यासाठीं मी दहा शिपायांना नेमलें आहे.

खलिफांच्या मनांत कूतल कुलूबवर राग होता. बहुतेक गनीशीं तिचें संगनमत असावें असा त्यांच्या मनांत संशय होता. म्हणून त्यांनीं आपला अंगरक्षक मसूर याला आज्ञा केली कीं कूतल कुलूबला एका काळ कोठडींत ठेव!

आतां गनीला धरून आणून शिक्षा देणें बाकी होतें. त्याचा शोध काढण्यासाठीं घोडेस्वार पाठविण्यांत आले. खलिफानें डेमास्कसच्या सुलतानाला एक खलिता पाठविला व त्यांत लिहून कळविलें कीं गनी हा डेमास्कसचा राहणारा एक तरुण व्यापारी आहे. तो व्यापार करण्यासाठीं बगदादला आला व त्यानें खलिफाच्या प्रेमिकेशीं संबंध वाढवून खलिफांचा अप-मान केला आहे. तो डेमास्कसला पळून













गेला आहे. तरी त्याला पकडून बगदादला पाठवावें.

एका आठवड्यानंतर डेमास्कसच्या सुलतानाला तें पत्र मिळालें. त्यानें गनीला पकडून आणण्यास हुकूम सोडला. त्यानें असें देखील सांगितलें कीं गनीच्या घरांतील सर्व माल सरकारजमा करून त्याचें घर जमीनदोस्त करून टाकावें.

सुल्तान स्वत: कांहीं सैनिकांना बरोबर घेऊन गनीच्या घरीं गेला आणि दार ठोठावलें. गनीच्या बहिणीनें येऊन दार उघडलें. समोर सुल्तानाला पाहून ती तोंडावर पदर ओढून आपल्या आईला कळविण्यासाठीं घरांत गेली.

गनीच्या आईला बरेच दिवसांत मुलाकडून कुशल समाचार कळला नव्हता. ती काळजींतच होती. कोठेंतरी तो अपघातांत मेला असेल असें समजून तिनें त्याची एक कबर तयार करवून ती त्या कबरीशेजारींच पडून राही. सुल्तान आल्याचें ऐकून ती मुलीला म्हणाली—"जाऊन सुल्तानांना आदरपूर्वक आंत येथेंच बोलावून घेऊन ये."

सुल्तान त्याप्रमाणें आला व म्हणाला—"गनीनें खलिफांचा अपमान केला आहे. त्याला धरून घेऊन जाण्यासाठीं आलों आहें."

सुल्तानाला दया आली. पण तो काय करणार? खलिफांच्या हुकमाविरुद्ध कांहीं करण्याची त्याची छाती होईना. त्यानें गनीच्या आईला व बहिणीला तसें सांगितलें व म्हणाला—"आतां तुम्ही घराबाहेर जा! मला तुमच्या घरांतला सर्व माल सरकारजमा करण्याचा हुकूम आहे!"

दोघी घराबाहेर निघाल्यावर गनीच्या घरांतला माल सैनिकांनीं उचलून नेला व त्यानंतर घर पाडून टाकण्यांत आलें.

(पुढील गोष्ट पुढील अंकीं.)







# सपशेल खोटे

मलकापूर या गांवीं जग्गूशेट नांवाचा एक व्यापारी व्यापार करीत असे. त्याच गांवीं गणू नांवाचा एक शेतकरी रहात असे. एकदां गणूला पंचवीस रुपयांची गरज पडली. त्यानें जग्गूशेटकडे जाऊन पंचवीस रुपये कर्जाऊ मागितले. म्हणाला–

"जग्गूशेट! पंचवीस रुपये म्हणजे तुम्हांला जास्त नाहींत. दिलेत तर आयुष्यभर तुमचे उपकार विसरणार नाहीं. मागाल तें व्याज द्यायला तयार आहें. पुढल्या मंगळवारीं रक्कम परत करतों."

कवडीचुंबक म्हणून गांवभर जग्गूशेटची कीर्ति होती. मग गणूच्या शब्दावर विश्वास करून तो काय पैसे देतो? त्यानें गणूशीं गोड बोलून रिकाम्या हातांनीं त्याला परत पाठविण्याचें ठरविलें. म्हणाला–

"गणोबा! गांवांतले घरंदाज शेतकरी तुम्ही! आज कर्जाऊ पैसे मागायला तुम्ही आलांत हें पाहून मला तरी खरें वाटत नाहीं. आम्ही व्यापारी! हातांत पैसा असेल तो व्यापारांत लावतों. शिल्लक ठेवीतच नाहीं हातांत! नाहीं तर पंचवीस काय, पांचशें रुपये द्यायला मी तयार झालों असतों."

गणू मनांत म्हणाला, माझ्याजवळ या गप्पा करतोस काय, बच्चू? "बरें, पाहतों आणखी कोणाकडे मिळाले तर!" असें सांगून निघून गेला. याच्याकडूनच दुप्पट पैसे काढल्याशिवाय राहणार नाहीं, असें मनाशीं ठरवून तो घरीं गेला व उलट पावली जग्गूशेटच्या दुकानासमोर येऊन उभा राहिला.

जग्गूशेट दुकानांत बसले होते. गणूनें त्याला विचारलें–"जग्गूशेट, पांच दाहे किती हो?" जग्गूशेटला वाटलें कीं पांचाचा पाढा देखील माहीत नाहीं म्हणून विचारीत असावा. म्हणाला–"एवढें देखील माहीत नाहीं का? पन्नास!"

गणू म्हणाला–"काय जग्गूशेट? पन्नास कसे हो? साठ नाहीं का?"

जग्गूशेट म्हणाले–"तूं तरी विचित्रच दिसतोस, पन्नासच!"

गणू मोठ्यानें म्हणाला–"खोटें! पन्नास नाहीं, साठ!"

जग्गूशेट ओरडून म्हणाले–"चालता हो! आला आहे मोठा मला शिकवायला! म्हणे, साठ!" दोघांचें भांडण जुंपलें व गंमत पाहायला लोकांची गर्दी जमा झाली. जग्गूशेट म्हणत होते–"पन्नास!" व गणू म्हणत होता–"साठ!"

एका दोघा वयस्क लोकांनीं पुढें येऊन विचारलें–"काय आहे तरी काय भांडण?"

गणू म्हणाला–"पहा तर! हा एवढा मोठा शेट आणि असा सपशेल खोटें बोलतो आहे. मी याच्याकडे साठ रुपये ठेवले होते. मागायला आलों तर पन्नास रुपये पुढें करतो आहे. असें गरिबाला फसविणें बरोबर होईल का? तुम्हीच विचार करा!"



सौ. कमलाबाई पवार

जम्नूशेटचे डोळे पांढरेच झाले. खोटें व अगदीं सपशेल खोटें. त्यानें विचारलें—"काय रे! तूं माझ्याकडे केव्हां व कशासाठीं रुपये ठेवले होतेस? सपशेल खोटें!"

गणूनें त्याला जास्त बोलूंच दिलें नाहीं व म्हणाला—"जम्नूशेट! या लबाड्या आमच्या जवळ नाहीं चालायच्या. मी शेतकऱ्याचा बच्चा आहें, विसरूं नका. माझे दहा रुपये पचायचे नाहींत तुम्हांला. सात पिढ्या मागच्या व सात पिढ्या पुढल्या भोगतील या पापाचीं फळें, सांगून ठेवतों! गुण्यागोविंदानें साठ रुपये समोर काढून ठेव. नाहींतर या गणूशीं गांठ आहे, विसरूं नकोस!"

जमलेल्या लोकांना गणूचें बोलणें खरें वाटलें. एकानें पुढें येऊन मध्यस्थी केली—"जम्नूशेट! तुम्ही 'पन्नास!' म्हणतां आहां व तो 'साठ' म्हणतो आहे! दहा रुपयांचा प्रश्न आहे! उगीच गरिबाचें नुकसान कां करतां?"

जम्नूशेट बोलूं लागल्याबरोबर गणू म्हणाला—"या सावकारावर दया कशाला हो एवढी? कसा देत नाहीं पाहातों."

त्यावर तो मध्यस्थ म्हणाला—"उगाच भांडण तरी कशाला वाढवतां? जम्नूशेट पन्नास रुपये तुम्ही स्वतःच्या तोंडूनच कबूल केले आहेत. देऊन टाका ना तेवढे! आणि गणू, तूं एवढे प्रथम घे व त्यानंतर दहा रुपयासाठीं काय करावयाचें तें पाहूं!"

जम्नूशेटनें विचार केला, आतां जास्त वादविवाद केला तर आपल्याला पुरे साठ रुपये द्यावे लागतील त्यापेक्षां पन्नास रुपये देऊन गप्प बसावें यांत शहाणपण आहे. त्यांनीं पन्नास रुपये काढून गणूला दिले.

गणू रुपये घेऊन हंसत निघून गेला.






भरताला रामानें समजावून सांगितल्यावर तो उठला आणि रामाचा चरण-स्पर्श करून सर्व थोर मंडळींना नमस्कार केला व म्हणाला—"मी आपल्या वडिलांजवळ राज्य मागितलें नाहीं कीं आईजवळहि मागितलें नाहीं. रामानें वनवासास जाणें मला पसंत नाहीं. रामाऐवजीं मी वनवासास जातों व रामानें माझ्या ऐवजीं राज्य स्वीकारावें. अशा तऱ्हेनें वडिलांच्या आज्ञेचें पालन पण होईल व सर्वांना सुख पण मिळेल."

तें ऐकून रामाला आश्चर्य वाटलें. "वन-वास व राज्य यांची अदलाबदल केल्यानें वडिलांच्या आज्ञेचें पालन कसें होणार? दोघांनीं त्यांच्या आज्ञेचा भंग केल्यासारखें होईल! त्या ऐवजीं हीं चवदा वर्षें संपल्यावर भरत व मी दोघे मिळून राज्य करूं!" राम म्हणाला.

राम व भरत दोघांचा तो संवाद ऐकून सर्वांच्या मनाचें समाधान झालें. सर्व भरताला म्हणाले—"भरता! राम म्हणतो आहे तसें करणेंच बरोबर होईल. पितृऋणांतून मुक्त झाल्यावर तो तूं म्हणशील तसें करावयास तयार आहे." तें ऐकून रामाला बरें वाटलें पण भरताच्या मनाचें समाधान झालें नाहीं.

तो म्हणाला—"रामा तूं येणार नाहींस तर तुझ्या या पादुका तरी दे. त्याच प्रजेचें



पालन करतील. मी त्यांची अनुज्ञा घेऊन तुझ्या राज्याचें रक्षण करीन. मी मुनि वेष धारण करून राजधानी बाहेर तूं येईपर्यंत तुझी वाट पाहीन. चवदा वर्षें लोटल्यानंतर देखील तूं परत आला नाहींस तर अग्नि-प्रवेश करीन."

रामाला तें कबूल करावें लागलें. भरतानें रामाच्या पादुका बरोबर अयोध्येहून आणल्या होत्या. रामाला त्याच्यावर पाय ठेवा-यला सांगितलें. त्यानंतर रामाला पदस्पर्श करून त्यानें नमस्कार केला व पादुकांची पूजा केली.

रामानें उठून भरताला आलिंगन करून आशीर्वाद दिला आणि म्हणाला—"तूं आई वर राग दाखवूं नकोस. तिचा आदर कर. बरें, ये आतां!" असें म्हणत असतां रामाचे डोळे ओले झाले.

राम वसिष्ठ, सुमंत आदि थोरांचा व मातांचा निरोप घेऊन आपल्या पर्णकुटींत परत आला. भरतानें रामाच्या पादुका डोक्यावर उचलून घेतल्या व शत्रुघ्नाबरोबर रथांत बसून निघाला.

भरत अयोध्येच्या वाटेवर भरद्वाज मुनींच्या आश्रमांत गेला व चित्रकूट पर्वतावर घडले-ल्या सर्व गोष्टी निवेदन करून व त्यांचा निरोप घेऊन पुढें निघाला.

शृंगवेरपुराच्या मार्गानें तो अयोध्येस येऊन पोंचला. अयोध्या नगरी त्याला निष्प्राण निर्जीव व ओसाड भासूं लागली. तो शत्रुघ्नाला म्हणाला—"अयोध्येचें सारें वैभव रामाबरोबर निघून गेलें."

अयोध्येला पोंचल्यावर भरत आपल्या माता व वसिष्ठ मुनींना म्हणाला—"अयोध्येला राम नाहीं. तो वनवासांत असतां मी येथें कसा राहूं. म्हणून मी अयोध्येबाहेर नंदीग्राम येथें राहून रामाच्या राज्याचा सर्व कारभार



पाहातों." सुमंत आणि मंत्र्यांनीं आपली संमति दिल्यावर भरत मातांना नमस्कार करून शत्रुघ्नाबरोबर नंदीग्रामीं जाऊन राहूं लागला. भरतानें आज्ञा केली नव्हती. सर्व सैन्य त्याच्या बरोबरच निघालें.

तें सैन्य पाहून भरताला आणखी विचार सुचला. त्यानें पादुकांचा राज्याभिषेक करून रामाला साजेल अशा तऱ्हेनें सर्व व्यवस्था करावयाचें ठरविलें. छत्रचामरांची देखील व्यवस्था करण्यांत आली.

त्याच्या मातेमुळें रामाला जटाजूट धारण करून वनवास करावा लागला होता. ती अपकीर्ति धुवून निघावी या हेतूनें किंवा त्याचें प्रायश्चित म्हणून त्यानें वल्कल वस्त्रें धारण केलीं व जटाजूट वाढवून पादुकांची रोज पूजा करूं लागला आणि त्यांची अनुज्ञा घेऊन राज्यकारभार पाहूं लागला. जो कर किंवा खंडणी वगैरे वसूल होई ती त्या पादुकांना नैवेद्याप्रमाणें तो समर्पण करी. आहे तें सर्व रामाचें व त्याचें रक्षण करण्याचा भार आपल्यावर आहे असें आनंदानें स्वीकार करून तो नंदीग्रामीं राहूं लागला.

भरत निघून गेल्यावर राम आपल्या पर्णकुटींत रहात होता खरा, परंतु त्याचें



चित्त भरताकडे लागलेलें होतें. भरतासारखा भाऊ मिळणें कठीण आहे हें वारंवार त्याच्या मनांत येई. चालून आलेलें राज्य लाथाडून देणारा भरत हा या दुनियेंत स्वतःसारखा एकच एक आहे. केवढा त्याग, मनाचा केवढा थोरपणा! आणि मी त्याला किती दुखविलें! त्यानें परोपरीनें अयोध्येला बोलाविलें, पण निष्ठुरपणानें मी त्याला एकटा माघारीं पाठविलें, आणि त्यानें कर्तव्य म्हणून सर्व भार आपल्या शिरावर घेतला.

राम सदा अन्यमनस्क राही. सीता व लक्ष्मण दोघांनीं रामाच्या मनांत चालू असलेले

विचार ओळखले. परंतु ऋषि व मुनि यांना तें कळलें नाहीं. ते चित्रकूट सोडून निघून जाऊं लागले. अन्य मनस्क होऊन बसलेल्या रामाकडे पाहून ते आश्चर्य करूं लागले. एवढेंच नव्हे तर कांहीं ऋषि मुनि आपापले आश्रम सोडून निघून जाऊं लागले. तेव्हां रामानें चित्रकूट वनाचे कुलपति श्री अत्रिमुनि यांच्याकडे जाऊन विचारलें कीं आमच्या हातून अज्ञानानें कांहीं चूक घडली असेल तर आपण क्षमा करावी.

त्यावर मुनि म्हणाले—"रामा तुझा सहवास आम्हां सर्वांना सुखावह झाला. तुझ्या हातून चूक काय घडणार ? अलीकडे राक्षसांचा उपद्व्याप वाढूं लागला आहे. रावणाचा भाऊ खर यज्ञांत विघ्न घालूं लागला आहे. तो तुला देखील स्वस्थ चित्तानें राहूं देणार नाहीं. म्हणून ऋषिमुनि स्वरक्षणासाठीं चित्रकूट सोडून निघून जात आहेत. तूं वीर आहेस परंतु तूं सपत्नीक रहात आहेस. म्हणून तूं देखील येथून निघून जाणें बरोबर होईल असें आम्हांला प्रामाणिकपणानें वाटतें."

रामानें चित्रकूट पर्वत सोडून जाण्याचें ठरविलें आणि अत्रि व अनसूया यांचा निरोप घेण्यासाठीं सीता व लक्ष्मणासह आला.



अत्रि मुनींनीं रामाला स्वतःच्या मुलासारखं मानून त्याला प्रेमपूर्वक बसायला सांगितलें. नंतर अत्रि मुनींनीं अनसूयेनें तप करून चित्रकूट पर्वतापर्यंत गंगेची धारा मंदाकिनी नांवानें कशी आणली याची कथा सांगितली. म्हणाले—"एकदां लागोपाठ चवदा वर्षें पाऊस पडला नाहीं व दुष्काळ पडला. ऋषि मुनि व पर्वत प्रदेशांत राहणारे लोक आणि पशु पक्षी पटापट मरूं लागले. परंतु हिच्या तपश्चर्येच्या प्रभावामुळें चित्रकूट पर्वत पुन्हां धनधान्यपूर्ण झाला." रामानें अनुसूयेचें चरित्र वर्णन करून सीतेला सांगितलें. सीतेनें अनसूयेला नमस्कार केला आणि पति सेवा सतत घडावी म्हणून तिचा आशीर्वाद मागितला.

अनसूयेनें सीतेला बसायला सांगितलें व म्हणाली—"तुझा पति गुणी व पराक्रमी आहे. पति हेंच तुझें दैवत ! सर्व वैभव, ऐश्वर्य व बंधुबांधव या सर्वांचा त्याग करून तूं पतिच्या सेवेसाठीं वनगमनास जाण्यासाठीं तयार झालेली पाहून माझ्या मनाला आनंद झाला. तूं अहंकार सोडून असेंच पातिव्रत धर्माचें पालन कर ! म्हणचे तुझा आदर्श पुढें ठेवून पुढील स्त्रिया वागतील व पातिव्रत धर्माचें पालन करतील. आतां तुला





माझ्या जवळ कांहीं मागावयाचें असल्यास मागून घे."

सीतेनें अनसूयेला नमस्कार केला व म्हणाली—"देवी! तुमच्या दर्शनानें व प्रेमळ आशीर्वादानें माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत. आणखी मी काय मागूं?"

सीतेचा तो विनम्रपणा पाहून अनसूयेच्या मनाचें समाधान झालें. तिनें सीतेला कुंकू लावलें व तिची ओटी भरून तिला एक साडी व खण आणि त्याबरोबर कांहीं आभूषणें पण देत म्हणाली—"मी तुला आणखी काय देणार? आतां तूं ही साडी नेसलीस म्हणजे माझ्या मनाचें समाधान होईल."

अनुसूयेनें दिलेली साडी नेसून सीतेनें तिला नमस्कार केला. नंतर अनसूयेनें सीतेला तिची जन्मकथा सांगावयास सांगितलें. सीता सांगूं लागली—

"मिथिलेचे महाराज जनक हे माझे वडील. यज्ञासाठीं जमीन नांगरीत असतां मी मिळालें. त्यांना त्या वेळीं मूल बाळ नव्हतें. म्हणून त्यांनीं मला आपल्या पट्टराणी-च्या हातांत देऊन मला मुलीसारखें मानून माझें पालन पोषण करण्यास सांगितलें. मी मोठी झालें तेव्हां माझ्या लग्नाची काळजी त्यांना लागली. त्यांनीं पुष्कळ शोध केला, पण मनासारखा योग्य वर न मिळाल्यामुळें त्यांनीं स्वयंवर रचला. त्यांच्याकडे शंकराचें एक धनुष्य होतें. तें वांकवून त्यावर जो प्रत्यंचा म्हणजे दोरी चढवील त्याला माझी कन्या सीता माळ घालील अशी त्यांनीं घोषणा केली. पण दिव्य शक्ति असल्या-शिवाय तें धनुष्य वांकविणें शक्य नव्हतें. महा पराक्रमी मानव व दानव वीरांनीं प्रयत्न करून पाहिला. पण कोणाला यश मिळालें नाहीं. माझ्या बाबांना निराशा वाटली व

त्यांनीं धनुष्य उचलून ठेवायचें ठरविलें. पण त्याच वेळीं विश्वामित्र मुनींच्याबरोबर रघुकुल तिलक रामचंद्र व लक्ष्मण दोघांनीं स्वयंवराच्या मंडपांत प्रवेश केला. विश्वामित्रांच्या आज्ञेनें प्रभूनें धनुष्यावर प्रत्यंचा चढविण्याचा यत्न केला. पण तें तुटलें. माझ्या वाबांनीं कन्या-दान करण्यासाठीं कलश मागविला. परंतु रघुराज, वडिलांची अनुज्ञा घेतल्याशिवाय विवाहास तयार झाले नाहींत. म्हणून माझ्या वडिलांनीं दशरथ महाराजांकडे दूत पाठवून त्यांना बोलविलें. सर्वांच्या आशीर्वादानें लग्न समारंभ पूर्ण झाला."

नंतर अनसूयेनें सीतेला आशीर्वाद देऊन निरोप दिला.

सीतेला नवीन वस्त्रें परिधान करून आलेली पाहून रामानें चकित होऊन विचारलें—"हें सर्व कोठें मिळालें?"

सीता म्हणाली—"हा अनसूया मातेचा आशीर्वाद आहे!"

सीता, राम व लक्ष्मण अत्रि मुनींनीं आग्रह केल्यावर त्या दिवशीं अत्री मुनींच्या आश्रमांतच राहाले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून व अत्रि अनसूयेचा निरोप घेऊन ते निघाले.

अत्रि महामुनि म्हणाले—"रामा! या वनांत नरभक्षक राक्षस देखील राहतात. त्यांचा त्रास तुला होऊं नये म्हणून तूं मी सांगतों त्या वाटेनें जा. त्या वाटेनें अनायास अनेक ऋषी व मुनींची भेट होईल."

अत्रि मुनींनीं दाखविलेल्या मार्गानें राम लक्ष्मणांनीं सीतेसह प्रस्थान केलें आणि दंडकारण्यांत प्रवेश केला.

[अयोध्याकांड संपूर्ण]



# अमून देवालय

इ. स. पूर्वी १३ व्या शतकांत इजिप्त देशांत कार्नाकजवळ प्रथम रामोसिस यानें निर्मिलेलें हें देवालय इजिप्त देशाच्या प्राचीन शिल्पकलेचें एक जिवंत स्मारक होय. या देवालयाचें क्षेत्रफळ ५४००० वर्ग फूट म्हणजे सुमारें सव्वा एकर आहे. त्याच्या खांबांचा व्यास १२ फूट व उंची ७० फूट आहे.



"समजदार तूं गंगे तुजला
वृथा कोप शोभत नाहीं!
विधि लिखीत जें असतें, होतें
टळत कदापी तें नाहीं !!"

"कोण विधाता दुसरा तुजविण,
कशास गप्पा या आतां?
विचारलें गंगेनें त्यावर
वदे—"ऐक मग खरें अतां!

"पटवुन तुजला काय देउं मी
हार मानतों तुझ्या समोर।
भगिनी गे अपराध आज हा
हातुन माझ्या घडला घोर!

"सर्वाधिक तूं पवित्र जगतीं
प्रसिद्ध विश्वामध्यें हें।
तद्वत पावन अग्निदेव पण
खचित जगाला माहित हें।

"शक्ति शालिनी जितकी तूं, तो
शक्तिशालि नाहीं हें खास!
तत स्वभावें तो, तवहृदयीं
सहनशीलता करते वास!

"अधिक तुझ्याशीं त्याची तुलना
करणें रास्त मला नाहीं!
तव जल विझविल क्षणांत त्याला
ठाउक कोणाला नाहीं!

"पिउनि आपलें पवित्र पाणी
थुंकुन 'शखण' सरोवरांत
देशील जर तूं, होइल शीतल
शरीर तव अन् शांति मनांत!"

"राग उतरला गंगेचा मग
गोड शब्द ते ऐकुनिया।
आणि परत ती लगेच आली
पृथ्वीवरती उतरुनिया॥






[ ७ ]

[ तिकडे ब्रह्मदंडी मांत्रिक कालभैरवाच्या समोर बसून होम करूं लागला. इकडे ब्रह्मपुराच्या राजाचा अंगरक्षक दो सैनिकांना बरोबर घेऊन अग्निपर्वतापर्यंत येऊन पोंचला. तेथें त्यांना लखूचा वृद्ध बाप भेटला. त्याला वाट दाखवायला सांगून सर्व डोंगर चढूं लागले. पुढें वाचा. ]

एका उंच जागेवर दगडाआड बसून जयमल डोंगराखालीं पहात होता. त्याला कोणी तरी चार जण डोंगर चढून येत असलेले दिसले. गुहेंत कालभैरवाची पूजा करून व जवळ लखूला बसायला सांगून ब्रह्मदंडी मांत्रिक मंत्रजाप करीत हवन करीत होता. कालभैरव लखूला प्रेरणा करील व त्या वेळीं सर्व दृश्य पहात बसणें हिताचें नाहीं उलट धोक्याचें आहे असें सांगून मांत्रिकानें जयमलला गुहेबाहेर पाठवून दिलें होतें. परंतु जयमल मधून मधून आंत डोकावून काय होत आहे हें पहात होता.

कालभैरवाची प्रेरणा मिळाल्यावर काय होतें हें जयमलला पहावयाचें होतें. मांत्रिक लखूला प्रेरणा झाल्यावर त्याच्याकडून भयंकर दरीची वाट व तेथील धनराशीच्या विषयीं



माहिती काढून घेणार आहे हें जयमलला माहीत होतेंच. ती माहिती काढून घेतल्या-वर क्रूर मांत्रिक लखूला बळी देखील देईल ही अंधुक शंका त्याच्या मनांत होती. भयंकर दरीचा मार्ग व त्यांतील धनराशीची माहिती जयमलला पण हवी होती. म्हणून तो जें कांहीं बोलेल तें ऐकून नीट लक्षांत ठेवणें अगत्याचें होतें.

जयमल हा विचार करीत शिखराखालीं पहात होता. त्यानें चौघांना वर चढून येत असतांना पाहिलें. पण चौघांपैकीं एक मागें वळून धांवत रानांत शिरला.

तिथे डोंगराकडे पहात मूर्तिवत होते. जयमलनें मागें वळून पाहिलें तेव्हां त्याला ते लोक काय पहात उभे आहेत हें उमगलें. गुहेतून काळा धूर बाहेर येत होता. हा धूर पाहूनच बहुतेक हे चकित झाले असावेत. आतां काय करावें? ब्रह्मदंडीला हें जाऊन सांगावें कीं स्वस्थ बसून गंमत पहावी?

अंगरक्षकानें एका सैनिकाला बातमी देण्यासाठीं ब्रह्मपुरास पाठविलें होतें. तोच पळत ब्रह्मपुराकडे निघाला होता. सुदैवानें त्याला एक म्हातारा घोडेस्वार भेटला. त्यानें त्याला आपली तलवार दाखवून त्याला घोड्यावरून खालीं ओढलें व स्वतः घोड्यावर बसून ब्रह्मपुरास येऊन पोंचला.

सिंह द्वार ओलांडून तो आंत गेला व "महाराज, महाराज!" असा ओरडत सुटला. त्याचा आवाज ऐकून नवीन सेनापतीनें पुढें येऊन त्याला विचारलें—"तूं स्वतः महाराजांनाच हाक मारीत कां सुटला आहेस? महाराज येणार आहेत का बाहेर? काय भानगड आहे?"

सैनिक भीत भीत म्हणाला—"सेनापति, मला महाराजांच्या अंगरक्षकानें पाठविलें आहे. डोंगराच्या एका गुहेतून धुराचे लोट







बाहेर येत आहेत. गुहेंत एक मांत्रिक राहतो. त्यानें पूर्वीच्या सेनापतीचा वध करविला होता. एका म्हाताऱ्यानें आम्हांला हें सर्व सांगितलें. ही बातमी सांगून कुमक पाठवायला विनंति केली आहे." सेनापति त्या सैनिकाला बरोबर घेऊन राजाजवळ गेला.

राजा, राजगुरु व सेनापतीनें सर्व हकीकत ऐकून त्या सैनिकाला विचारलें—"पण हा म्हातारा कोण आहे?"

"तो आम्हांला रानांत डोंगराच्या पायथ्याशीं भेटला होता. त्याच्या हातांत एक मोठी तलवार होती. तो रानांत राहून कंद-मुळें खाऊन आपला उदर निर्वाह करतो!" सैनिकानें थोडक्यांत त्याला माहीत होतें तें सांगितलें.

"गुहेंतून धूर येण्याचें कारण तो मांत्रिक व त्याची हवनादि कामेंच असतील कशावरून? शत्रु-सैन्य सुद्धां असूं शकेल!" राजगुरुनें शंका केली.

"तो मांत्रिकच आहे, त्या म्हाताऱ्यानें हेंच सांगितलें. त्यानें मांत्रिकाला कित्येक वेळीं पाहिलेलें आहे. त्याला त्याच्या गुहेची वाट देखील माहीत आहे." सैनिक म्हणाला.

"त्या विचित्र प्राण्याविषयीं त्या म्हाताऱ्याला माहिती आहे का?" राजानें विचारलें.

"तो विचित्र प्राणी त्या मांत्रिकानेंच पाठविला होता. तसा प्राणी जगांत नाहीं. त्या मांत्रिकानेंच मंत्रबळानें तो निर्मिला असावा असें तो म्हातारा सांगत होता. त्यानें स्वतः तो प्राणी आपल्या डोळ्यांनीं पाहिला आहे." सैनिक म्हणाला.

"राजगुरु! आतां काय करावें असें आपलें मत आहे?" राजानें विचारलें.

राजगुरु क्षणभर विचार करून म्हणाला—"त्या गुहेंत मांत्रिकच असावा यांत मला देखील शंका वाटत नाहीं. शत्रु सैनिक असते तर गुहेंतून धूर आलाच नसता. त्यांनीं धूर होऊंच दिला नसता. कारण त्यांच्या गुप्तस्थानाची माहिती आपल्याला त्या धुरामुळें मिळेल हें त्यांना कळतें. म्हणून मला असें वाटत आहे कीं हा सैनिक म्हणतो तसा तो मांत्रिकच असावा व त्यानें कांहीं तरी हवनकार्य आरंभिलें असावें. नाहींतर इतका मोठा धूर गुहेंतून येणें शक्य नाहीं. त्याला आपण शक्यतों करून जिवंत पकडला पाहिजे."

"तो एक दुष्ट व क्रूर मांत्रिक आहे. त्याला कैद करणें, आपल्याला वाटतें तितकें सोपें नाहीं." राजा म्हणाला.

"तें सर्व माझ्यावर सोडा. मला देखील थोडी मंत्रविद्या माहीत आहे. आजपर्यंत तिचा उपयोग करण्याचा प्रसंगच आला नाहीं. पण आतां मी प्रयोग करून पाहणार आहे. त्या दुष्टाला कसें कैद करावयाचें हें मला माहीत आहे." राजगुरु म्हणाले. नंतर सेनापतीकडे वळून ते पुढें म्हणाले—"सेनापति! माझ्याबरोबर जाण्यासाठीं निवडक दहा सैनिकांना तयार ठेवा!"



दहा मिनिटांच्या आंत राजगुरु दहा सैनिकांना बरोबर घेऊन सेनापतीसह घोड्यावर बसून निरोप घेऊन येणाऱ्या सैनिकाबरोबर निघाले. तो सैनिक वाट दाखवायला पुढें चालत होता आणि त्यानें रानांत व डोंगरावर जें कांहीं पाहिलें किंवा ऐकलें त्याचें वर्णन करीत तो जात होता.

जयमल गुहेच्या बाहेर एका दगडाआड बसून सर्व पहात होता. त्यानें राजगुरु व सैनिकांना येत असलेलें पाहिलें. तास दीड तासापूर्वी एक सैनिक मागें वळून जो पळत गेला तोच बहुतेक यांना बोलावून घेऊन








आला असावा, त्याला हें कळायला तितकासा वेळ लागला नाहीं. गुहेंतून धूर बाहेर येत होता म्हणून त्यांना शंका आली असावी कीं गुहेंत कोणीतरी मांत्रिक होम करीत असावा. तो भयंकर दरीच्या मार्गें ऐकण्यासाठीं तन्मय होऊन तिकडे लक्ष देऊन बसला होता त्याच्या गळ्यांत केव्हां दोरीचा फांस पडेल हें देखील त्याला माहीत नव्हतें.

जयमल गुहेकडे धांवला. आंत ब्रह्मदंडीचा खणखणीत आवाज एकाएकीं बंद पडला. त्याच वेळीं लखूचा आवाज त्याला ऐकूं आला. तो म्हणत होता—"विन्ध्यपर्वता-पलीकडचें रान ओलांडून गेल्यावर एक दरी लागेल. तीच भयंकर दरी. त्या दरींत एक मोठें पिंपळाचें झाड आहे. त्याच्या खालीं एक वारुळ आहे—" तें ऐकत असतां ब्रह्मदंडी कां कोणास ठाऊक खदखदां हंसला. "पुढें बोल, कालभैरवा! पुढें बोल!" असें म्हणत त्यानें लखूच्या खांद्यावर आपली कुबडी ठेवली.

"तें झाड पौर्णिमेच्या दिवशीं फळांनीं भारावून जातें. सिंहाच्या राजाला ठार करून त्याचें चर्म...." बोलतां बोलतां लखू थांबला. हातानें स्वतःचा गळा धरून उभा राहिला आणि लडखडत चालूं लागला.

लखू तसा उठलेला पाहून व त्याचें तें विचित्र वागणें पाहून ब्रह्मदंडी जोरानें ओरडला—"कोण तो, माझ्यावर मंत्राचा प्रयोग! अरे, त्यानें कालभैरवाचें तोंडच बंद केलें आहे." त्यानें जोरानें हुंकार केला. जयमल धांवत डोंगराच्या टोंकाला जाऊन खालीं पाहूं लागला. घोड्यावरून जे लोक थोड्या वेळापूर्वी आले होते त्यांच्यापैकीं एकजण घोड्यावरून उतरून कमंडलांत पाणी हातांत घेऊन व कांहीं तरी मंत्र



म्हणून जमिनीवर आपटीत होता. तो राजगुरु होता.

जयमल भ्याला, ब्रह्मदंडीबरोबर तो व लखू देखील पकडले जाणार. घोड्यावरून येणारां-पैकीं एक जण कोणी मांत्रिक आहे खास!

"गुरु गुरु........" जयमल गुहेकडे धांवला. "ब्रह्मपुराचे सैनिक डोंगर चढून येत आहेत." तो मांत्रिकाला म्हणाला.

मांत्रिक दांतानें ओठ चावीत म्हणाला—"ब्रह्मपुराचे सैनिक! असतील! त्यांचें आपल्याला काय भय! त्यांच्याबरोबर कोणी तरी मांत्रिक देखील आहे असें दिसतें. त्याचा बळी काळभैरवाला अर्पण केल्या-शिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं. त्यानें स्वतःच्या इष्ट दैवताचेंच तोंड बंद केल्यावर त्याला मुक्ति नाहीं!"

"त्या तुच्छ मांत्रिकानें कालभैरवाचें तोंड बंद करण्यापूर्वी कालभैरवानें सर्व कांहीं सांगितलें का गुरुवर?" जयमलनें विचारलें.

ब्रह्मदंडीच्या भुंवया ताठरल्या. त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या. त्यानें संशय मुद्रेनें जयमलला विचारलें—"म्हणजे, तूं लपून सर्व पहात होतास आणि ऐकत होतास?"

"हें काय गुरुवर! आपण मला बाहेर



रहायला सांगितलें नव्हतें का? मी पहाऱ्याला उभा होतों म्हणूनच ब्रह्मपुराचें सैन्य येत असलेलें मला दिसलें व मी धांवत येऊन आपल्याला सांगितलें. मी तेथें उभा नसतो तर मला हें सर्व कसें कळलें असतें व मी इकडे येऊन कसें सांगितलें असतें?"

तोंपर्यंत लखू बेशुद्ध स्थितींतच होता, म्हटलें तरी चालेल. तो ताडकन उठला. त्यानें चारी बाजूला पाहिलें आणि बोलूं लागला—"कोठें आहे मी? कोण आहें मी?" मांत्रिक त्याच्याजवळ गेला व हलुवार हातांनीं त्याच्या पाठीवर हात फिरवीत म्हणाला—











"तूं लखू! ब्रह्मदंडी मांत्रिकाच्या गुहेंत बसला आहेस. तो पहा कालभैरव! आपल्या उपासकांना ते मागतील तें देणारा कल्पवृक्ष!"

लखूनें कालभैरवाच्या मूर्तीकडे पाहिलें व म्हणाला–"पण कालभैरवाच्या डोळ्यांतली ज्योति थोडी कमी झाल्यासारखी वाटते!" त्यानें जयमलकडे वळून म्हटलें–"सर्वच विचित्र वाटत आहे जयमल! काय झालें काय?"

जयमल कांहीं उत्तर देणार इतक्यांत मांत्रिकानें मध्येंच त्याला अडविलें व म्हणाला– "कांहीं नाहीं, लखू! मीच थोडें दुर्लक्ष केलें. थोडा असावध होता. कोणीतरी तुच्छ मांत्रिकानें माझ्यावर वार केला आहे. तूं भिऊं नकोस. मी त्यालाच बळी देऊन कालभैरवाला शांत करीन."

"गुरुवर! आतां बोलण्यांत वेळ घालविणें बरोबर होणार नाहीं. शत्रु अगदीं जवळ येऊन पोंचला आहे. आपल्याला शोधीत थोड्या वेळानें येऊन पोंचेल. कोठें पळून जाऊं या." जयमल म्हणाला.

"पळून जाणार! कोण? महामांत्रिक ब्रह्मदंडी शत्रूला भिऊन पळणार? काय बोलतोस काय जयमल? कालभैरव पाठीशीं असतां माझ्या केसाला देखील धक्का लागणें शक्य नाहीं. कोण साहस करणार येथपर्यंत येण्याचें? मी येथूनच त्या मांत्रिकाचा समाचार घेतों पहा. त्यानें माझ्यावर मंत्र टकावा! त्यालाच कायमचा धडा मिळूं दे! तुम्ही दोघे पळा कोठें तरी आणि लपून बसा!" असें म्हणत मांत्रिक कालभैरवाच्या मूर्तीकडे निघाला.

लखूनें आपलें धनुष्य व बाण उचलून घेतले व जयमलबरोबर गुहेंतून बाहेर आला. दगडाआड लपतछपत दोघे हस्ती सरोवराकडे धांवले. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# नागमणि

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला–"राजा, तूं ही सर्व मेहनत कशासाठीं करतो आहेस? यांत कांहीं विशेष लाभ होईल अशी आशा आहे का तुला? ती फुकट आहे. कारण त्यांत धोका पण आहे. एका वैश्य कन्येनें देखील अशीच आशा बाळगून स्वतःचा जीव धोक्यांत घातला होता. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी तुला तिची गोष्ट सांगत आहें. ऐक!" असें सांगून वेताळानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

एका नगराबाहेर एक वडाचें झाड होतें. त्याच्या खोडाच्या पोकळींत एक सांप रहात असे. तो सांप रोज बाहेर येऊन झाडाखालीं वारा घेत पडून राही. गांवांतले लोक त्याला



प्यायला दूध देत व भक्तिभावानें त्याची पूजा करीत.

त्याच गांवांत एक श्रीमंत जव्हेरी रहात असे. तो हिऱ्यांचा व्यापार करी. त्याला एक अत्यंत रूपवती कन्या होती. जव्हेऱ्याचीच मुलगी, तिला रत्नाभूषणांचें जणुंकांहीं वेडच होतें. तिनें निरनिराळीं रत्नें जमा करून ठेवलीं होतीं. रोज तीं रत्नें पाहून तिच्या मनाला एक प्रकारचा आल्हाद वाटे. पण तेवढ्यानें तिच्या मनाचें समाधान होत नव्हतें. तिच्या रत्नांत नागमणि रत्न नव्हतें. नागमणि उत्तम जातीच्या नागाच्या डोक्यांत असतो. पण तो मिळणार कसा? ज्या वस्तूचा अभाव असतो त्या वस्तूची गरजच जास्त वाटूं लागते. हा मनुष्याचा स्वभावधर्म आहे. त्याप्रमाणें वैश्यकन्येला नागमणी रत्नाचा अभाव भासूं लागला. तिच्याजवळ एकाहून एक सुंदर लहान मोठीं रत्नें होतीं. पण तीं सर्व नागमणीच्या समोर तिला फिकीं वाटत होतीं.

तिनें वडाच्या पोकळींत राहणाऱ्या सांपाची कीर्ति ऐकली होती. त्याला मारून त्याचा मणी जर कोणी आणून दिला तर किती बरें होईल असा विचार करून तिनें एका भिल्लाला बोलवून त्याला पैशाचा लोभ दिला व त्या सांपाला ठार करून तो नागमणी आणून द्यायला सांगितलें.

त्या भिल्लानें पैशाच्या लोभानें त्या देवतुल्य नागाला ठार केलें व त्याचा नागमणी काढून वैश्यकन्येला आणून दिला. तो मणी मिळाल्यावर तिला परमानंद झाला. तो नागमणी वैश्यकन्या सदा नि कदा आपल्या कुंकवावर लावून ठेवी.

आपल्या एका निरपराध वंशजाची केवळ हौसेखातर झालेली हत्या पाहून नागराज वासुकीला राग आला. त्यानें या हत्येचा



सूड घेण्याचें ठरवून मनुष्यरूप घेतलें व तो त्याच गांवीं येऊन राहूं लागला.

गांवांत एक तरुण जव्हेरी व्यापार करण्यास आल्याची गोष्ट वैश्यकन्येच्या बापाला पण कळली. तरुण जव्हेरी गांवच्या मोठमोठ्या श्रीमंतांना मेजवान्या देई. एकदां स्वतः राजादेखील मेजवानी साठीं जातीनें हजर होता. त्याचें वैभव पाहून त्या गांवचे लोक चकित झाले.

वैश्यकन्येच्या बापानें या नव्या व्यापाऱ्याशीं ओळख करून घेतली व त्याला आपल्या घरीं जेवायला बोलाविलें. तो अविवाहित आहे व इतका श्रीमंत आहे हें पाहून आपल्या कन्येशीं त्याचा विवाह करून द्यावा असाहि एक विचार त्याच्या मनांत आला.

ओळख वाढली आणि वैश्यकन्येचा विवाह तरुण जव्हेऱ्याशीं ठरला. त्याच्या सारखा सुंदर व श्रीमंत जांवई त्रिलोकांत मिळणें अशक्य होतें.

वैश्यकन्येनें तरुण जव्हेऱ्याच्या रूपलावण्याची व श्रीमंतीची कीर्ति ऐकलीच होती. वडिलांबरोबर बैठकींत बसून तो बोलत बसे तेव्हां ती डोळे भरून त्याचें रूप पाहून खूष होई.



विवाहाचा मुहूर्त ठरला. विवाहाची तयारी सुरू झाली. वासुकी रोज आपल्या वधूसाठीं करंडक भरभरून रत्नें पाठवूं लागला. तीं पाहून वैश्यकन्येला आनंद गगनांत मावेनासें झालें.

लग्नसमारंभ थाटामाटानें पार पडला. विवाहोत्तर संस्कार संपल्यावर जांवई बापू सासऱ्याच्या आग्रहानें सासुरवाडीच राहूं लागले. नवदंपतीसाठीं शयनगृह सजविण्यांत आलें. सकाळीं छान उजाडलें तरी नवदंपती झोपलेली पाहून वैश्यकन्येच्या नातेवाइकांनीं तिला जागी करण्यासाठीं अनेक उपाय केले.

मंगलवाद्यें वाजविलीं पण आंतून कांहींच आवाज न आलेला पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. पति किंवा पत्नी दोघांपैकीं कोणीच उठून दार उघडलें नाहीं. शेवटीं दार फोडून सर्व आंत गेले तों वधू पलंगावर मरून पडलेली. जांवई बापू तेथें नव्हते. एक काळा सांप खिडकीच्या भोकांतून बाहेर जात असलेला सर्वांना दिसला. वधूच्या अंगावर सांप चावल्याचे व्रण एका जागीं स्पष्ट दिसत होते.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा, मला एक शंका येते. जव्हेऱ्याच्या मुलीला रत्नांची एवढी हाव होती हें मला पटतें. पण नागमणीसाठीं तिनें एवढा हट्ट कां धरावा ? तिनें विना कारण या हट्टास्तव आपला जीव धोक्यांत घातला असें नाहीं का तुला वाटत ? नागमणी रत्नांत विशेष असें काय आहे ? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

विक्रमार्क म्हणाला—"नागमणी रत्नांत विशेष असें कांहीं नाहीं. त्यांत जव्हेऱ्याच्या मुलीनें त्याच्यासाठीं इतका हट्ट धरावा, असें कांहीं विशेष त्यांत असेल असें मला मुळींच वाटत नाहीं. तिच्याजवळ खंडीभर रत्नें होतीं. परंतु नागमणी रत्न तिच्याकडे नव्हतें. स्त्री जातीचा स्वभाव थोडा विचित्रच असतो. जी वस्तु त्यांच्याजवळ नसते त्याच वस्तुसाठीं त्या हट्ट धरतात. त्या वस्तूच्या किमतीपेक्षां त्या वस्तूचा अभावच त्यांना जास्त भासतो !"

अशा तऱ्हेनें मौनभंग झाल्यामुळें वेताळ प्रेतावरोबर नाहींसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.





# मण्याचें महात्म्य

सारंगधर नांवाचा एक राजा होता. त्याला दोन मुलें होतीं. मोठ्याचें नांव धवलकांत व धाकट्याचें नांव प्रवलकांत असें होतें. राजाच्या प्रधानाला रत्नवती नांवाची एक रूपवती कन्या होती. धवलकांत व रत्नवती लहानपणापासून बरोबर खेळलीं व वाढलीं. अर्थातच त्यांचें परस्परांवर प्रेम वाढत गेलें. वयांत आल्यावर रत्नवतीनें धवलकांतशींच लग्न करण्याचा निश्चय करून तसें आपल्या वडिलांना सांगितलें. सर्वांना तें ऐकून आनंदच झाला. लग्नासाठीं राजा व प्रधान दोघांनीं राजपुरोहितांच्या सल्ल्यानें मुहूर्त ठरविला.

पण त्यानंतर एक दिवशीं धवलकांत बागेंत फिरायला गेला असतां त्याला एकाएकीं सांप चावला. सांपाच्या विषामुळें त्याचें सर्व अंग काळें पडलें. राजवैद्यांनीं येऊन औषधोपचार केला म्हणून धवलकांत वांचला. परंतु विषाचा एक विंदु शरिरांत राहून गेल्यानें पुन्हां कांहीं दिवसांनीं त्याचें सर्व अंग काळें पडलें. त्याच्या अंगाला वास येऊं लागला. त्याला कमी दिसूं लागलें व सर्व अंग ठणकूं लागलें.

पुन्हां राजवैद्य आले व त्यांनीं औषधोपचार सुरू केले. परंतु गुण पडला नाहीं. मांत्रिक व डोंगराळ प्रदेशांत राहणारे कांहीं वैद्य आले व त्यांच्या पैकीं एकानें रोग्याची परीक्षा करून एक औषध सांगितलें. मानस सरोवरानजीकच्या कृष्णवनांत 'अमृतवल्ली' नांवाची एक वनस्पति आहे. त्या वेलाची पानें आणून त्यांचा रस सर्व अंगाला चोळला तर रोग पूर्ण बरा होईल. परंतु हें सर्व काम तीन महिन्यांच्या आंत पुरें झालें पाहिजे.

श्री. ना. गो. पाटील



पण तेथें जाणार कोण आणि तें काम करणार कोण ? तें एक दुस्साध्य व साहसाचें काम होतें. सर्व परस्परांचीं तोंडें पाहूं लागले. पण धवलकांतला राहवलें नाहीं. त्याचें मोठ्या भावावर जिवापलीकडे प्रेम होतें. त्याचा जीव धोक्यांत असतां त्याला कसें स्वस्थ राहवेल ? तो म्हणाला—"कोणी जावो किंवा न जावो, मी जाऊन ती अमृतवल्ली घेऊन येतो." असें सांगून तो निघाला देखील.

तो येईपर्यंत धवलकांतची सेवा शुश्रूषा करणें आवश्यक होतें. दासदासी पुष्कळ होत्या. पण जिव्हाळ्याचें कोणीच नव्हतें. तेव्हां रत्नवती पुढें येऊन म्हणाली—"मी त्यांना मनानें वरलें आहे. त्यांच्याशीं माझें लग्न झालें असो किंवा नसो. तेच माझे पति आहेत. म्हणून मीच त्यांची सेवा करतें."

राजा व राणी दोघांनीं किती समजावून सांगितलें कीं सेवेला दासदासी आहेत. तूं एकटी किती दिवस सेवा करणार ? एक दोन दिवसांचा प्रश्न असता तर हरकत नव्हती. तीन महिने सतत जागरणें करणें तुला झेंपणार नाहीं. इतकें करून वेळेवर तो वेल मिळतो कीं नाहीं कोण जाणें ? काम तरी सोपें आहे का ? नोकरचाकर देखील ज्या कामाला हात घालायला तयार नाहींत तें काम तूं करणें आम्हांला पसंत नाहीं.

पण रत्नवतीनें आपला हट्ट सोडला नाहीं. म्हणून तिचें म्हणणें मान्य करावें लागलें. त्या दिवसापासून रत्नवती एकटी सेवा करूं लागली.

धवलकांतला कमी दिसत होतें तरी रत्नवतीच सेवा करीत असल्याचें त्याला कळलें. त्यामुळें त्याला क्षणभर बरें वाटलें. परंतु पुन्हां विचार आला आपल्यासाठीं तिनें इतके कष्ट सोसावे हें त्याला पसंत नव्हतें. एकदां त्याच्या मनांत आलें कीं तिला सांगावें कीं तूं वचनांतून मुक्त आहेस. पाहिजे तर आणखी कोणाशीं लग्न करून घे. पण पुन्हां दुसरें मन सांगे कीं तिला त्यामुळें दुःख होईल. इतक्या भक्ति भावनेनें ती सेवा करीत आहे त्या सेवेचा असा अपमान केला तर तिला जास्तच दुःख होईल. म्हणून तो कांहींच बोलला नाहीं. असाच कांहीं काळ लोटला.

* * *

तिकडे धवलकांत घोड्यावर बसून वायु-वेगानें एका महिन्यांत आपली जबाबदारी पुरी करण्यासाठीं हिमालय पर्वतांत पोंचला. मानस सरोवराच्या कांठीं एका झाडा-खालीं बसून तो विचार करूं लागला कीं हें सरोवर पार करून पलीकडे कसें जावयाचें ? झाडावर कोणी बोलत अस-ल्याचा आवाज ऐकूं आला. डोकें वर करून पाहिलें तर तें एक गरुडांचें जोडपें होतें. मादी म्हणाली—"हा सांप प्रत्येक वेळीं येऊन अंडीं खाऊन जातो. अंडीं कोठें घातलीं तरी एका पंधरवड्यांत तो येऊन तीं खाऊन





जातो. ह्या सांपाला मारायला कांहीं उपाय नाहीं का ? आपल्या पिलांचें रक्षण करण्याचा कांहीं उपाय नको का करायला ?

त्यावर नर म्हणाला—"हा सांप फक्त आपल्यालाच त्रास देत आहे असें नाहीं. राजा सारंगधर याचा मोठा मुलगा धवलकांत याला देखील तो चावला आहे आणि आतां त्याचा मृत्यु जवळ येऊन ठेपला आहे. त्याच्या औषधासाठीं अमृतवल्लीचा पाला आणण्याकरितां त्याचा धाकटा भाऊ आला आहे. त्या अमृतवल्ली वेलाच्या चारी बाजूला कित्येक सांप बसले आहेत. म्हणून तो त्या वेलापर्यंत पोचूं शकेल की नाहीं याचीच शंका आहे." तें ऐकून प्रवलकांत पुढें आला व त्या पक्ष्यांना नमस्कार करून म्हणाला—"मी तुमचें बोलणें ऐकलें आहे. तुम्हांला त्या सांपानें इतका त्रास दिला आहे तर त्याला ठार केल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं मी आपला प्राण पणाला लावून त्या सांपाला ठार करीन व अमृतवल्ली वेलाचा पाला घेऊन जाईन."

तेव्हां गरुडाचें जोडपें त्याला म्हणालें—"राजकुमार ! तुला वाटतें तितकें हें काम सोपें नाहीं. त्या सांपाला एक वर आहे. त्याचा वैरी त्याला दिसल्याबरोबर त्या सांपाच्या अंगांत दुप्पट शक्ति येते व त्याची लांबी पांचपट वाढते."

"तुम्ही म्हणतां तें खरें असलें तरी प्राण्याला मृत्यु हा केव्हांतरी येतोच हें देखील तितकेंच खरें आहे. तो सांप या नियमाला खास अपवाद नाहीं." प्रवलकांत म्हणाला.

राजकुमाराचें साहस व निश्चय पाहून गरुड जोडप्याच्या मनाचें समाधान झालें. गरुड म्हणाला—"तरमग मी एक गुपित सांगतों तें ऐक. पक्ष्यांचें उष्टें त्या सांपाच्या घोटांत गेलें तर तो तत्काल मरून जाईल. म्हणून त्याचा पक्ष्यांच्या जातीवर इतका राग आहे."

तें ऐकून प्रवलकांतला एक युक्ति सुचली. तो पक्ष्यांना थांबायला सांगून एका ऋषीच्या आश्रमांत गेला व गाईचें दूध मागून घेऊन आला. सांपाला दूध फार आवडतें हें त्यानें ऐकलें होतें त्यानें पक्ष्यांना त्यांतलें थोडें दूध प्यायला सांगितलें. त्यानंतर तें उष्टें दूध पक्ष्यांनीं सांगितल्या जागीं ठेवून तो एका जागीं लपून बसला. सांप त्या वाटेनें रोज जात येत असे. नित्याप्रमाणें तो आला व प्रवलकांतनें अनुमान केल्याप्रमाणें दूध पाहून त्याला मोह आवरला नाहीं. त्यानें एका घोटांत सर्व दूध पिऊन टाकलें. प्याल्याबरोबर तो ताडाच्या झाडाएवढा मोठा झाला आणि भडभड ओकून तत्काळ मरण पावला.

पक्ष्यांचा हाडवैरी मेला. त्यांना फार आनंद झाला. ते प्रकालकांतचे आभार मानून म्हणाले—"राजकुमार, तुला आपल्या कामीं आतां पूर्ण यश मिळेल. त्या सांपाचा फणा कापून त्यांतला मणी काढून घे. झाडाच्या फांद्या कापून एक जुजुबी नाव





करून घे आणि तींत बसून सरोवरापलीकडे जा. नावेची दोरी आम्ही चोंचीत धरून तुला पलीकडे ओढून नेतों. त्या मण्याच्या उजेडांत तुला दाट काळोखांत देखील दिवसा-सारखा उजेड दिसेल. तूं त्या कृष्ण वनांत जाऊन अमृतवल्लीचा पाला घेऊन ये. या मण्याचा उजेड असेपर्यंत तेथील सांप तुझ्या-जवळ येण्याचें साहस करणार नाहींत."

धवलकांतनें पक्ष्यांनीं सांगितल्याप्रमाणें केलें आणि अमृतवल्लीचा पाला घेऊन तो पक्ष्यांच्या मदतीनें मानस सरोवर पार करून पुन्हां परत आला. त्याला निरोप देतांना पक्षी म्हणाले—"तुला हा जो मणी मिळाला आहे त्याचें महात्म्य समजून घे. रोगी माणसानें हातांत घेतला तर त्याचा रोग तत्क्षणीं बरा होईल. एखाद प्रसंगीं जर मणी काळा पडला तर पुढें काय करायचें हें तुला सुचेल."

* * *

धवलकांत वेळेवर घरीं परत आला व त्यानें अमृतवल्लीचा पाला वैद्यांना दिला. त्यांनीं त्याचा रस काढून अंगाला लावल्या-बरोबर त्याचें सर्व अंग पुन्हां पहिल्यासारखें गोरें झालें. रत्नावतीला फार आनंद झाला. तिच्या प्रयत्नामुळेंच धवलकांत इतके दिवस जगला होता.

ती त्या दिवशीं स्नानास गेली तेव्हां तिला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं तिच्या सर्व अंगावर पुन्हां देवीचे व्रण पडतात तसे काळे डाग पडले होते. केस विंचरूं लागली तेव्हां केस निघून येऊं लागले. राजकुमाराची सेवा करीत असल्यामुळें तिच्या अंगांत विष भिनलें होतें. तिला फार वाईट वाटलें. आतां त्या स्थितींत कोणी तिला पाहिलें तर तोंड फिरवून घेतील असा विचार करून ती पळून गेली.



बरेच दिवस तिचा शोध केल्यावर देखील तिचा पत्ता न लागल्यामुळें धवलकांतचें एका राजकन्येशीं लग्न ठरलें. धवलकांत रोज देवदर्शनासाठीं देवळांत जात असे. एके दिवशीं रत्नवती एका भिकारणीचा वेष घेऊन त्याच्याकडे पहात बसली होती. पण तिच्या रूपांत बदल झाल्या कारणानें धवलकांत तिला ओळखूं शकला नाहीं.

धवलकांत लग्नास तयार नव्हता. तब्येत बरी झाल्यापासून त्यानें रत्नवतीच्या नांवाचा ध्यास धरला होता. तो देवदर्शनास जाई तेव्हां देखील तो देवाजवळ एकच एक मागणें मागी कीं रत्नवती जेथें असेल तेथें सुखी असूं दे. त्या दिवशीं पुजाऱ्याला देवळाच्या तलावाच्या घाटावर एक अंगठी सांपडली. त्यावर धवलकांतचें नांव होतें. राजकुमार देव दर्शनाला आला तेव्हां त्यानें ती अंगठी त्याला दिली. आपल्या प्रेमाची खूण म्हणून धवलकांतनें एकदां ती अंगठी रत्नवतीला दिली होती.

धवलकांतला संशय आला, कदाचित रत्नावतीनें त्या तलावांत जीव तर दिला नसेल. कदाचित ती अशक्त झाल्यामुळें बोटांतून अंगठी गळून पडली असेल. जिच्या



मदतीमुळें मला आरोग्यलाभ झाला तीच जिवंत नसल्यावर आपण तरी जगून काय करायचें आहे. असा विचार करून त्यानें तलावांत उडी टाकली.

रत्नवतीची नजर राजकुमारावर होती. ती त्याच्या पाठोपाठ तलावाच्या काठीं गेली. तिनें पुजाऱ्याला सांगून राजकुमाराला वांचविलें आणि म्हणाली—"मी अजून जिवंत आहें. पण मी हें रूप घेऊन एका युवराजाशीं कसें लग्न करूं? म्हणून मी बाजूला सरलें. आतां आपण दुसरें लग्न करून प्रजेला सुखी करावें."

धवलकांतनें तिला ओळखलें. म्हणाला—"मला राज्य नको. तूं माझें रक्षण केलेंस तसें तुझें रक्षण करण्यासाठीं मी आपलें जीवित वेंचायला तयार आहें. राज्य करायला माझा धाकटा भाऊ आहे."

त्याच वेळीं प्रवलकांत भावाचा शोध काढीत तेथें आला. त्यानें दोघांचें संभाषण ऐकलें होतें. त्याच्या हातांतला मणी तितक्यांत काळा पडला व त्याला पक्ष्यांनीं सांगितलेलें मण्याचें महात्म्य आठवलें. त्याबरोबर त्या प्रसंगीं काय करायचें हें देखील त्याला सुचलें. त्यानें तो मणी रत्नवतीच्या हातांत दिला. तिनें हातांत मणी घेतल्याबरोबर मणी पुन्हां चमकूं लागला. तिच्या अंगावरचे सर्व डाग नाहींसे झाले. तिघं चकित होऊन परस्परांकडे पाहूं लागलीं.

रत्नवतीनें तो मणी प्रवलकांतला परत दिला. त्यानंतर धवलकांतचें रत्नवतीशीं थाटा-माटानें लग्न झालें आणि प्रवलकांतला त्याच्या प्रयत्नांत यश मिळाल्याबद्दल मनाला समाधान वाटलें.





# गुणी गणोबा

गणोबांच्या आईनें विचार केला, आतां याचें लग्न करून टाकावें. पण गांवांत कोणी त्याच्या जोगती मुलगी मिळेना. मुली नव्हत्या असें मुळींच नाहीं, पण अशा विक्षिप्त माण-साला कोण मुलगी देणार? गणोबांना आपल्या लग्नाची काळजी कधींच नव्हती. आईनें लग्न ठरविलें तर त्यांनीं नकार पण दिला नाहीं.

गांवांत मुलगी मिळेना म्हणून आईनें परगांवीं जाऊन एक मुलगी पाहिली. भटजींना बोलावून मुहूर्त ठरविण्यासाठीं पाठविलें. ती मुलगी रंगारूपानें चांगली होती. गरिबाची मुलगी होती. आईवडील लहानपणीच वारले म्हणून एका श्रीमंत माणसानें दया करून तिला आपल्या घरीं लहानाचें मोठें केलें. ती त्याच्या घरीं सर्व कामें करी. तिचें नांव कमला होतें. त्या श्रीमंत माणसाच्या उदारवृत्तीची 'खरी ओळख' कमलाच्या विवाहाच्या वेळीं सर्वांना पटली. जो कोणी शंभर रुपये कन्याशुल्क म्हणून देईल त्याच्याशीं कमलाचें लग्न करून देईन असें त्यानें कित्येकांना म्हटलें. गणोबांच्या आईनें शंभर रुपये देण्याचें कबूल करून तें लग्न ठरविलें.

गणोबांनीं आपलें लग्न ठरल्याची बातमी आपल्या मित्रांना दिली. मुलीला पाहिलेंस का मित्रांनीं त्यांची थट्टा उडविली. गणोबांनीं गुपचुप जाऊन मुलगी पाहून यायचें ठरविलें आणि निघाले. वधूसाठीं एखाद दागिना विकत घ्यावा असें सांगून ते निघाले.

मुलगी सकाळीं उठून गाईचें दूध काढते हें आईच्या तोंडून गणोबांना कळलें होतें.

लग्न एकाशीं, ठरलें दुसऱ्याशीं ]

[ श्री शा. मो. पवार



त्यावेळीं जाऊन तिला पाहून व शक्य झालें तर खूण म्हणून कांहींतरी तिच्या हातांत ठेवून येण्याचा विचार करून गणोबा शंभर रुपये घेऊन निघाले.

अर्ध्या वाटेवर गणोबांना एक गाडी दिसली. गाडीला बैल नव्हता. एक तरुण जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला होता व त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न एक तरुण स्त्री करीत होती. तो तरुण शुद्धीवर आल्यावर ती स्त्री म्हणाली—"आतां काय करायचें? तुम्हांला एवढें लागलें आहे आणि या रानांत कोणी नाहीं!"

त्याच वेळीं गणोबा पुढें येऊन म्हणाले—"कांहीं घाबरण्याचें कारण नाहीं. काय हवें तुम्हांला सांगा, मी मदत करायला तयार आहें. परोपकारार्थमिदं शरीरं....".

"माझें नांव पांडू. उजाडण्याच्या आधीं परगांवीं जायला म्हणून आम्ही दोघे निघालों. बैल नव्हता व हिला चालवेना. म्हणून मी हिला गाडींत बसवून स्वतःच येथपर्यंत गाडी ओढीत आणली. काळोखांत ठेंच लागली व खालीं पडलों. आतां गाडी ओढणें अशक्य आहे. उजाडण्यापूर्वी आम्ही आपल्या गांवीं पोंचलों नाहीं तर आम्हां दोघांना आयुष्यभर रडावें लागेल." तो तरुण म्हणाला.

"एवढेंच ना? देवाच्या दयेनें माझ्या अंगांत तुम्हांला दोघांना घेऊन जायला पुरेशी शक्ति आहे. दोघें गाडींत बसा मी घेऊन जातों तुम्हांला!" गणोबा म्हणाले.

"तुमचे हे उपकार आम्ही आयुष्यभर विसरणार नाहीं." असें म्हणत दोघं गाडींत बसलीं. गणोबांनीं गाडी ओढीत असतां विचारलें—"तुम्ही दोघें पतिपत्नी का?"

"आमचें दोघांचें अजून लग्न झालें नाहीं. गांवीं पोंचल्यावर देवळांत जाऊन लग्न करायाचें आम्ही ठरविलें आहे. ही एक अनाथ



मुलगी आहे. एका श्रीमंताच्या घरीं राहते व काम करते. त्या श्रीमंतानें हिची गरिबी पाहून हिला आपल्या घरीं लहानपणापासून ठेवून घेतलें व लहानाचें मोठें केलें. मी शेजारच्या घरी काम करतों. आमचें परस्परांवर कित्येक दिवसांपासून प्रेम आहे. मी त्या श्रीमंताला जाऊन सांगितलें कीं आम्ही दोघं लग्न करून तुमच्या घरीं नोकरी करूं. पण तो म्हणाला—"जो कोणी शंभर रुपये देईल त्याच्याशीं मी ह्या मुलीचें लग्न करून देईन." उद्यां सकाळीं कोणीतरी येऊन शंभर रुपये देऊन मुलगी घेऊन जातों असें वचन देऊन गेला आहे म्हणे. त्याच्या वतीनें त्याची आई आली होती व उद्यां भटजी येणार आहे. तो एक खुळा व मूर्ख आहे हें ऐकून ही घाबरून गेली व माझ्याकडे धांवत आली. आम्ही तावडतोब पळ काढला. पण अर्ध्या वाटेंत मी ठेंच लागून पडलों आणि देवासारखे येऊन तुम्ही समोर उभे राहिलात." पांडू म्हणाला.

त्याचें बोलणें संपतांच गणोबा गाडी थांबवून उभे राहले आणि त्यांनीं विचारलें—"या मुलीचें नांव काय?"

"कमला!" पांडू म्हणाला.



"तरमग पळून जाण्याचें काय कारण? चला परत!" गणोबा म्हणाले आणि त्यांनीं गाडी वळविली.

"थांबा थांबा! कोणी त्या गांवांत आम्हांला असे बरोबर येत असतांना पाहिलें तर ते दोघांपैकीं एकाला देखील जिवंत सोडणार नाहीं!" पांडू म्हणाला.

"त्या श्रीमंताला शंभर रुपये देऊन टाक आणि लग्न करून मोकळा हो!" गणोबांनीं उपाय सुचविला.

"तोच तर प्रश्न आहे. रुपये आणायचे कोठून?" पांडू म्हणाला.

“मी देतों !” गणोबा म्हणाले.

तिथे गांवांत पोंचले तेव्हां कमला पांडूबरोबर पळून गेल्याचें ऐकून तो श्रीमंत रागाच्या भरांत पोलीस ठाण्यावर निघत होता.

गणोबा येऊन त्याला म्हणाले—“हे घ्या शंभर रुपये ! कमलाचें पांडूशीं लग्न करून द्या. शंभर रुपये देणाऱ्याशीं तुम्ही लग्न करून देईन म्हणाला होतां ना ?”

“हो, पण कमलाचें लग्न गणोबांशीं करून द्यावें मी कबूल केलें आहे त्यांच्या आईजवळ. उद्यां परवां रकम येईल देखील.” तो श्रीमंत म्हणाला.

“मीच तो गणू ! ह्या दोघांचें कित्येक दिवसापासून परस्परांवर प्रेम असतां कमलाशीं लग्न करणें मला शोभणार नाहीं व तें देखील पैशाच्या बळावर !” गणोबा म्हणाले.

तें ऐकून पांडू व कमला दोघांनीं गणोबांचे पाय धरून त्यांना नकळत खुळा व मूर्ख म्हटल्याबद्दल त्यांची माफी मागितली.

गणोबांची ती परोपकारबुद्धि पाहून त्या श्रीमंताचें दगडाचें हृदय देखील पाझरलें व त्यानें ती रकम घेण्याचें नाकारलें. म्हणाला—“मला पैशाची किंमत नाहीं, माणसाची आहे ! त्या दोघांचें लग्न झालें तर मला आनंदच होईल.”

“कां ? त्यांत काय ? दोघं पैसे देऊं शकले नाहींत. आतां मी त्यांच्या वतीनें देत आहें. तुम्हीं घेतलेच पाहिजे.” गणोबा म्हणाले.

त्या श्रीमंतानें गणोबांच्या आग्रहानें ते शंभर रुपये घेतले व त्या दोघांचें लग्न करून देऊन ते शंभर रुपये कमलाला दिले.

गणोबा आपल्या घरीं परत गेले.

[ पुढील अंकीं आणखी एक गोष्ट ]





# * नागयज्ञ *

धौम्य नांवाचे एक ऋषी होते. त्यांच्या जवळ विद्याभ्यासासाठीं तीन शिष्य येऊन राहाले. शिष्यांची गुरुभक्ति व श्रद्धा यांची परीक्षा घेण्यासाठीं गुरु त्यांना नाना तऱ्हेचीं कामें सांगत.

वेद नांवाच्या शिष्यानें गुरूची सर्व प्रकारें सेवा करून विद्याभ्यास पुरा केला आणि गुरुदक्षिणा देऊन व गुरूचा निरोप घेऊन गृहस्थाश्रमांत प्रवेश केला. त्याच्याकडे देखील विद्याभ्यासासाठीं कित्येक शिष्य येऊन राहूं लागले. गुरुगृहीं फार कष्ट सहन केल्यानेंच कीं काय, वेद आपल्या शिष्यवर्गाला अगदीं सोपीं व सहज करतां येण्यासारखीं कामें सांगत असे. आपल्या शिष्यांची तो स्वतःच्या मुलाप्रमाणें काळजी वाही.

वेद याच्याकडे उदंक नांवाचा एक शिष्य होता. विद्याभ्यास पुरा झाल्यावर गृहस्थाश्रमांत प्रवेश करण्यापूर्वी तो आपल्या गुरूचा आशीर्वाद घेण्यासाठीं गेला असतां त्यांना म्हणाला—“गुरुवर्य ! गुरुदक्षिणा देण्याची इच्छा आहे. काय देऊं, आज्ञा व्हावी.”

“मला तें सर्व कांहीं माहीत नाहीं. तूं गुरुपत्नीस जाऊन विचार, त्यांना विचार, काय हवें तें.” वेद म्हणाला.

गुरुपत्नी उदंकला म्हणाली—“चार दिवसांनीं पुण्यक व्रत आहे. त्यासाठीं पौष्य राजाच्या राणीचीं कुंडलें हवी आहेत. तूं तीं मागून आणून दे.”

उदंक पौष्य राजाकडे गेला आणि येण्याचें कारण सांगून निवेदन केलें कीं गुरुपत्नीस




कुंडलें मिळाल्यास त्यांचें व्रत पुरें होईल व मी गुरुऋणांतून मुक्त होईन.

राजानें अंत:पुरांत जाऊन राणीकडून कुंडलें मागून घ्यायला सांगितलें. उदंकनें अंत:पुरांत जाऊन व राणीजवळ कुंडलें मागून गुरु ऋणांतून मुक्त होण्यास सहाय्य करण्यास विनंति केली. राणीनें आनंदानें आपलीं कुंडलें काढून दिलीं व म्हणाली—"पण एक गोष्ट तुला सांगून ठेवतें, या कुंडलांवर तक्षकाची नजर पडली आहे. त्याच्या हातून याचें रक्षण तूं कसें काय करणार हें आतां तूंच पहा!"

उदंकनें राजाचे व राणीचे आभार मानले व निरोप घेऊन निघाला. परंतु राजानें फार आग्रह केल्यावरून जेवावयास थांबला.

उदंक पानावर बसला. पानावर भात वाढल्याबरोबर भातांत उदंकला एक केस दिसला. त्याचा त्याला राग आला व त्यानें पौष्य राजाला अशुद्ध जेवण वाढल्याबद्दल शाप दिला कीं तुला अंधत्व येईल. ब्राह्मणानें निष्कारण शाप दिलेला पाहून राजानें पण त्याला उलट शाप दिला कीं तुला अपत्यलाभ होणार नाहीं.

दोघांनीं रागाच्या भरांत परस्परांना शाप देऊन टाकला. एका क्षुल्लक कारणासाठीं शाप दिल्याबद्दल उदंकला पश्चात्ताप वाटला व त्यानें आपला शाप परत घेतला. पण पौष्य राजाला आपला शाप परत घेण्याची शक्ति नव्हती.

उदंक कुंडलें घेऊन गुरूकडे निघाला. वाटेंत एका जागीं एक तलाव पाहून स्नान संध्यादि करण्यासाठीं तो थांबला. कुंडलें काठावर ठेऊन तो स्नानासाठीं पाण्यांत उतरला. तो तिकडे वळल्याबरोबर तक्षकानें पाठीमागून कुंडलें उचलून घेतलीं.

तक्षक दिगंबर रूपानें उदंकच्या पाठोपाठ येत होता. त्यानें कुंडलें उचलल्याचें उदंकला कळलें व तो परतला. तक्षक पळाला. उदंकनें त्याचा पाठलाग करून त्याला धरलें. परंतु तक्षक नागरूप घेऊन बिळांत शिरला आणि नागलोकीं निघून गेला.

उदंकनें बीळ खणलें आणि नागलोकांत प्रवेश केला. वाटेंत त्याला जो जो नाग भेटला त्या सर्वांना त्यानें नमस्कार केला. पण त्याला कुंडलें देणारा नाग एक देखील भेटला नाहीं. तें एक विचित्र जगच त्याला वाटलें. एका जागीं एक स्त्री पांढरे मणी घेऊन त्याचें एक व दुसरी काळे मणी घेऊन त्याचें एक वस्त्र विणीत होती. आणखी एका जागीं सहा मुलें बारा आरे असलेलें चाक फिरवीत होतीं. आणखी एका जागीं एक उत्तम जातीचा घोडा उभा होता. त्याच्यावर एक पुरुष स्वार होता.

उदंक त्या स्वाराजवळ गेला व त्याची त्यानें खूप स्तुति केली. त्यानें संतुष्ट होऊन काय पाहिजे असेल तें मागून घ्यायला सांगितलें.

"सार्‍या नागलोकावर आपला अधिकार असावा असें वाटतें मला. तेव्हां तो अधिकार द्यावा." उदंक म्हणाला.












त्या स्वारानें तें मान्य केलें. एका क्षणार्धांत उदंकच्या देखतच त्या घोड्याच्या अंगांतून प्रथम धूर व त्यानंतर ज्वाला येऊं लागल्या. सारा नागलोक धुरानें व्यापला गेला. तक्षक घाबरला व त्यानें कुंडलें आणून उदंकला दिलीं.

उदंकला कुंडलें अशा तन्हेनें परत मिळालीं. परंतु वेळेवर तीं गुरुपत्नीकडे कशीं पोंचती करावयाचीं हा प्रश्न होताच. त्या घोडेस्वारानें उदंकच्या मनांतली गोष्ट ओळखली असावी. म्हणाला—" तूं या घोड्यावर बस. वेळेवर तूं आपल्या गुरूच्या आश्रमांत जाऊन पोंचशील."

उदंक त्याप्रमाणें घोड्यावर बसला. तो वेळेवर गुरूच्या आश्रमांत पोंचला आणि गुरुपत्नीला त्यानें कुंडलें नेऊन दिलीं. नंतर उदंकनें घडलेला सर्व वृत्तांत गुरूस सविस्तर वर्णन करून सांगितला व नागलोकांत त्यानें जें दृश्य पाहिलें होतें त्याचा अर्थ विचारला.

" तूं पाताळ लोकांत ज्या स्त्रिया पाहिल्यास त्या स्त्रिया नसून धाता व विधाता होत. त्या जें कापड विणीत होत्या त्यांतले पांढरे मणी म्हणजे दिवस व काळे मणी म्हणजे रात्री. तुला जीं सहा मुलें दिसलीं ते सहा ऋतु आणि तीं जें चक्र फिरवीत होतीं तेंच वर्ष. त्या चाकाचे बारा आरे तेच बारा महिने. तुला घोड्यावर जो पुरुष दिसला तो पर्जन्य होता आणि तो ज्या घोड्यावर बसला होता तो स्वतः अग्निदेवच होता." गुरूनें अर्थ स्पष्ट करून सांगितला.

उदंक गुरूचा निरोप घेऊन घरीं निघाला. तक्षकाची आठवण होतांच त्याच्या तळपायाची आग मस्तकाला जाई. पुढें तो हस्तिनापुरचा राजा जनमेजय याला भेटला. राजानें त्याला नमस्कार केल्यावर उदंक त्याला आशीर्वाद देऊन म्हणाला—" राजन् ! तूं आपल्या एका





मुख्य कर्तव्याचें पालन करावयास विसरला आहेस ! अजून तूं पितृऋणांतून मुक्त झालेला नाहींस."

राजानें हात जोडून विचारलें—" मुनीश्वर ! मी क्षत्रिय धर्म व राज्य धर्म यांचें पालन करीत आलों आहें. प्रमाद घडला असल्यास सांगण्याची कृपा करावी."

उदंकनें जनमेजयाला तक्षकानें कुंडलें चोरून नेऊन कसा त्रास दिला याचें वर्णन सांगून पुढें म्हटलें—" राजा ! तूं हें कसें विसरलास कीं हा तक्षक तुझे वडील राजा परीक्षित याला चांवला होता. सर्पदंशानें राजा बेशुद्ध पडला असतां कश्यप नांवाचा एक ब्राह्मण आपल्या मंत्रबळानें सांपाचें विष उतरविण्यासाठीं येत होता. त्याला वाटेंत तक्षक येऊन भेटला. त्यानें त्या ब्राह्मणाला पुष्कळसें धन देऊन परत पाठवलें. म्हणून राजा परीक्षित वांचला नाहीं. तेव्हां या दुष्ट तक्षकाबरोबर नागवंशाचा नाश करण्यासाठीं नाग यज्ञ सुरू कर !"

जनमेजय राजाला बापाच्या मृत्यूचा वृत्तांत माहीत नव्हता. त्यानें मंत्र्यांना बोलावून विचारलें तेव्हां त्यांनीं सर्व वृत्तांत सविस्तर वर्णन करून सांगितला—




" अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु महाभारत युद्धांत मारला गेला तेव्हां त्याची बायको उत्तरा गर्भवती होती. अश्वत्थाम्यानें दुष्ट बुद्धीनें तिच्या गर्भातील अर्भकाचा वध करण्यासाठीं अस्त्र सोडलें. पण श्रीकृष्णाच्या कृपेनें त्या गर्भाचें रक्षण झालें. पुढें उत्तरेला मुलगा झाला. तोच पांडवांचा एकुलता एक वारस राजा परीक्षित होय.

" परीक्षितानें कृपाचार्यांजवळ विद्याध्ययन केलें. त्याला शिकारीचा फार नाद होता. एकदां तो अनेक हिंस्र पशूंची शिकार करीत शमीक नांवाचे मुनि जेथें तपस्या करीत







बसले होते तेथें आला. त्यानें त्यांना विचारलें—" मुनीश्वर ! एक मृग माझा बाण लागून इकडेच कोठें तरी पळत आला आहे. तो कोणत्या दिशेनें गेला तुम्ही पाहिलेंत का ? याच बाजूनें तो पळत गेला. मला नक्की माहीत आहे.

" शमीक मुनि त्या वेळी मौन व्रत धारण करून तप करीत होते. म्हणून त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. परीक्षिताला त्याचा राग आला व त्यानें पोरकोटपणानें जवळच एक मेलेला सांप पडला होता तो उचलून शमीक मुनींच्या गळ्यांत घातला आणि हस्तिनापुरला परत निघून गेला. परंतु राग ओसरल्यावर आपली चूक झाल्याबद्दल त्याला फार पश्चात्ताप वाटला.

" शमीक मुनींचा मुलगा शृंगी आपल्या गुरूच्या आश्रमांतून स्वगृहीं जात असतां त्याला कृश नांवाचा एक मित्र भेटला. त्यानें कृशला आपल्या घरची कुशल वार्ता विचारली.

" परीक्षित तुझ्या बाबांच्या गळ्यांत एक मेलेला सांप घालून निघून गेला आहे." असें सांगून कृश हंसला.

शृंगी स्वभावानें फार रागीट होता. त्यानें शाप दिला कीं—" ज्या परीक्षित राजानें माझ्या बाबांचा असा अपमान केला आहे त्याला एका आठवड्यांत तक्षक चावेल व त्याच्या विषानें राजाला मृत्यू येईल."

नंतर शृंगी शमीक ऋषि तपश्चर्या करीत होते तेथें गेला. तो मृत सर्प वडिलांच्या गळ्यांत पाहून शृंगीनें तो काढून दूर फेंकून दिला. शमीक ऋषि ध्यानांत मग्न होते. त्यांना तें सर्व कांहीं मुळींच कळलें नाहीं. वडिलांची समाधि संपल्यावर शृंगीनें त्यांना नमस्कार केला व घडलेली गोष्ट सांगितली. त्यानें राजाच्या उद्धटपणाबद्दल त्याला शाप दिला असल्याची गोष्ट सुद्धां सांगून टाकली.









शमीक ऋषींना तें वृत्त ऐकून फार वाईट वाटलें. ते म्हणाले—"जो राजा राजधर्माचें उत्तम प्रकारें पालन करीत आला त्याच्या एका लहानशा चुकीबद्दल त्याला एवढी मोठी शिक्षा देणें बरोबर झालें नाहीं. त्याच्या राज्यांत आपण राहतों व निर्विघ्नपणें तपश्चर्या करतों. त्यानें थोडा पोरकटपणा केला. पण तूं एवढा मोठा विद्वान आणि हा पोरकटपणा करून काय बसलास ? शाप परत घेणें शक्य असल्यास परत घे !"

शृंगीला पण त्याची चूक पटली. परंतु शाप परत घेणें त्याला शक्य नव्हतें. तेव्हां शमीक मुनींनीं गौरमुख नांवाच्या आपल्या एका शिष्याला बोलावून त्याला परीक्षित राजाकडे पाठविलें. ते त्याला निरोप देऊन म्हणाले—"तूं परीक्षित राजाकडे जाऊन कुशल प्रश्न विचारून शृंगीनें शाप दिल्याची गोष्ट सांग व असें हि सांग कीं तक्षकापासून स्वतःचें रक्षण करण्यासाठीं सावध रहा." गौरमुख गुरूचा निरोप परीक्षित राजाकडे पोंचता करून परतला.

नंतर परीक्षित राजाच्या मंत्र्यांनीं विचार करून एक स्तंभ उभा करून त्यावर एक महाल बनविला व त्यांत परीक्षित राजाबरोबर अनेक मांत्रिक, वैद्य वगैरे ठेवले. स्वतः मंत्रीपण त्या महालांतच राहूं लागले.

सहा दिवस एक देखील विघ्न आलें नाहीं. शृंगी ऋषींनीं शाप दिला त्या दिवसापासून तक्षक या विचारांत होता कीं राजाला चावण्यासाठीं त्याच्या जवळ जाण्यास काय उपाय करावा ?

परीक्षित राजाला सर्पदंश झाला तर त्यापासून त्याचें रक्षण करण्यासाठीं सर्पाचें विष उतरण्याची माहिती असलेला कश्यप नांवाचा एक मांत्रिक ब्राह्मण हस्तिनापुराकडे निघाला. राजाचें रक्षण करून मोठें बक्षिस मिळविण्याचा त्याच्या मनांत हेतु होता. तक्षकाला ही गोष्ट कळतांच तो ब्राह्मणाचें रूप घेऊन वाटेंत त्याला भेटला व कुशलप्रश्न विचारून तो हस्तिनापुरीं जात असल्याची गोष्ट त्याच्या कडून काढून घेतली.

कश्यप तक्षकाला असेंहि म्हणाला कीं सर्पदंशानें मेलेल्या माणसाला जिवंत करण्यास माझ्याकडे मंत्र आहे. कोणी सर्पदंशानें जळून भस्म झाला असेल तर त्याला देखील जिवंत करण्याची शक्ति माझ्यांत आहे. परीक्षित महाराजांना जिवंत केल्यानें मला धन व कीर्ति दोन्हींचा लाभ होईल.

तेव्हां तक्षक म्हणाला—"मीच तो तक्षक आहें. कोणावर वीज पडली असेल किंवा कोणी पाण्यांत किंवा विस्तवांत पडून मेला असेल तर त्याला मंत्रबळानें जिवंत करणें कदाचित शक्य होईल. पण मी चावल्यानंतर औषध करून किंवा मंत्रप्रयोग करून जिवंत करणें अशक्य आहे. म्हणून तूं आल्या वाटेनें निघून जा. माझ्या बोलण्यावर कदाचित तुझा विश्वास बसत नसेल तर पहा, तुझ्या-समोर या वटवृक्षाला चावतों." असें म्हणत तो खरोखरच चावला आणि आश्चर्य म्हणजे तो वृक्ष तत्काल राख होऊन गेला.








तेव्हां कश्यपानें त्या राखेवर मंत्र म्हणून पाणी शिंपडलें. त्या क्षणीं तो वृक्ष पुन्हां पहिल्यासारखा हिरवागार होऊन गेला. कश्यपाचें मंत्रबळ पाहून तक्षक चकित झाला. म्हणाला—"तुम्ही मंत्रबळानें माझें विष उतरवून दाखविलें. पण ज्या ऋषीनें शाप दिला आहे त्या शापाच्या विरुद्ध तुम्ही कांहीं करूं शकाल काय? तुम्हांला धन पाहिजे आहे. परीक्षित राजाकडून किती धनाची आपल्याला अपेक्षा आहे सांगावें. मी त्याच्या दुप्पट धन देतों."

ब्राह्मणानें विचार केला कीं परीक्षित राजाचें आयुष्य संपुष्टांत आलें आहे. म्हणून त्यानें तक्षकाकडून धन मागून घेतलें व आपल्या घरीं परतला.

या सर्व गोष्टीची माहिती कदाचित कोणाला कळली देखील नसती. कारण कश्यप व तक्षक दोघांचें बोलणें रानांत निर्जन स्थानीं झालें होतें. परंतु दैवयोगानें त्या वेळीं त्या वटवृक्षावर चढून एका ब्राह्मणानें वडाच्या वाळक्या काटक्या गोळा करीत असतां दोघांचें बोलणें ऐकलें होतें. तक्षक वटवृक्षाला चावला त्या वेळीं त्या वटवृक्षा-बरोबर ब्राह्मण देखील भस्म झाला होता. परंतु कश्यप ब्राह्मणाच्या मंत्रबळानें वटवृक्षा-बरोबर तो देखील जिवंत झाला. घरीं परत आल्यानंतर त्यानें ती गोष्ट सर्वांना सांगितली.

कश्यप घरीं परतल्यानंतर तक्षक राजाला चावण्यासाठीं संधि पाहूं लागला व उपाय योजूं लागला. त्यानें कामरूप नांवाच्या नाग जातीच्या आपल्या अनुयायांना बोलावून त्यांना मुनिकुमारांच्या वेषांत परीक्षित राजाच्या महालाजवळ फळें व फुलें घेऊन जायला सांगितलें. अदृश्य रूपानें तो स्वतः देखील तेथें हजर राहील असें म्हणाला.

नागांनीं तक्षकाच्या आज्ञेप्रमाणें राजाच्या महालाजवळ जाऊन फळें व फुलें सर्वांना







चांटायला सुरवात केली. परीक्षित राजाला त्यांत गंमत वाटली. त्यानें सर्वांचा यथोचित आदर सत्कार करून त्यांनीं दिलेलीं फळें आपल्या मंत्र्यांना व इतर अधिकाऱ्यांना वांटलीं आणि स्वत:साठीं एक फळ ठेवून घेतलें. तें फळ सोलल्याबरोबर आंत त्याला एक तांबडी अळी दिसली. परीक्षित राजा थट्टेंत म्हणाला—"सात दिवस पुरे होत आले. आणि मला चावायला ही अळीच आली वाटतें." असें म्हणत त्यानें त्या अळीला हात लावला मात्र त्या अळीचा एक मोठा सांप झाला. राजाच्या सर्व शरिराला विळखा घालून तो मोठ्यानें ओरडला—"मीच तो तक्षक!" तो राजाला चांवला आणि निघून गेला.

तक्षकाला पाहूनच सर्व मंत्री व अधिकारी घाबरून उतरून पळून गेले. त्याच्या विषामुळें तो एकस्तम्भी महाल जळून गेला. मृत परीक्षिताची यथाविधि अन्त्येष्टी क्रियापण झाली.

परीक्षित सर्पदंशानें वारला तेव्हां त्याचा मुलगा जनमेजय वयानें लहान होता. तरी मंत्र्यांनीं त्याचा राज्याभिषेक केला. जनमेजय राजा मोठा झाल्यावर मंत्र्यांनीं काशीच्या राजाची कन्या वपुष्टा हिच्याशीं त्याचा विवाह करून दिला."

येथवर गोष्ट सांगून मंत्री म्हणाले—"महाराज, आपल्या वडिलांची मरणकथा व आपली जीवन कथा थोडक्यांत अशी आहे. तक्षक आपल्या वडिलांशीं फार दुष्टपणानें व खुनशीपणानें वागला आहे. तेव्हां उदंक मुनि सांगत आहेत त्याप्रमाणें आपण नागयज्ञ करून आपल्या वडिलांचा वध करणाऱ्या तक्षकाला त्याच्या पापांचें प्रायश्चित्त द्यावें."

आपल्या पित्याच्या मृत्युची ती करुण कथा ऐकून जनमेजय राजाला राग आला.







म्हणाला—"तक्षक स्वभावानेंच दुष्ट आहे. शापाचें मिष त्याला सहजीं मिळालें. नाहीं तर कश्यप मुनींला लांच देऊन त्यानें परत फिरविलें नसतें. त्याला या पापाचें प्रायश्चित्त मिळालेंच पाहिजे. नागयज्ञाची तयारी करावी. त्या योगें उदंक मुनींच्या मनाचें देखील समाधान होईल."

नागयज्ञाची तयारी सुरू झाली. आवश्यक सर्व वस्तु एकत्रित करण्यांत आल्या व ब्राह्मण यज्ञशाला निर्माण करण्यांत मग्न झाले.

जनमेजय राजाच्या दरबारीं लोहिताक्ष नांवाचा एक शिल्पकार होता. तो शिल्पशास्त्रांत व वास्तुकलेंत निपुण होता. तो म्हणाला—"महाराज हा यज्ञ पुरा होणार नाहीं. एक ब्राह्मण येऊन मध्येंच विघ्न आणील."

तें ऐकून जनमेजयाला राग आला. त्यानें लोहिताक्षाला यज्ञशाळेंत येण्याची मनाई केली. राजा जनमेजय व राणी वपुष्टा दोघांनीं यज्ञदीक्षा घेऊन यज्ञशाळेंत प्रवेश केला.

नागयज्ञ सुरू झाला. चंडभार्गव, पिंगल कौत्स, व्यास, वैशंपायन, जैमिनी, उद्दालक



वगैरे ऋषी यज्ञशाळेंत उपस्थित होते. नील वस्त्रें परिधान करून ऋत्विज एकेक मंत्र म्हणत होते व एकेक सांप होमकुंडांत पडत होता. निरनिराळ्या कुळांतले सर्प कुळाचा नामोच्चार होताच येऊन होमकुंडांत पडूं लागले. नागलोकांत हाहाकार उडून गेला. लक्षावधि सर्पांचा संहार झाला. यज्ञशाळेला एक भयंकर व बीभत्स रूप येऊं लागलें.

तक्षक घाबरून इंद्राच्या आश्रयाला धांवला. "या नागयज्ञांत तुझ्यासारख्या मोठमोठ्या सांपांचा देखील जीव वांचणें कठीण आहे









असें ब्रह्मदेवानें स्वतः सांगितलें आहे. तेव्हां तूं माझ्या आश्रयाला आलास हें एका परीनें बरें झालें. आतां तुला कसलीहि भीति नाहीं." इंद्र म्हणाला.

मोठ्या नागांमध्यें वासुकी एक प्रमुख नाग होता. तो नागयज्ञ थांबविण्यासाठीं आपली बहीण जरत्कारू हिच्याकडे गेला. त्याचें एक कारण होतें. सर्प जातीची आई कद्रूनें सर्प जातीला शाप दिला होता कीं पुढें कधीं नागयज्ञ होईल तेव्हां सर्व नाग जातीचा नाश होईल. पक्षी जातीची आई विनता हिची मान खालीं व्हावी म्हणून कद्रूनें आपल्या मुलांना म्हणजे सर्पांना कांहीं विशिष्ट कामें करावयास सांगितलीं. पण सर्प त्याप्रमाणें करायला कबूल झाले नाहींत. म्हणून तिनें त्यांना शाप दिला होता.

त्यावेळीं कद्रूच्या मांडीवर एला पुत्र होता. ब्रह्मदेव व देव यांचें परस्परांत सर्प-यज्ञासंबंधीं बोलणें चालू होतें तें त्यानें ऐकलें होतें. म्हणून ब्रह्मदेव देवांना म्हणाला—"सर्पयज्ञ होईल. पण तो पुरा होण्यापूर्वी जरत्कारूचा मुलगा त्यांत विघ्न आणील. ही गोष्ट एलापुत्रानें वासुकीला जाऊन सांगितली होती. तेव्हांपासून वासुकी आपली बहीण जरत्कारु हिच्या विवाहाची वाट पाहूं लागला."

जरत्कारु नांवाचा एक ब्राह्मण ब्रह्मचर्यव्रत घेऊन तपश्चर्या करीत होता. त्यानें झाडाच्या शाखेला उलटे लोंबकळत अस-लेल्या कांहीं ब्राह्मणांना पाहून त्यांची चवकशी केली.

ते म्हणाले—"आम्ही जरत्कारूचे पूर्वज आहोत. त्यानें ब्रह्मचर्यव्रत धारण केल्यामुळें पितरांना पाणी देणारा वंशज जन्माला येणें शक्य नाहीं. म्हणून आमची ही दुर्गति झाली आहे." तें ऐकून जरत्कारूला वाईट वाटलें. त्यानें आपल्याच नांवाची कन्या मिळाल्यास तिच्याशीं विवाह करण्याचा निश्चय केला. वासुकीच्या बहिणीचें नांव जरत्कारु आहे हें ऐकून त्यानें तिच्याशीं विवाह केला. त्यांना आस्तिक नांवाचा मुलगा झाला. नागयज्ञ थांबविणें फक्त अस्तिकालाच शक्य होतें. म्हणून वासुकी आपल्या बहिणीकडे आला.

जरत्कारूनें आपल्या मुलाला बोलावून सर्व परिस्थिति समजावून सांगितली. म्हणाली—"ब्रह्मदेवानें स्वतः सांगितलें आहे कीं फक्त तुझ्या हातूनच हा नागयज्ञ थांबेल. नाहींतर तुझ्या मामांच्या वंशाचा नाश होईल. आपल्या वंशाचा नाश थांबावा म्हणून माझ्या बाबांनीं तुझ्या बाबांशीं माझा विवाह करून दिला. आपल्या मातृवंशाच्या रक्षणाची जबाबदारी तुझ्यावर आहे. तूं जाऊन तो यज्ञ थांबव."

आस्तिक मातेच्या आज्ञेनें जनमेजयाच्या यज्ञशालेंत गेला. त्यानें राजा जनमेजय व तेथें हजर असलेल्या सर्व ऋषी व मुनींचा स्तुति पाठ केला. जनमेजयानें त्याला आशीर्वाद दिला. आस्तिक वयानें लहान, रूपवान व तेजस्वी होता. त्याच्या



वाक्‌शक्तीची सर्वांनीं वाखाणणी केली. जनमेजय म्हणाला—""तूं आल्यानें यज्ञ-शालेला एक निराळीच शोभा आली आहे. काय पाहिजे तो वर मागून घे!" असें सांगून राजा ऋत्विजांकडे वळून म्हणाला—"इतके सर्प येऊन होमकुंडांत बळी झाले. पण तक्षक अजून कसा आला नाहीं?"

ते म्हणाले—"राजन्! तक्षक इंद्राच्या आश्रयाला जाऊन बसला आहे. स्वतः इंद्रानेंच त्याला आश्रय दिल्यावर कोण काय करणार?"

"तर मग त्याच्याबरोबर इंद्राला देखील होमकुंडांत पडावें लागेल! करा आवाहन!" जनमेजय म्हणाला.

ऋत्विजांनीं मंत्र म्हटल्याबरोबर इंद्रापाठोपाठ तक्षक एक उपरणें कमरेला गुंडाळून अग्निहोत्राकडे येऊं लागला. तेव्हां इंद्र आपलें उपरणें सोडवून घेऊन मोकळा झाला. असहाय तक्षक अग्निहोत्राकडे तडफडत येऊं लागला.

त्याच वेळीं जरत्कारूनें हात जोडून जनमेजयाजवळ प्रार्थना केली—"महाराज! आपण एक वर देण्याचें वचन दिलें आहे. मी मागेन तो वर द्याल का? हा नागयज्ञ तावडतोब बंद करावा. हाच एक वर मागायला मी आलों आहें. कारण हा यज्ञ थांबला नाहीं तर माझ्या मातृ वंशाचा पूर्ण नाश होईल." राजानें यज्ञ थांबवला आणि तक्षकाचें रक्षण झालें. नागयज्ञ संपला. लोहिताक्षानें सांगितल्याप्रमाणेंच झालें. म्हणून जनमेजयानें त्याला आदरपूर्वक बोलावून त्याचा सत्कार केला. यज्ञाला जे ऋत्विज व ऋषिमुनी हजर होते त्यांना मोठमोठ्या दक्षिणा दिल्या.

नंतर जयमेजय आस्तिकाला म्हणाला—"बाल मुने! आतां आपल्या मनाचें समाधान झालें ना? मी आतां अश्वमेध यज्ञाचा आरंभ करीत आहें. त्यावेळीं आपण अवश्य येण्याची कृपा करावी!" अशी विनंति करून जयमेजयानें आस्तिकाला निरोप दिला.

वासुकी आदि महानागांनीं आस्तिकाला आशीर्वाद दिला आणि त्याला वर दिला कीं त्याच्या नामस्मरणानें कोणत्याहि सांपाचें विष उतरून जाईल.





# चुकलं कुठं?

"अरे ही आंघोळ करायची वेळ आहे ना? आतां कोणी गोष्टी सांगत बसतो का?" आजोबा म्हणाले.

"एक गोष्ट, अगदीं चिटुकली गोष्ट सांगून जा आजोबा!" मुलें म्हणालीं.

आजोबांच्या तोंडून नकार येईना, स्मित करून नाकांत तपकीर कोंबीत गोष्ट सांगूं लागले—"मी तुम्हांला कांहीं मूर्खशिरोमणींच्या गोष्टी सांगितल्या होत्या. तशाच तऱ्हेची पण थोडी निराळी गोष्ट सांगतों हं! लोक कांहीं अक्कल लढवायला जातात आणि मग स्वतः तोंडघशी पडतात व इतरांना पण तोंडांत मारल्यासारखें करून सोडतात. अशी एक गोष्ट माझ्या आजोळच्या गांवींच घडली ती सांगतों.

त्या गांवचा पाटील भयंकर तापट होता. मोठमोठे गांवकरी थरथर कांपत त्याच्या समोर, मग कुंभार बुरूड वगैरे किती भीत असावेत याची कल्पनाच करा.

त्या काळीं खेडे गांवांत कोणी मेला म्हणजे बुरुडाला व कुंभाराला बोलावणें जाई. बुरूड तिरडी बांधून देई व कुंभार मडकें आणून ठेवी. अशा कामांत त्यांना प्राप्तिपण खूप होई. कारण, दुसरा कोणी असल्या अशुभ कामाला हात घालायला तयार नसे व काम तर झालेंच पाहिजे. म्हणून लोक या लोकांनाच बोलवीत व यांना चांगली प्राप्ति होई. बुरडाचें नांव होतें दगडू व कुंभाराचें नांव होतें धोंडू.

एकदां दगडू बुरडाला त्याच्या घरच्या कामानिमित्त कोठेंतरी परगांवीं जावें लागलें.

सौ. रमाबाई सोमण

आणि त्याच दिवशीं लखू सोनाराची आई वारली. तो पाटलांचा एक पित्त्या होता. त्यानें दगडू बुरडाकडे निरोप पाठवला. पण तो परगांवीं गेल्याचें ऐकून त्यानें पाटलांना कळविलें. त्यांनीं शेजारच्या गांवीं गडी पाठवून तेथल्या बुरडाला बोलावून घेतलें आणि काम भागून गेलें.

दुसऱ्या दिवशीं दगडू बुरूड घरीं परत आला तेव्हां त्याला बायकोनें सांगितलें कीं पाटलांचा निरोप आला होता. बिचारा धांवत भेटायला गेला आणि रामराम करून बाजूला उभा राहिला. पाटील तापलेले होते. ओरडून म्हणाले—"कुठें गेला होतास रे सांगितल्या-शिवाय? तुमचीं कामें तुम्हीं नाहीं करायचीं तर काय आतां आम्ही करायचीं? कोणी अगाऊ सांगून मरतो का? ऐन वेळीं तुम्ही सर्व कोठेंतरी निसटून जातां. खबरदार यापुढें कधीं सांगितल्या शिवाय गेलास तर! चामडी लोळवीन"

पुढें कांहीं दिवसांनीं दगडू बुरडालाच नव्हें तर धोंडू कुंभाराला सुद्धां परगांवीं जायचें होतें. पाटलांची परवानगी घेतल्या-शिवाय गेलों तर पाटील चामडी लोळावल्या-शिवाय राहणार नाहींत. म्हणून ते पाटलांच्या घरीं त्यांची परवानगी विचारायला गेले. पण पाटील घरांत नव्हते. बायको आजारी होती म्हणून वैद्यबुवांना बोलावून आणायला गेले होते. काय करावें दोघांना कळेना. परगांवीं गेलें हें पाहिजेच. पाटलांनाच जरूर पडली तर किंवा कोणी गांवांत मेला तर? बराच वेळ विचार करून त्यांनीं गांवांतल्या कांहीं मोठ्या लोकांच्या घरासमोर एकेक तिरडी आणि एकेक मडकें ठेवून दिलें आणि निघून गेले.

दोघे निघून गेल्यावर कांहीं वेळानें पाटील वैद्यबुवांना घेऊन आले. पाटलांची बायको आजारी आहे हें गांवकऱ्यांना कळलें होतें. पाटील येईपर्यंत ते वाट पहात बाहेर उभे होते. कारण भिंतीआड तिरडी व मडकें ठेवलेंहोतें. त्यांवर त्यांची नजर पडली. काम आटोपलें. आतां पाटलांनीं वैद्यबुवांना आणलें म्हणून काय उपयोग? असा विचार करीत ते बाहेर उभे होते. पण कोणी कांहीं बोलला नाहीं.

पाटील वैद्यबुवांनाबरोबर घेऊन फाटका-च्या आंत पाऊल टाकतात तर समोर तिरडी व मडकें. मटकन खालींच बसले व रडूं लागले.
















वैद्यानें विचार केला, यायला उशीर झाला आणि खिन्न मनानें ज्या गाडींत बसून आला होता त्याच गाडींत बसून परत गेला. आलेले लोक पाटलांच्या बायकोचे गुणानुवाद गाऊं लागले. असली साध्वीबाई या कलियुगांत मिळणें शक्य नाहीं. अगदीं सत्यवानाची सावित्री !

बाहेरचा गलका ऐकून पाटलांची आई व बायको बाहेर आल्या व पाटलांना रडत असलेले पाहून व गांवांत कांहींतरी अकल्पित घडलें असावें असा विचार करून दोघी हंबरडा फोडून रडूं लागल्या.

बायकोला जिवंत पाहून पाटलांच्या जिवांत जीव आला. लोक तर्ककुतर्क करूं लागले. इतक्यांत कांहीं लोक धांवत आले व म्हणाले—"कुळकर्ण्यांच्या इनामदारांच्या, जोशीबुवाच्या आणि आणखी दोघां तिघांच्या घरीं अशाच तिरड्या व मडकीं ठेवलेलीं आहेत."

पाटलांनीं दगडू व धोंडूला बोलावून आणायला गडी पाठवला. पण दोघे घरीं नव्हते. पहाटे उठून गांवाला गेले आहेत हें कळलें. दुसऱ्या दिवशीं घरीं परत आल्यावर दोघांना कळलें कीं पाटलांचा गडी येऊन गेला. दोघे धांवत गेले. पाटलांनीं दरडावून विचारलें—"हा काय फाजीलपणा ?"

दगडू व धोंडू हात जोडून म्हणाले—"मालक ! मामलेदाराच्या कचेरींत काम होतें म्हणून जावें लागलें. मालकांची परवानगी घ्यायला आलों तर मालक घरीं नाहींत. काम अडूं नये म्हणून सर्व धन्यांच्या घरीं ठेवून आलों ! कांहीं चुकलें का ?"

पाटलांना मुस्कुटांत बसल्यासारखें झालें. काय बोलणार ?






# चोर सांपडला

एका गांवीं एक तेलंगी जोडपें रहात होतें. नवऱ्याचें नांव होतें सोमेश्वर व बायकोचें होतें पार्वती. दोघें स्वभावानें फार गरीब, म्हणजे भोळसट होतीं म्हटलें तरी चालेल. पण ईश्वर कृपेनें घरची श्रीमंती होती. पैपाहुणा आला तरी कसली उणीव म्हणून भासावयाची नाहीं. नित्य दानधर्म करीत व देवावर भरंवसा ठेवून सुखानें संसार करीत. गांवांत त्यांचा फार आदर होत असे. कारण ते कधीं कोणाच्या वाटेस जात नसत. आपलें काम बरें व आपण बरें.

त्या गांवीं एक चोर आला. तो रोज वेष पालटून एकेका श्रीमंताच्या घरीं जाई. बोलण्यांत व वागण्यांत तो फार चतुर होता. म्हणून लोक त्याला आपल्या घरीं ठेवून घेत. घरांत कोठें काय ठेवतात हें तो लक्षपूर्वक पाहून घेई व संधी साधून हाताला लागेल तें उचलून पसार होई.

त्या चोरानें अशा तऱ्हेनें दोन तीन घरीं चोरी केली. एके दिवशीं त्याची नजर सोमेश्वराच्या घराकडे वळली. सोमेश्वराच्या श्रीमंती विषयीं त्यानें ऐकलें होतें त्या घरांत नवराबायको सोडून कोणी पुरुष किंवा बाई माणूस नाहीं हें त्याला लवकरच कळून आलें. त्यानें पांढऱ्या दाढी मिशा लावून घेतल्या. एक विचित्र मुकुट घालून व हातीं एका पिशवींत पैसे घेऊन काळोख पडल्यावर त्यानें सोमेश्वरच्या घराच्या दारावर थाप दिली.

सोमेश्वरानें दार उघडल्या शिवायच विचारलें—"कोण आपण ?"

सौ. विमल देसाई



"मी....दार उघड !" चोर म्हणाला.

त्याची अधिकारयुक्तवाणी ऐकून सोमेश्वरानें दार उघडलें व चोराचा तो विचित्र पोशाख पाहून भीतभीतच विचारलें–"कोण आपण ?"

चोरानें आंत येऊन दार बंद केलें व म्हणाला–"मला ओळखलें नाहींस ? पण तूं किंवा तुझ्या बायकोनें मला कधीं पाहिलें नसणार. मी द्वार-देवता आहें. गृह देवतेचा सेवक. गृह देवतेनें मला हें पाहून यायला पाठविलें आहे कीं घरांत सुखशांति आहे कीं नाहीं. ज्या घरांत सहस्र तोळे सोनें नाहीं त्या घरांत शांति अशक्य व सुखपण अशक्यच. म्हणून गृह देवतेची आज्ञा आहे. ज्या घरांत कमी सोनें असेल त्या घरीं उजाडण्याच्या आंत सहस्र तोळे सोनें करून यावें."

"पण सर्वांच्या घरीं एकट्यानें जाणें आपल्याला कठीण नाहीं का ?" म्हणत सोमेश्वर चोराला आदरपूर्वक घरांत बोलावून घेऊन आला.

"नाहीं, मी सर्वांच्या घरीं जात नाहीं. भगवंताची भक्ति जो मनोभावें करतो त्याच्या घरींच मी जातों. हें पहा ना, आतांच एका श्रीमंताच्या घरून आलों. सोनें पुरें एक हजार तोळे करून ठेवून उरलेलें घेऊन आलों आहें. पाहूं तुमच्या घरांत काय काय आहे तें."

त्या भोळसट जोडप्यानें त्यांच्याकडे जें कांहीं होतें तें आणून चोरासमोर ठेवलें व हात जोडून एका बाजूला दोघं उभी राहलीं.

"अरे हें तर अवघें पांच शें तोळे सोनें सुद्धां असेल कीं नाहीं शंकाच. हें गृहदेवतेला दाखवून उजाडण्यापूर्वी दहा हजाराचें करून घेऊन येतों." चोर जाण्यासाठीं उठला.



"नाहीं, नाहीं ! बसा ! जेवण तयार आहे. पानें मांडायला सांगतों. आपण आमचें घर पवित्र केलें. जेवून जाण्याची कृपा करावी."

चोरानें विचार केला. जेवून जायला कबूल झालों नाहीं तर कदाचित त्यांना संशय येईल. त्यांचा माझ्यावर विश्वास बसला आहे. उजाडण्यापूर्वी पाय काढला कीं झालें. असा विचार करून चोर जेवायला कबूल झाला.

सोमेश्वरनें बायकोला चटकन कांहीं तरी पक्वान्न करायला सांगितलें. तिनें खीर केली. चोरानें खीरीवर खूप हात मारला. पोटभर खाऊन स्वारी आडवी झाली आणि घोरूं लागली.

"अरे ! ह्यांनीं तर बरोबर आणलेली पिशवी आणि आपल्याकडचा बांधून घेतलेला जिन्नस सर्व खाटेखालीं उघडा ठेवून दिला आहे आणि स्वारी घोरत पडली आहे. रात्रीं चोरानें उचलून नेलें तर चोरीचा आळ उलट आपल्यावरच यायचा. म्हणून उचलून कपाटांत ठेवून देऊं या. उठल्यावर जायला निघाले कीं काढून देऊं." पार्वती नवऱ्याला म्हणाली.



सोमेश्वरानें पिशवी कपाटांत ठेवून कुलुप लावून टाकलें आणि दोघं झोंपीं गेलीं.

उजाडण्यापूर्वी चोर उठला. चहूंकडे सामसूम होतें. नवराबायको झोंपलेलीं होतीं. त्यानें पाय काढण्याचा विचार केला. त्यानें खाटेखालची पिशवी उचलून घेतली, आणि पाय काढला. आपलीच पिशवी असेल असें त्याला वाटलें. ती पिशवी घेऊन तो गांवा-बाहेर आला व पिशवी उघडून पाहिली तेव्हां त्याला पिशवींत रताळीं सांपडलीं. त्याला संशय आलाच होता कीं पिशवींत दागिने वगैरे कांहीं नसणार. कारण पिशवीचें वजन कमी होतें. परंतु गांवांत कोठें निवांत जागा नव्हती, पिशवी उघडून पहायला. म्हणून गांवाबाहेर पोंचल्यावर त्यानें पिशवी उघडली व त्याच्या भ्रमनिरास झाला.

चोराला वाटलें कदाचित काळोखांत दुसरीच पिशवी हाताला लागली व तीच आपण उचलून घेऊन आलो. आपली पिशवी खाटेखालींच असणार. तो पिशवी तलावाच्या कांठीं ठेवून तोंड धुण्यासाठीं तलावांत उतरला त्या बरोबर दोन तीन म्हशी तिकडे आल्या व त्यांनीं त्याच्या



पिशवींतलीं रताळीं ओढून खालीं. पिशवीच्या चिंधड्या झाल्या.

"खा, खुशाल खा! आज रात्रीं मी त्या मूर्खांच्या घरीं जाऊन आपली पिशवी घेऊन येईन." चोर म्हशींना म्हणाला.

चोर निघून गेल्यावर पार्वती थोड्या वेळानें उठली. द्वारदेवता निघून गेलेला पाहून तिनें नवऱ्याला जागें केलें. म्हणाली—"अग बाई! ते तर निघून गेले. कोणाला कांहीं सांगितलें नाहीं. अन् त्यांची ती पिशवी तशीच राहून गेली कीं? आपली रताळ्यांची पिशवी दिसत नाहीं!"

तें ऐकून सोमेश्वर म्हणाला—"तुला काय वाटतें, ते आपली पिशवी घेऊन गेले नसतील म्हणून? अग वेडे! वर देणारे सांगून जात नाहींत!"

कपाट उघडून पाहिलें तेव्हां आंत पिशवी होती. पण आंत दागिने व सुवर्ण मुद्रा मिळून खरोखरच सोनें वाढलेलें होतें. हजार तोळ्यांचें झालें असेल असें दोघांना वाटलें.

"पाहिलेंस ते आपली पिशवी घेऊन गेले, पण आपल्याला वचन दिल्याप्रमाणें उजाडण्याच्या आंत दहा हजार तोळे सोनें करून ठेवून पण गेले." सोमेश्वर म्हणाला.



रताळ्याची पिशवी नेहमीं खाटेखालीं असे. ती पिशवी गेलेली पाहून दोघांनीं विचार केला, कदाचित त्या द्वारदेवतेनें रताळीं फराळाला नेली असावीत. म्हणून दोघां नवराबायकोनें द्वारदेवतेला आपलें आराध्य दैवत मानून त्याला रताळ्याचा नैवद्य दाखवायचें ठरविलें.

पार्वती नवे कपडे घालून देवाला गेली व शेजार पाजारच्या घरीं जाऊन आली. रात्रीं घडलेली गोष्ट तिनें गांवभर जाऊन सांगितली.

रामय्या नांवाच्या एका श्रीमंत गांवकऱ्याच्या बायकोची सरी पार्वतीच्या अंगावर पाहून तिनें ती गोष्ट नवऱ्याला सांगितली. सोमेश्वर व पार्वतीवर संशय करणें फुकट होतें. तरी रामय्यानें पोलीस ठाण्यावर वर्दी दिली. पण त्या पूर्वी रामय्या सोमेश्वराला येऊन भेटला होता. त्यानें रात्रीं घडलेला सर्व वृत्तांत सांगितला. रामय्यानें तो वृत्तांत पोलीस ठाण्यावर लिहून दिला.

पोलिसांनीं त्याला सांगितलें कीं तुम्ही निश्चिंत रहा, आज रात्रीं आम्ही त्याला पकडतों.

रात्रीं चोर पुन्हां सोमेश्वराच्या घरीं आला व दार ठोठावलें. सोमेश्वरनें दार उघडल्यावर तो आंत आला आणि कडी लावूं लागला. पण आश्चर्य म्हणजे पोलीस त्याच्या पाळतीवर येऊन बसले होते. त्यांनीं त्याला धरलें व त्याची दाढी ओढून काढली. गांवांत त्यानें जें कांहीं चोरलें होतें तें सर्व त्याच्या पिशवींत सांपडलें. चोराला शिक्षा झाली व सोमेश्वरला पोलिसांनीं चोराला पकडण्यास मदत केल्याबद्दल मोठें बक्षिस दिलें.





# बहीण भाऊ

[ ३ ]

बगदाद सोडल्यानंतर बाहेर एकांत स्थानीं पोंचल्यावर गनी मनमुराद रडला. तरी मनाला आवरून तो एका गांवीं येऊन पोंचला. एक तर दुःखी वर दमून भागून आलेला आणि उपाशी. पण तो कोणाकडे जाणार? तो एका मशीदींत जाऊन जमिनीवरच आडवा झाला. त्याला स्वतःच्या देहाची शुद्धी नव्हती.

दुसऱ्या दिवशीं कांहीं गांवकरी सकाळच्या नमाजासाठीं आले. तेव्हां त्याला त्यांनीं पाहिलें. त्यांना वाटलें कोणीतरी गरीब मरून पडलेला आहे. पण जवळ जाऊन पाहल्यावर त्यांना कळलें कीं श्वासोच्छास चालू आहे व तो बेशुद्ध होऊन पडला आहे. एक उदार मनुष्य त्याच्या शेजारीं दोन रोट्या व वाटीभर मध ठेवून तेथून निघून गेला.

गनी शुद्ध आली तरी त्या जागेवरून उठूं शकला नाहीं. तो मनोव्याधीनें भयंकर आजारी पडला व महिनाभर त्याच जागीं पडून राहिला.

आतां हा वांचणें शक्य नाहीं असा विचार करून गांवकऱ्यांनीं त्या बेशुद्ध व अशक्त स्थितींत बगदादच्या सरकारी दवाखान्यांत त्याला पाठविण्याचें ठरविलें.

एक उंटवाला त्याला घेऊन जायला कबूल झाला. त्याला एका चटईंत गुंडाळून उंटावर चढविण्यांत येत होतें, त्याच वेळीं गनीची आई व बहीण दोघी त्या जागीं येऊन

श्री ना. गो. वैसाई



पोंचल्या. त्यांनीं विचार केला, कोण असेल बरें? अगदीं गनी सारखा दिसतो आहे. त्या दोघी डेमास्कसहून बगदादला जात होत्या. गरीब भिकारणी असाव्यात असें गांवकऱ्यांना वाटलें.

उंटवाला गनीला घेऊन बगदादला सरकारी दवाखान्यापर्यंत घेऊन आला. पण दवाखाना बंद होता, म्हणून गनीला दवाखान्याच्या पायऱ्यांवर उतरवून ठेवून तो निघून गेला.

दैवयोग असा कीं त्याचवेळीं तेथें बगदादचा एक मोठा व्यापारी आला. त्यानें गनीला त्या स्थितींत पाहिलें. दवाखान्यांत याला ठेवलें तर हा जिवंत येणें शक्य नाहीं. गरीब मुलगा दिसतो आहे. घरीं उचलून घेऊन गेलों तर कदाचित वाचेलहि.

त्यानें आपल्या गुलामांना बोलावून गनीला आपल्या घरीं उचलून नेलें. तो आपल्या बायकोला म्हणाला—“अल्लाच्या मेहरबानीनें एक पाहुणा आपल्या घरीं आला आहे. त्याला कोणत्याहि वस्तूची कमतरता भासूं देऊं नकोस.”

व्यापाऱ्याच्या बायकोनें पाणी तापवून गुलामांकरवीं गनीचें सर्व अंग पुसून काढवलें. त्याला आपल्या नवऱ्याचे कपडे घालायला दिले. नंतर त्याला थोडें सरबत प्यायला दिलें. गनीनें मोठ्या कष्टानें आपल्या उपकारकर्त्याकडे एकदां डोळे उघडून पाहिलें. नंतर पुन्हां डोळे मिटून पडून राहाला. त्याला घडलेल्या सर्व गोष्टी आठवूं लागल्या. कूतल कुलबची सुद्धां आठवण झाली.

खलीफानें कूतल कुलबला कालकोठडींत नेऊन टाकलें व तिची गोष्ट पार विसरून गेला. चोवीस दिवस लोटल्यावर त्या बाजूला फिरकायला त्याला फावलें. तेव्हां



त्या जागीं कोणाचा तरी आवाज त्याला ऐकूं आला.

कूतल कुलब गनीविषयीं स्वतःशींच कांहीं तरी बोलत होती—“तूं किती उदार होतास आणि हे खलीफा पहा! मी खलीफाशीं लग्न करणार हें ऐकून तूं माझी मानमर्यादा राखलीस. पण त्यानें तुझ्या आईला व बहिणीला किती छळलें. पण त्याला अल्लाहच्या समोर या सर्व अत्याचारांचा जाब द्यावा लागेल.

कूतल कुलबच्या तोंडचे ते शब्द ऐकून खलिफाला आपली चूक कळली. आपण गनीविषयीं विना कारण गैरसमज करून घेतला व कूतल कुलबलाच नव्हें तर गनीच्या आईला व बहिणीला विनाकारण घराबाहेर काढलें.

खलीफानें कूतल कुलबला बोलावून विचारलें—“तूं कोणाविषयीं बोलत होतीस? कोणावर मी इतका अन्याय केला? माझ्या पत्नीच्या मानमर्यादेचें रक्षण कोणी केलें?”

“व्यापारी गनीनें!” कूतल कुलब म्हणाली.

“माझ्या हातून चूक घडली. याची शिक्षा म्हणून तूं काय वाटेल तें माझ्याजवळ मागून घे.” खलीफा म्हणाला.



“मालक, प्रभू! मला आणखी काय हवें? गनीला शोधून आणा! अन् त्यानें कबूल केलें तर त्याच्याशीं लग्न करण्यास परवानगी पण द्या!” ती म्हणाली.

“मी वचन दिलें आहे. मागें फिरणार नाहीं. तूं खुशाल त्याच्याशीं लग्न कर!” खलीफा म्हणाले.

“पण तो आतां कोठें आहे, कोणास ठाऊक? मी स्वतःच त्याचा शोध काढीन” कूतल कुलब म्हणाली.

“तूं आतां स्वतंत्र आहेस!” खलीफा म्हणाले.



कूतल कुलबनें पाण्यासारखा पैसा खर्च करून सारें बगदाद शहर चाळून काढलें पण गनीचा शोध तिला लागला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं ती बगदादच्या सर्व बाजार पेठा पाहून आली. प्रमुख व्यापाऱ्यांना भेटून तिनें गनीविषयीं चवकशी केली. तिसऱ्या दिवशीं जव्हेरी बाजारांतल्या एका मुख्य व्यापाऱ्याजवळ चवकशीसाठीं ती गेली असतां तो म्हणाला—"मी कालपरवांच एका तरुणाला सरकारी दवाखान्याच्या पायरी-वरून उचलून घेऊन आलों आहें. तो रूपवान आहे व चांगल्या कुळांतला असावा असें वाटतें. पण दवाखान्याच्या पायरीवर येऊन कां पडून रहावा हें मात्र मला कळलें नाहीं. सगळें वैभव तरी घालवून बसला असावा किंवा कोणाच्या तरी प्रेमांत पडला असावा.

तिचें हृदय धडधड करूं लागलें. ती त्या व्यापाऱ्याला म्हणाली—"तुम्हांला दुकान सोडून माझ्याबरोबर चला म्हणून सांगणें बरोबर होणार नाहीं. तुम्ही कोणाला तरी माझ्याबरोबर पाठवूं शकाल काय?"

व्यापाऱ्यानें लगेच एका मुलाला बोलावून त्याला कूतल कुलबला घर दाखवायला पाठविलें.

त्या मुलाबरोबर ती व्यापाऱ्याच्या घरीं गेली. पलंगावर बेशुद्ध स्थितींत पडलेल्या गनीला तिनें पाहिलें. पण त्याला ती ओळखूं शकली नाहीं. ती व्यापाऱ्याच्या बायकोला म्हणाली—"कोणी राजा असला म्हणून काय झालें, तो परदेशांत जाऊन पडला तर त्याची देखील अशीच स्थिति होईल." असें सांगून ती निघून गेली.

ती रोज चवकशीसाठीं दिवसभर फिरे व संध्याकाळीं हताश होऊन घरीं परत येई. एकदां त्या जव्हेरी बाजारांतल्या व्यापाऱ्यानें तिला बोलावून सांगितलें कीं बगदादला



अनाथ लोक कित्येक येत असतात. आज दोन गरीब बायका आल्या आहेत. त्या उच्च कुळांतल्या दिसत आहेत. त्यांना तुम्हीं कांहीं मदत करूं शकाल तर पहा.

कुतल कुलबनें त्यांना बोलावून आणायला सांगितलें. त्यांना पाहून कूतल कुलबच्या डोळ्यांना पाणी आलें. ती म्हणाली—"आजी, तुम्ही कोण काय सांगा! तुम्ही चांगल्या घरच्या दिसतां आहां मग तुम्हां मायलेकीं-वर अकस्मात् कोणता प्रसंग ओढवला?"

तें ऐकून दोघी रडल्या. गनीची आई म्हणाली—"मी आपल्या गनीच्या शोधार्थ फिरतें आहें. अल्लाजवळ प्रार्थना करतें आहे कीं आम्हांला यश मिळो!"

तें ऐकून कूतल कुलब बेशुद्ध होऊन पडली. शुद्धीवर आल्यावर ती म्हणाली—"अल्लाची मेहरबानी असेल तर आपण सर्वच सुखी होऊं."

तिनें त्याच व्यापाऱ्याला हजार दीनार देऊन प्रार्थना केली कीं दोघींच्या राहण्याची उत्तम व्यवस्था करण्यांत यावी. या उच्च-कुळांतल्या स्त्रिया आहेत. यांच्यावर एका-एकीं एक प्रसंग ओढवला. म्हणून ही स्थिति झाली.



त्या दोघी व्यापाऱ्याच्या घरीं जाऊन राहिल्या. दुसऱ्या दिवशीं कूतल कुलब त्यांना भेटायला गेली. तेव्हां त्यांच्यांत एकदम बदल झालेला पाहून तिला आश्चर्य वाटलें. घरंदाज घराण्यांत राहणाऱ्या बायकांसारखी त्यांची स्थिति झाली होती.

तिघी रोग्याला पाहायला म्हणून गेल्या गनी आजारांतच कण्हत होता. तो कोणालाच ओळखूं शकला नाहीं.

तिघी बसून बोलत होत्या. बोलतां बोलतां कोणाच्या तरी तोंडून कूतल कुलबचा नामोच्चार झाला. लगेच गनीनें डोळे उघडून

एकदांच पाहिलें व हात टेंकून उठण्याचा प्रयत्न करीत म्हणाला—"कोठें आहेस कूतल कुल्ब ?"

"मी येथेंच आहें ! तूंच गनी का ?" कूतल कुल्बनें चकित होऊन विचारलें.

"पहा येऊन ! माझे डोळे पहा ! त्यांत कूतल कुल्बशिवाय दुसरें कोणी दिसणार नाहीं !" तो म्हणाला. त्यानंतर प्रेमी युगल भेटलीं, भाऊ बहीण, मायलेक भेटलीं. सर्वांच्या डोळ्यांत आनंदाश्रु आले.

कूतल कुल्बनें खलीफांनीं स्वतःच्या करणीवर पश्चात्ताप व्यक्त करून गनीच्या शोधार्थ व त्याच्याशीं विवाह करण्यासाठीं तिला मुक्त केलें कसल्याचें पण सांगितलें. नंतर ती राजमहालांत गेली व तेथून तिनें दोघी माय-लेकींना त्यांच्या दर्जाला शोभतील अशीं वस्त्रें पाठविलीं. सर्व प्रकारें तिनें त्यांची बडदास्त राखण्याची व्यवस्था करून दिली. नंतर संधी पाहून खलीफांजवळ सर्व कांहीं सांगितलें.

खलीफांनीं गनीची तब्येत बरी झाल्यावर त्याला दरबारांत बोलाविलें. त्याची वागणूक थोर घरंदाज तरुणाला शोभेल अशीच होती. खलीफांनीं त्याचें कौतुक करून आपल्या दरबारी लोकांना त्याच्या थोर मनाचें वर्णन करून सांगितलें. त्यांनीं गैरसमजुतीमुळें त्याला विनाकारण इतका कष्ट झाल्याबद्दल माफी मागितली व त्याचा यशोचित सत्कार केला.

गनीची बहीण फितना अत्यंत रूपवती होती. तिच्या सौंदर्यावर मुग्ध होऊन खलीफांनीं तिच्याशीं लग्न करण्याची मनीशा दर्शवली. गनीनें त्यास मान्यता दिली. गनी व खलीफा दोघांचीं लग्नें मोठ्या थाटानें एकाच मुहूर्ता-वर झालीं. त्यानंतर दोघांचा संसार सुखाचा झाला.

[ संपूर्ण ]





# अरण्यकांड

श्री रामचंद्रानें सीता व लक्ष्मणासह दंड-कारण्यांत प्रवेश केला. अरण्याच्या बाहेर बाहेरच ऋषींचे आश्रम होते. प्रत्येक आश्रमालगतचा भाग रम्य होता.

ऋषींनीं सीता, राम व लक्ष्मण यांचा प्रेमादरपूर्वक सत्कार केला. ते म्हणाले—"रामा, राजा दुष्टांना दंड देतो, सुष्टु लोकांचें रक्षण करतो. प्रजेला स्वतःच्या अपत्या-प्रमाणें मानून तिचें पालन करतो म्हणून तो प्रजेला पित्यासारखा असतो. तूं राजधानी सोडून वनांत आलास तरी येथें देखील तूं राजाच आहेस व आम्ही तुझी प्रजा. आमच्या रक्षणाचा व लालन पालनाचा भार तुझ्यावर टाकून आम्ही आपलीं धर्मकार्यें निश्चित पणें करूं.

रामानें ती रात्र एका आश्रमांतच काढली व उजाडल्यावर सीता व लक्ष्मणासह खोल अरण्यांत प्रवेश केला. तें अरण्य भयंकर होतें, पण सुंदर व रमणीय होतें. भयंकर श्वापदें हिंडत होतीं. पहावें तिकडे वृक्ष, दऱ्या-खोरीं.

त्या निर्जन वनांत जात असतां त्यांना एक भयंकर राक्षस दिसला, पर्वता एवढा उंच व एखाद्या दरीसारखें भयंकर त्याचें मुख, ढगा एवढें पोट व हातांत भाला.



त्यांत वाघ, सिंह, लांडगा आणि हत्ती यांचीं मुंडकीं खोचलेलीं होतीं. राम लक्ष्मणांना पाहून तो कर्दनकाळासारखा त्यांना खायला पुढें धांवला आणि सीतेला उचलून त्यानें आपल्या खाकेंत धरलें. "तुमचा काळ जवळ आलेला दिसतो आहे. म्हणूनच तुम्ही या जंगलांत पाऊल टाकण्याचें साहस केलेंत. तुम्ही दोघे कोणी तरी तरुण मुनि दिसतां. मग ही सुंदर स्त्री कशाला तुमच्या बरोबर ? मी हिच्याशीं लग्न करणार आहें.

सीता घाबरून गेली होती. तिचा आक्रोश ऐकून रामाला राक्षसाचा राग आला. तो म्हणाला—"लक्ष्मणा, ज्या उद्देश्याने कैकेयीनें मला वनवास दिला तो उद्देश्य पुरा होणार असें दिसतें आहे. बाबा वारल्याचें ऐकून मला दुःख झालें, तितकेंच किंबहुना त्याहून जास्त दुःख सीतेच्या अंगाला त्या राक्षसाचा स्पर्श झालेला पाहून होत आहे."

रामाचें तें वाक्य ऐकून लक्ष्मणाला स्वेष चढला. म्हणाला—"एका बाणानें मी त्याचा वध करतों पहा!" नंतर राक्षसाकडे वळून चेष्टेनें लक्ष्मण म्हणाला—"काय हो राव! कोण तुम्ही ? सर्व जंगलाचे मालक जणुं!"

"ए उर्मट पोरा! कोणाला हा प्रश्न विचारतोस, मीच तुला तो प्रश्न विचारतों आहें! कोण तूं, बोल." राक्षस म्हणाला.

"आम्ही क्षत्रिय कुमार आहों. सदाचरणी आहों. वनवास करीत आहों! आतां बोल तूं कोण?" रामानें विचारलें.

"ऐक! माझ्या पित्याचें नांव जय आहे व आईचें शतदृद. माझें नांव विराध. मी तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतलें आहे. ब्रह्मदेवानें मला वर दिला आहे कीं कोणत्याहि शस्त्राच्या प्रयोगानें माझा वध होणें शक्य नाहीं. म्हणून तुम्ही दोघे आतां या स्त्रीला विसरा आणि मुकाट्यानें आल्या



वाटेना निघून जा. मला तुमचे प्राण घेतल्यानें विशेष फायदापण नाहीं." राक्षस म्हणाला.

रामाचे डोळे रागानें लाल झाले. म्हणाला—"नीच दुष्टा! परस्त्रीवर हात टाकायला तुला शरम नाहीं वाटली ? तुझा काळ जवळ येऊन ठेपला आहे." असें सांगून राम लक्ष्मणांनीं राक्षसावर बाण सोडले. ते बाण राक्षसाच्या शरिरांत शिरून अडकून राहाले. त्यानें सीतेला खालीं ठेवलें व मोठ्यानें हंसून त्यानें आपलें शरीर जरा ताणल्याबरोबर सर्व बाण गळून जमिनीवर पडले. तो भाला हातांत घेऊन रामावर धांवला. रामानें एका बाणानें त्या भाल्याचे दोन तुकडे करून टाकले.

पण विराधाला त्याची फिकीरच जणूं नव्हती. तो पुढें येऊं लागलेला पाहून राम लक्ष्मणांनीं तलवारीचे वार केले. पण त्याला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. त्यानें राम-लक्ष्मणांना खांद्यावर उचलून घेतलें आणि रानांत खोल शिरूं लागला.

सीता ओरडली—"दोघांना हा राक्षस कोठें घेऊन चालला आहे ? मला वाघ व लांडगे खाऊन टाकतील. राक्षसा! मी तुझ्यासमोर हात जोडतें. तूं दोघांना सोडून दे व पाहिजे तर मला धरून घेऊन जा."



सीतेचा तो आक्रोश ऐकून राम लक्ष्मणांनीं आपापल्या तलवारींनें राक्षसाचे दोन्ही हात कापून टाकले. तो जमिनीवर आदळला जणुं कांहीं डोंगरच कोसळला. जमीन हादरली. दोघांनीं राक्षसाला खूप बडविलें. त्याच्या पायांचीं हाडें मोडून टाकलीं. पण तो राक्षस मेला नाहीं. राम त्याच्या गळ्यावर उभा राहून लक्ष्मणाला म्हणाला—"लवकर खड्डा खण, याला जिवंत पुरून टाकूं या." लक्ष्मणानें एक खड्डा खणला. दोघांनीं त्याला त्या खड्ड्यांत ढकललें. खड्ड्यांत पडतांना तो इतक्या मोठ्यानें गरजला कीं



त्या आवाजानें सर्व दिशा कांपल्या. राम-लक्ष्मणांनीं त्याच्या वर दगड व माती टाकून त्याला पुरून टाकलें.

रामानें सीतेजवळ जाऊन तिला धीर दिला. सीतेनें असलें भयंकर दृश्य आयुष्यांत पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें. म्हणून ती फार भ्याली होती.

नंतर राम लक्ष्मण सीतेसह शरभंग ऋषींच्या आश्रमांत येऊन राहण्याचा हेतूनें निघाले. ते आश्रमाजवळ येऊन पोंचणार तों त्यांना एक विचित्र दृश्य दिसलें. जमिनी-पासून पुष्कळ वर अंतराळांत एक रथ उडत असलेला त्यांना दिसला. त्याला पिवळे घोडे जोडलेले होते. एक महापुरुष सुंदर वस्त्रा-भूषणें परिधान करून आश्रमाकडे जात होता. सूर्यासारखा तो तेजस्वी पुरुष होता.

रामानें लक्ष्मणाला तिकडे बोट दाखवीत विचारलें—"लक्ष्मणा ! हा देवेन्द्र तर नसेल ? मी पुढें जाऊन चवकशी करून येतों. तूं व सीता तोंपर्यंत येथें बाहेर थांबा." असें सांगून राम शरभंग ऋषींच्या आश्रमांत गेला.

तो खरोखरच देवेन्द्र होता. शरभंग ऋषींना स्वर्गांत बोलावून घेऊन जाण्यासाठीं स्वतः देवेन्द्रच आला होता. रामाला येत असलेला पाहून इंद्र शरभंग ऋषींना म्हणाला—"राम मला भेटायला येत आहे. त्याच्या हातून मोठमोठीं कामें व्हावयाचीं आहेत. तीं पुरी होईपर्यंत माझी व त्याची भेट होणें इष्ट नाहीं." असें सांगून इंद्र रथांत बसून लगेच निघून गेला.

इंद्राला निघून गेलेला पाहून राम परतला आणि सीता व लक्ष्मण दोघांना बरोबर घेऊन त्यानें शरभंग ऋषींच्या आश्रमांत प्रवेश केला. तिघांनीं ऋषींना नमस्कार केला. तों पर्यंत ऋषींनीं अग्निप्रवेश करण्याची सर्व तयारी करून ठेवली होती.



रामानें इंद्राविषयीं विचारतां ऋषि म्हणाले—“मी तपश्चर्या करून स्वर्गांत प्रवेश करण्याचा अधिकार मिळविला होता. पण देवेन्द्र स्वतः मला घेऊन जाण्यासाठीं आला होता. तूं माझ्यासाठीं येत आहेस हें जेव्हां मला कळलें तेव्हां मी विचार केला स्वर्गाला मागून जातां येईल. ब्रह्मलोक स्वर्ग लोक वगैरेंची प्राप्ती मला झाली आहे. मी त्यांचें दान तुला करतों.”

“ऋषिवर! मी आपला त्याबद्दल फार आभारी आहें. ज्या लोकांत मला जाण्याची इच्छा होईल त्या लोकांत जाण्यास अधिकारी मला स्वतःच व्हायला नको का? आतां मला हें सांगा कीं या अरण्यांत मी सीता व लक्ष्मणासह कोठें रहावें?” रामानें विचारलें.

“याच नदीच्या कांठा कांठानें तूं पश्चिमेकडे गेलास तर तुला सुतीक्ष्ण मुनींचा आश्रम लागेल. ते तुला योग्य स्थान कोणतें तें सांगतील. ज्याप्रमाणें सांप आपली कात टाकतो तसें हा देह ठेवीत असतां तूं मला पहावेंस, ही माझी इच्छा आहे.” असें सांगून शरभंग ऋषींनीं अग्नींत प्रवेश केला. त्यांचें तें जर्जर शरीर भस्म होऊन गेलें व एक दिव्य देह धारण करून पंचवीस वर्षांच्या तरुणासारखे ते अग्नींतून बाहेर आले. सीता, राम व लक्ष्मणांनीं शरभंग ऋषींचें तें दिव्य डोळ्यांनीं पाहिलें.

शरभंग ऋषींनीं देह त्याग केल्यावर आश्रमांतल्या इतर ऋषींनीं येऊन रामाजवळ विनंति केली—“पद्मा, नदीच्या कांठीं राहणाऱ्या ऋषींना राक्षस त्रास देत आहेत. त्यांचीं प्रेतें पहा इकडे पडली आहेत. ऋषी-मुनींचा रक्षणाचा भार तूं आपल्यावर घ्यावास.” असें सांगून त्यांनीं ऋषी मुनींचीं प्रेतें दाखविलीं.



“मी पित्याच्या आज्ञेचें पालन करण्या-साठीं अरण्यवास पत्करला होता. कदाचित या सेवेसाठींच मला अरण्यवास लाभला आहे. मी आनंदानें ही जबाबदारी आपल्या शिरांवर घ्यायला तयार आहें.” रामानें उत्तर दिलें.

राम सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमाकडे जात असतां त्याच्याबरोबर वैखानस वगैरे ऋषि देखील निघाले. त्यांनीं एक नदी पार केली आणि एका पर्वतालगतच्या रानांत येऊन पोंचले. त्याच वनांत सुतीक्ष्ण मुनींचा आश्रम होता.

रामानें आपलें नांव सांगून सुतीक्ष्ण मुनींना नमस्कार केला. ऋषींनीं पुढें येऊन रामाला प्रेमानें आलिंगन करून आशीर्वाद दिला व म्हणाले—“रामा! तूं चित्रकूट पर्वतावर येऊन राहूं लागलास तेव्हां पासूनच तुझ्याविषयीं सर्व समाचार मला मिळत आले आहेत. मी आजपर्यंत जी तपश्चर्या केली तिचें सर्व फळ मी तुला देत आहें. तूं सीता व लक्ष्मणासह सर्व लोक पाहून घे. तुला अनायास ही प्राप्ति होत आहे.”

त्यावर राम म्हणाला—“मुने! स्वतः कांहीं कष्ट केल्याशिवाय ब्रह्मलोकाची जरी



प्राप्ति झाली तरी त्याचें खरें सुख कसें मिळणार? आतां आम्हांला वनवासास योग्य असें स्थान सांगावें.”

“पाहिजे तर तूं याच आश्रमांत रहा. येथें आश्रमांतल्या मृग इत्यादि प्राण्यांचाच थोडा त्रास आहे. बाकी कशाहि प्रकारचा त्रास नाहीं.” सुतीक्ष्ण मुनि म्हणाले.

“मी किंवा लक्ष्मणानें मृगयेच्या वेळीं चुकून आश्रमाच्या पशूचा वध केला तर तो केवढा मोठा अपराध होईल! तेव्हां आपण इतर कोणतें तरी स्थान सुचवावें.” राम म्हणाला.

सुतीक्ष्ण मुनींच्या आग्रहास्तव रामानें ती रात्र त्यांच्या आश्रमांत राहण्याचें कबूल केलें. सकाळीं राम सीता, लक्ष्मण व मुनींसह पुढें निघाला.

वाटेंत सीतेनें रामाला विचारलें—"जगांत तीन पापें महापापें म्हणून मानली जातात,— पहिलें असत्य भाषण, दुसरें परस्त्री प्रेम व तिसरें निष्कारण वैर. त्यांत निष्कारण वैर हेंच सर्वांत मोठें महापातक आहे. पहिलीं दोन पातकें आर्यपुत्र कधीं करणार नाहींत याची मला खात्री आहे. पण आपण राक्षसांचा वध निष्कारणच करणार आहांत असें नाहीं का वाटत? आपण ऋषी व मुनींना तसें वचन दिलें आहे म्हणून विचारतें. खरें पाहिलें तर शस्त्र हातीं धरणें हीच एक चूक ठरेल. फार पूर्वी एक मुनि तप करीत होते. इंद्र भटाचें रूप घेऊन आला. त्यानें त्या मुनींकडे आपलें शस्त्र ठेवून त्याचा सांभाळ करण्यास सांगितलें व असें देखील सांगितलें कीं मी कांहीं दिवसांनीं येऊन, हें शस्त्र घेऊन जाईन. मुनि तें शस्त्र सतत आपल्या जवळ बाळगीत. कोठें जायचें झालें तरी तें ठेवून जात नसत. त्याचा प्रयोग मुनीनें फळें तोडायला व कापायला केला. हळूहळू त्या शस्त्राचा उपयोग हिंसाकार्यांत पण होऊं लागला. शेवटीं त्यांना नरकांत जावें लागलें.

म्हणून शस्त्र त्याग करूनच आपण तपश्चर्या करूं या. ही फक्त एक विनंति आहे."

राम सीतेला म्हणाला—"सर्व मुनींनीं इतकी प्रार्थना केली तेव्हां मी त्यांना होकार दिला व वचन देखील दिलें कीं मी त्यांचें रक्षण करीन. आतां तें वचन मोडायला मी तयार नाहीं. तुला किंवा लक्ष्मणाला सोडावें लागलें तरी मी आपली प्रतिज्ञा मोडणार नाहीं."



# हनुमानाची गोष्ट



केसरी नांवाच्या एक वानराच्या बायकोचें नांव अंजना असें होतें. केसरी संन्यास होऊन तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेल्यावर अंजनानें वायूची आराधना केली व त्याच्या अनुग्रहानें तिला एक मुलगा झाला.





जन्म झाल्याबरोबर अंजनासुत मारुती सूर्याला पाहून त्याला धरायला धांवला. तें पाहून राहून रागावून इंद्राकडे फिर्याद केली.





त्यास वाटलें खास भाळली
रूपावरती माझ्या ती।
निर्जन स्थानीं मला भेटण्या
आलि असावी इकडे ती॥

देहभान तो विसरून जवळीं
गेला अन् वदला तिजला–
"सुंदरी, कशी रात्रि एकटी
आलिस इकडे, सांग मला!"

स्वाहा वदली–"असतां तुम्ही
भीती कसली कोणाची?
विहार करण्या आलें, मजला
नाहीं भीती कोणाची॥"

अग्नि म्हणाला–"थट्टा सोडुनि
सांग, कोण तूं, आलिस कां?
संशय मजला, खरें सांग तूं,
अंगिरसाची पत्निच का?"

मान वांकडी करून स्मित अन्
करून केला कटाक्षपात।
उभी राहिली बाजूला ती
ठेवुनि कमरेवरती हात॥

हात धरुनि तिज विचारि अग्नी–
"नांव सुंदरी काय तुझें?"
विचारि त्यावर–"करावया जप
नांव पाहिजे का माझें?"

"श्रद्धा मजला म्हणती सगळे!"
अग्नी वदला–"खरेंच काय?
खरा जाहला मम संशय कीं
अंगिरसाची पत्नी काय?"

"असलों आम्ही मुनिपत्नी जरि
मुळांत स्त्री हें विसरूं नका?
तेजस्वी पुरुषास पाहुनी
करणें कौतुक सोडूं का?

"आहों परवश सर्व आश्रमीं
उरल्या अभिलाषा असुच्या।
आणि पुऱ्या होतिल निश्चित
खास कृपेनें प्रिय, तुमच्या!"






[ ८ ]

[ कालभैरवाच्या मूर्तीसमोर ब्रह्मदंडीनें जें हवन सुरू केलें होतें, त्याचा धूर गुहेंतून बाहेर येत असलेला ऐकून राजगुरु स्वतः त्या जंगलांत मांत्रिकाचा शोध काढीत आला. त्याला मंत्रतंत्रांची माहिती होतीच. त्यानें कालभैरवाचें तोंड बंद केलें. त्यानंतर मांत्रिकानें लखू व जयमल दोघांना स्वरक्षणासाठीं पळून जायला सांगितलें. पुढें वाचा– ]

ब्रह्मपुराच्या एका सैनिकानें डोंगरावर इतरां-बरोबर चढत असतां लखू व जयमल दोघांना गुहेंतून बाहेर येत असतांना पाहिलें. त्यानें धांवत येऊन राजगुरूला ती गोष्ट सांगितली. म्हणाला–"गुहेंत एक नाहीं, दोन मांत्रिक आहेत. ते पहा!" असें सांगून त्यानें गुहेकडे बोट दाखविलें.

तें ऐकून मांत्रिकानेंच नव्हे तर इतर लोकांनीं व लखूच्या बापानें पण तिकडे पाहिलें. त्यानें आपल्या मुलाला ओळखलें व तो जिवंत असल्याचें पाहून त्याला फार आनंद झाला. त्याला भय वाटत होतें तसें कांहीं झालेलें नाहींतर.

राजगुरूनें त्या दोघांना पळत असलेलें पाहून म्हटलें–"ते मांत्रिक नसून त्या



मांत्रिकाचे शिष्य दिसत आहेत. मांत्रिक गुहेंतून आणखी कोणत्या तरी वाटेनें पळाला असावा किंवा आंतच गुप्त स्थानीं लपून बसला असावा. त्याच्या शिष्यांना पण धरलें पाहिजे. तुम्ही चौफेर नजर ठेवून चौघे पांच जण असे निरनिराळ्या वाटेनें वर चढा. सैनिकांनीं तसेंच केलें. डोंगराला जणुं कांहीं वेढाच पडला व सर्व वर चढूं लागले.

लखू व जयमल दोघांनीं आतां सुटका नाहीं हें ओळखलें व बराच वेळ किंकर्तव्य विमूढ स्थितींतच उभे राहाले.

"जयमल ते चौफेर वेढा घालून वर चढत आहेत. आतां आपण काय करायचें? त्यांची नजर चुकवून कोठें व कसें रे पळायचें?" लखूनें विचारलें.

"मी तरी त्याच विचारांत आहें!" असें म्हणत तो कांहीं वेळ गुपचुप उभा राहाला. थोड्या वेळानें म्हणाला—"ह्या सैनिकांची नजर चुकवून खालीं रानांत पळून जाणें अशक्य आहे आपल्याला. म्हणून चल आपण येथेंच कोणत्या तरी गुहेंत शिरून लपून बसूं या."

"आपल्याला हुडकून काढायलाच जे लोक येत आहेत ते सारा डोंगर हुडकून चाळून काढतील. गुहा, खड्डे ह्यांची सर्व पाळंमुळं घातल्याशिवाय राहतील का? कांहीं म्हणा, त्यांनीं आपल्याला पाहिलें आहे, आतां सुटका मिळणें कठीण आहेत." लखू म्हणाला.

"कांहीं भिण्याचें कारण नाहीं. मला एक अशी जागा माहीत आहे कीं तेथवर कोणी येणें शक्यच नाहीं आणि समज, त्यांनीं आपल्याला धरलेंच तरी मी एक उपाय योजला आहे, आपल्या जिवाला कांहीं धोका नाहीं." जयमल म्हणाला.



लखूनें विचार केला, जयमल हुशार आहे, त्यानें खात्रीनें कांहीं तरी युक्ति काढली असणार. लखू विचारणारच होता कीं काय करायचें? इतक्यांत जयमलनें एका खोल गुहेंत उडी मारली आणि तेथून हळूच म्हणाला—"येथें थोडा काळोख आहे. पण तुला भिण्याचें कारण नाहीं. मार उडी. मला गुहेंतली वाट चांगली माहीत आहे. माझ्या पाठी मागून चालत ये!"

लखू त्याशिवाय करणार तरी काय? जयमलच्या पाठोपाठ तो देखील गुहेंत शिरला. दोघे दोन्ही हातांनीं गुहेच्या भिंती चाचपत हळूहळू आंत चालूं लागले.

राजगुरूच्याबरोबर आलेल्या सैनिकांनीं दोघांना गुहेंत जातांना पाहिलें नाहीं. तसे ते प्रत्येक खड्डा व गुहा डोकावून पहात होते. ते सर्व ब्रह्मदंडी मांत्रिकाच्या गुहेसमोर आले. पण गुहेंत पाऊल टाकल्याबरोबर दोघे सैनिक भिऊन घाबरून जाऊन बेशुद्ध होऊनच पडले व दोघे भिंतीला टेकून कसे-बसे उभे राहाले. त्यांना आंत काळभैरवाची विकाळ मूर्त दिसली. याशिवाय प्रथम पासूनच मांत्रिकाची दहशत मनांत होतीच. भिंतीला टेकून जे उभे होते त्यांना भीतीनें



कांपरेंच भरलें होतें व ते ओरडत होते—"बाप रे बाप! हें काय? नको नको, बाबा! आम्हांला सोड! आमच्याकडे डोळे वटारून पाहूं नकोस!" आम्हीं कान धरले. हे पहा चाललों परत. माफ कर. सैनिकांचा आवाज ऐकून राजगुरु व सेनापति घाई घाईनें तेथें आले. गुहेच्या समोर दोघे सैनिक बेशुद्ध पडलेले होते.

जमिनींवर बेशुद्ध होऊन पडलेल्या दोघां सैनिकांना व थरथर कांपत असलेल्या दोघां सैनिकांना पाहून सेनापतीला राग आला. जमिनीवर बेशुद्ध पडलेल्या सैनिकांना लाथेनें



हलवून तो म्हणाला–"झालें काय रे मरायला तुम्हांला? उठा!"

बेशुद्ध होऊन पडलेल्या दोघां सैनिकांना तोंपर्यंत शुद्ध आली होती. सेनापतींचा आवाज त्यांनीं ऐकला व उठून उभे राहाले आणि हात जोडून म्हणाले–"काळभैरवाची ती भयंकर मूर्त पाहून आम्हांला भीति वाटली, सेनापति!" "तुम्ही ब्रह्मपुराचे सैनिक आहां ही गोष्ट विसरलांत वाटतें?" असें म्हणत राजगुरू गुहेंत शिरला.

गुहेंत सर्वत्र निस्तब्धता होती. काळभैरवाच्या मूर्तीसमोर मांत्रिकानें पेटवलेले होमकुंड अजून जळत होतें. त्याचा धूर अद्याप गुहेंत पसरलेला होता. सर्व वातावरण भीति वाटण्यासारखेंच होतें. तरी गुहेंत फिरत व प्रत्येक भिंत वाजवून पहात राजगुरु म्हणाला–

"सेनापति! या गुहेंतून बाहेर जायला खात्रीनें कोणता तरी गुप्त मार्ग असला पाहिजे. त्याच मार्गानें मांत्रिक पळाला असावा. त्याच्या दोघां शिष्यांना बाहेर येऊन कोठें तरी पळतांना आपण पाहिलें आहेच. कोठें त्यांच्या शोधार्थ नेमलेल्या सैनिकांच्या हातून सुटून पळणें त्यांना अशक्य आहे. पण या मांत्रिकाला आपणच हुडकून काढलें पाहिजे."

सेनापतीनें सारी गुहा व तिचे कानेकोपरे फिरून पाहिले. भिंती, जमीन, छप्परें सर्व तपासून वाजवून पाहिलें पण त्याला कोठें गुप्त दरवाजा दिसला नाहीं. "आपण आलों तो दरवाजा सोडून दुसरा दरवाजा दिसत नाहीं, राजगुरु!" सेनापति म्हणाला.

"असा सरळदिसला तर तो गुप्त दरवाजा कसा असूं शकेल. प्रत्येक काना कोपरा पुन्हां चांगला चाचपून वाजवून पहा! नक्की गुप्तद्वार कोठें तरी आहे!" राजगुरु म्हणाला.

सैनिकांनीं राजगुरूच्या आज्ञेप्रमाणें पुन्हां काना कोपरा तपासून पाहिला. पण कोठेंहि गुप्तदार दिसलें नाहीं.

पण इकडे राजगुरु काळभैरवाची मूर्त न्याहाळून पहात उभा होता. त्याला एक संशय आला. गुप्त द्वार कोठें दिसत नाहीं असें सेनापतीनें सांगितल्यावर गुहेंतली प्रत्येक लहान मोठी वस्तु पहात राजगुरूनें काळभैरवाच्या मूर्तीकडे बोट दाखवीत म्हटलें–"मला वाटतें कीं या काळभैरवाच्या मूर्ती खालीं खात्रीनें गुप्त मार्ग असला पाहिजे. नाहींतर तो मांत्रिक जाणार कोठें? मूर्ती जोरानें हलवून पहा!"

पण मूर्तीला हात लावण्याची कोण हिम्मत करणार? कोणाचें पाऊल पुढें पडेच ना. तेव्हां राजगुरूनें स्वतः ती मूर्त हलवण्याचा प्रयत्न केला. सेनापति व सैनिकांना थोडा धीर आला व त्यांनीं पण जोर जोरानें ती मूर्त हलविली. पण मूर्त जागची हल्ली नाहीं.

राजगुरूनें या खेपेस काळभैरवाची मूर्त डोक्यापासून खालपर्यंत तपासून पाहिली.



मूर्तीची पाठ हळूच वाजवून पाहिली आणि म्हणाला–"असें काय! अरे चोरा! ही आहे वाटतें तुझी चोर वाट! पहिल्यानें मला वाटलें कीं ही दगडाची मूर्त असणार. पण कळलें. साधी लाकडी दिसते आहे. एका बाजूला धरून उचललें किंवा मोठा दगड घेऊन ही फोडली तर चोर वाट दिसेल. मला तर असाहि संशय वाटतो आहे कीं कदाचित मांत्रिक या मूर्तीच्या पोटांत शिरून लपून बसला असेल आणि आपण बोलतों आहों तें सर्व ऐकत देखील असेल." असें म्हणत राजगुरु जोरानें हंसला.



पण राजगुरूच्या आज्ञेनें सेनापति व सैनिकांनीं मिळून तलवारीनें मूर्तीवर आघात करायला सुरवात केली. त्यांनीं काळभैरवाची शेपटी उचलून वर ओढल्याबरोबर ती तुटून गेली आणि मूर्ती दुभंगली आणि खालीं पडली.

स्वत: राजगुरु चकित झाला. मग सैनिकांच्या मनाची जी स्थिति झाली असेल त्याचें वर्णन करण्याची गरज नाहीं. मांत्रिकानें काळभैरवाच्या पोटांत शिरून पळायला चोरवाट तयार करून ठेवली असेल. तो त्याच वाटेनें पळाला असावा किंवा बाहेर-पर्यंत वाट नसेल तर मध्येंच कोठें तरी लपून बसला असावा. राजगुरु असा विचार करून सेनापतीला म्हणाला–"सेनापति, मांत्रिकाला पकडणें, माझ्यामतें आतां, वाटतें तितकें कठीण नाहीं. आपले सैनिक डोंगरांतली प्रत्येक गुहा हुडकून काढीतच आहेत. म्हणून डोंगर उतरून निसटून जाणें त्याला शक्यच नाहीं. आतां ही चोर वाट कोठपर्यंत व कशी जाते हें कोणालाच माहीत नाहीं. या चोर वाटेंतच स्वारी कोठेंतरी असणार असें वाटतें मला ! मांत्रिकानें टाकलेल्या मशाली पेटवून चला शिरा आंत."

मांत्रिकानें कांहीं मशाली तयार करून ठेवल्या होत्या. सैनिकांनीं त्या तेलांत बुडवून पेटविल्या. सेनापति पुढें चालत होता. ते काळभैरवाच्या पोटांत उतरून चालूं लागले.

तिकडे जयमलच्या सांगण्याप्रमाणें लखू त्याच्या पाठोंपाठ एका गुहेंत शिरला होता. ती गुहा म्हणजे बिबळ्या सिंहाची गुहा होती. हा विचित्र सिंह मांत्रिकानें स्वतःच्या मंत्रबळानें निर्मिलेला सिंह होता. नाहीं तर सिंहाच्या अंगावर बिबळ्या वाघाच्या अंगावर असतात तसे ठिपके कोठून असणार ? हें मागें आपल्याला कळलेंच आहे. तो सिंह गुहेच्या दुसऱ्या दारासमोर दगडावर झोंपलेला



होता. त्या गुहेंत दोघे भिंतीला टेकून उभे होते. त्यांना काळभैरवाची मूर्त दुभंगली तो आवाज ऐकूं आला होता.

"मला वाटतें, ब्रह्मदंडी आतां सुटणें शक्य नाहीं. त्यांना त्याची खरी चोरवाट सांपडली आहे. ते खात्रीनें त्या वाटेनें येऊन त्याला कैद करणार !" जयमल म्हणाला. इतक्यांत त्यांना त्या बाजूनें कोणी तरी येत असल्याचा भास झाला.

"सैनिकांना आपण लपून बसलों आहों ती जागा देखील कळली कीं काय ?" लखूनें घाबऱ्या आवाजांत विचारलें.

जयमल धांवत गुहेंत त्या बाजूला गेला. त्यानें गुहेच्या तोंडावर एक दगड ओढून बसविला व त्याला ढकलून कोणी पुढें येऊं नये म्हणून तेथें पडली होती ती, एक लोखंडी तुळई, दगडाला टेकून उभी करून ठेवली. नंतर पुन्हां लखू उभा होता तेथें येऊन उभा राहिला. म्हणाला–"आतां आपल्याला कसलीहि भीति या बाजूनें उरला नाहीं. आडवा दगड पाहून व पुढें गुहा बंद होते असें समजून ते परत जातील. हो, पण ब्रह्मदंडी कोठें आहे ? त्याला सैनिकांनीं धरलें कीं काय ?"



लखू कांहीं उत्तर देणार इतक्यांत दगडा-पलीकडून त्याला कोणीतरी हांक मारीत असल्याचें ऐकूं आलें–"शिष्य !"

जयमलनें तो आवाज ओळखला. त्याचें सर्व अंग थरारलें. तो लखूला हळूंच कानांत म्हणाला–"काळभैरवाच्या पोटांतून एक चोर वाट आहे हें मला माहीत आहे. पण ती वाट याच गुहेंत येऊन मिळते हें मला माहीत नव्हतें. ब्रह्मदंडी, समोरून बाहेर कोठें पळून जाणें शक्य नाहीं असा विचार करून या चोर वाटेनें यायला निघाला असणार ! पण ती चोर वाट देखील सैनि-

कांना कळलेली पाहून तो पळत आला असणार. आतां स्वारी आंत सापडली आहे. आपण तो दगड बाजूला सरकवला तर ब्रह्मदंडी सुटेल पण त्याच्याबरोबर आपल्याला देखील ते कैद केल्याशिवाय राहणार नाहींत. म्हणून आपण तो दगड बाजूला सरकवण्याच्या भानगडींत पडतां कामा नये."

तिकडे ब्रह्मदंडी 'शिष्य' 'शिष्य' असा ओरडत होता. नंतर त्यानें आपला ब्रह्मदंड दगडावर आपटून पाहिला. पण त्याला उत्तर मिळालें नाहीं. लखू व जयमल कांहीं एक हालचाल केल्याशिवाय जागच्या जागीं उभे होते.

तिकडे राजगुरूच्या आज्ञेप्रमाणें चोरवाटेनें आंत शिरलेले सैनिक आंत काळोखांत पुष्कळ हिंडले. पण त्यांना मांत्रिक कोठें आहे हें कळलें नाहीं व ते परत राजगुरु उभा होता तेथें परत गेले. "मांत्रिक आंत सापडला नाहीं!" राजगुरूनें विचारलें.

"राजगुरु! आंत तो कोठें दिसला नाहीं. आंत नागमोडी वाट आहे. किती तरी फाटे फुटतात त्या वाटेला. तो कोठें लपला आहे कीं पुढें कोठें निघून गेला, कळायला मार्ग नाहीं." सेनापति म्हणाला.

"असें काय! चोर जातो कोठें!" असे म्हणून राजगुरु कांहीं वेळ विचार करीत उभा राहिला व म्हणाला—"तो याच गुहेंत शिरला आहे यांत शंका नाहीं. त्याला बाहेर काढायला एक युक्ति सांगतो. या गुहेच्या तोंडावर लाकडें रचून तीं पेटवा. आंतली हवा तापेल व धुरानें गुहेंत कोंदटल्यासारखें झाल्यावर तो कोणत्या ना कोणत्या तरी वाटेनें बाहेर येईलच."

सैनिकांनीं त्याप्रमाणें लाकडें रचून त्यांवर तेल ओतलें व त्यांना आग लावली.

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)



# लहान तोंडी मोठा घास

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरून प्रेत काढून घेऊन नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुझी ही निष्ठा पाहून मला केव्हां केव्हां असें वाटूं लागतें कीं तुझ्याहून बलाढ्य व पराक्रमी अशा कोणातरी व्यक्तीच्या आज्ञेनें तूं हें सर्व करीत असावास. कारण आपल्याहून जास्त शक्तिवान माणसाशीं बरोबरी केल्यामुळें कष्ट सोसावे लागतात. राजाशीं बरोबरी करण्याच्या प्रयत्नांत यशवर्मा देखील दुःखी झाला होता. मी तुला त्याची गोष्ट सांगतो." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

यशवर्मा नांवाच्या एक क्षत्रिय तरुण कलिंग देशांत रहात असे. तो वंग देशाच्या राजाच्या पदरीं नोकरी करीत असे.



पुढें वंगदेश व मगध यांचें आपसांत युद्ध सुरू झालें. वंग देशाच्या राज्यानें पराक्रम गाजवून मगध देशाचा पराभव केला. या युद्धांत यशवर्मा यानें देखील असामान्य शौर्यानें युद्ध करून कीर्ति मिळविली.

राजानें सर्व शूर सैनिकांना इनामें व जहागिरी वांटल्या. पण यशवर्माला मात्र कांहीं दिलें नाहीं. सरदार सेनापतींकडून आपली शिफारस करवून कित्येकांनीं मोठमोठीं बक्षिसें मिळविलीं. यशवर्मा कोणाकडे गेला नव्हता. राजानें त्याला इनाम दिलें नाहीं. त्याची त्याला विशेष फिकीर होती असेंहि नाहीं.

राजा प्रत्येक उत्सवाच्या निमित्तानें पदव्या व इनामें वांटीत असे. पण त्या प्रसंगीं देखील यशवर्माला कांहीं मिळालें नाहीं. तीनचार वर्षें नोकरी करून देखील यशवर्माची गरीबी वाढत गेली त्याचें आणखी एक कारण होतें. गरीबीमुळें कोणी कष्ट सहन करीत असलेला त्याला पहावत नसे. त्याच्याकडे नवे कपडे नव्हते. त्याचीं शस्त्रें देखील हळूहळू जुनीं होत चाललीं होतीं. नोकरचाकर कोणी नाहीं. घोड्याला पुरेसें दाणापाणी देखील मिळतनासें झालें. म्हणून तो स्वत: नदीकांठीं फिरायला जाण्याचें मिश करून घोड्याला चरायला घेऊन जाऊं लागला.

नेहमींप्रमाणें तो आपल्या घोड्याला चरायला सोडून एका झाडाखालीं विश्रांति घेत बसला असतां दोन तरुण स्त्रिया त्या बाजूला आल्या. त्या म्हणाल्या—"आमच्या बाईसाहेबांना आपल्याजवळ कांहीं तरी बोलावयाचें आहे. आपण दोन मिनिटें समोरच्या त्या घरांत आलांत तर आम्ही आपल्या फार आभारी होऊं."

त्यांना पाहूनच यशवर्माला फार आश्चर्य वाटलें. त्यांत त्यांनीं केलेली ती विनंति ऐकून तो जास्तच चकित झाला. अशा तऱ्हेनें येणें आणि बोलणें सर्वच त्याला विचित्र वाटलें. तरी तो त्यांच्याबरोबर निघाला.

त्या घरांत एक अनुपम रूपवती स्त्री असेल याची त्यानें स्वप्नांत देखील कल्पना केली नव्हती. तिनें यशवर्माला बसायला सांगितलें व म्हणाली—"मी एक गंधर्व स्त्री आहें. तुझ्यासारख्या शूर व उदार पुरुषाशीं प्रेम करण्यांत आम्हांला अभिमान वाटतो. तुझ्याशीं लग्न करून माझा संसार सुखाचा होईल असें मला वाटतें."

यशवर्माला तें सर्वच विचित्र व अनपेक्षित वाटलें. तरी धीर करून म्हणाला—"माझ्याशीं लग्न केल्यानें तुझ्या मनाला जितकें सुख व समाधान वाटेल तितकेंच तें मला देखील वाटेल." त्यानंतर गांधर्व पद्धतीनें दोघाचें लग्न झालें. त्या गंधर्व स्त्रीनें पंचपक्वान्नें तयार करवून यशवर्माला जेवण वाढलें. यशवर्माला स्वर्गिक सुखाचा अनुभव होऊं लागला.

कांहीं वेळानें ती गंधर्व स्त्री यशवर्माला निरोप देत म्हणाली—"आतां मला गेलें पाहिजे व तुला देखील गेलें पाहिजे. ही पिशवी मी तुला देतें. ह्या पिशवींतल्या















मोहरा कधीं कमी होणार नाहींत. तूं किती मोहरा कोणाला दिल्यास तरी तितक्याच पुन्हां पिशवींत आपोआप येतील. ही पिशवी जवळ असेपर्यंत तुला कसलीहि उणीव भासणार नाहीं. मला कधीं भेटावयाचें झाल्यास तूं येथें येऊन मला हांक मार. मी एका क्षणांत हजर होईन. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. माझ्याविषयीं चुकून देखील कोणाशीं कांहीं बोलूं नकोस. कारण तूं बोललास तर मात्र आपली भेट अशक्य!"

यशवर्माच्या जीवनांत त्या दिवसापासून पुष्कळच बदल झाला. त्यानें एक महाल बांधला व त्यांत राहूं लागला. जरीचे कपडे घालूं लागला. त्याच्या घोड्याचें खोगीर सोन्याचें झालें. तो गरीबींत देखील गोरगरिबांना दान करीत असे. तसाच श्रीमंतींत देखील करूं लागला. त्याचे दिवस पालटलेले पाहून त्याच्या साथी मित्रांना आनंदच वाटला.

त्याला वेळ मिळाला म्हणजे तो नदीकाठीं जाऊन त्या घरीं जाई व त्या गंधर्व स्त्रीला भेटून येई. दोघें कित्येक दिवस अशींच आनंदानें व सुखासमाधानानें रहात होतीं.

सुमारें एक वर्ष लोटलें. गुढी पाडवा होता. राजा सर्व मानकऱ्यांना मेजवानी देत असे. मेजवानी थाटामाटाचीच होत असे. मेजवानीच्या वेळीं राजा सहज म्हणाला--"आपल्या देशाची राणी खरोखरच राणी आहे. तिच्या बरोबरीची रूपवती या दुनियेंत कोठेंहि असेलसें मला वाटत नाहीं. आज राणी साहेब स्वतः मेजवानीला हजर राहणार आहेत. त्यांच्याहून अधिक सुंदर स्त्री तुम्ही कोठें पाहली असेल तर तसें सांगावें व तसें सिद्ध करून पण दाखवावें."

राजाच्या विनंतीस मान देऊन राणी सरकार मेजवानीसाठीं आल्या. जे नोकर राजाचा निरोप घेऊन गेले होते त्यांनी मान करी लोकांसमक्ष राजानें जें कांहीं सांगितलें होतें तें सांगून राणीच्या सौंदर्याची जास्तच स्तुति केली. राणी गर्वानें फुलून गेली.

राणी आल्याबरोबर सर्व दरबारी उभे राहाले. स्वतः महाराज पण स्वागतासाठीं उभे राहाले व म्हणाले—"मी म्हणालों तें खरें आहे कीं नाहीं आतां तुम्हीच सांगा!"

राणी सुंदर होती खरी, परंतु तिच्याहून सुंदर अनेक दरबाऱ्यांच्या बायका सुद्धां होत्या. पण राजासमक्ष कोण काय बोलणार. सर्व म्हणाले—"महाराजांचें म्हणणें बरोबर आहे. इंद्राची इंद्राणी देखील राणीसरकारांच्या सौंदर्यासमोर मान खालीं घालून उभी राहील." परंतु यशवर्मा कांहींच बोलला नाहीं. इकडे तिकडे पहात बसून राहिला. पण राणीचें लक्ष सर्वांच्या तोंडाकडे होतें. तिनें यशवर्माकडे बोट दाखवीत म्हटलें—"तुमचा हा दरबारी थोडा उद्धट दिसतो आहे. ह्यानें माझ्या सौंदर्याचा अपमान केला आहे. त्याला त्याचें प्रायश्चित्त मिळालें पाहिजे!"

तें ऐकून राजा संतापानें यशवर्माकडे पहात म्हणाला—"यशवर्मा! सर्वजण राणीच्या



सौंदर्याची प्रशंसा करीत असतां तूं एकटा गुपचूप कां? कारण कळलें पाहिजे!"

यशवर्मा उभा राहून म्हणाला—"महाराज! इतक्या दरबारी व मानकरी लोकांसमक्ष स्वतः राणीसाहेबांना बोलावून त्यांच्या रूपाचें वर्णन करणें महाराजांना किंवा राणीसरकारांना देखील शोभत नाहीं. सर्वांनीं आपल्या होला हो देऊन राणीसाहेबांच्या रूपाची प्रशंसा करावी आपण ही अपेक्षा ठेवणें देखील मला रास्त वाटत नाहीं. राणी सरकारांचें सौंदर्य खरोखरच अवर्णनीय आहे पण अप्रतिम नाहीं."











मोहरा कधीं कमी होणार नाहींत. तूं किती मोहरा कोणाला दिल्यास तरी तितक्याच पुन्हां पिशवींत आपोआप येतील. ही पिशवी जवळ असेपर्यंत तुला कसलीहि उणीव भासणार नाहीं. मला कधीं भेटावयाचें झाल्यास तूं येथें येऊन मला हांक मार. मी एका क्षणांत हजर होईन. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. माझ्याविषयीं चुकून देखील कोणाशीं कांहीं बोलूं नकोस. कारण तूं बोललास तर मात्र आपली भेट अशक्य!"

यशवर्माच्या जीवनांत त्या दिवसापासून पुष्कळच बदल झाला. त्यानें एक महाल बांधला व त्यांत राहूं लागला. जरीचे कपडे घालूं लागला. त्याच्या घोड्याचें खोगीर सोन्याचें झालें. तो गरीबींत देखील गोरगरिबांना दान करीत असे. तसाच श्रीमंतींत देखील करूं लागला. त्याचे दिवस पालटलेले पाहून त्याच्या साथी मित्रांना आनंदच वाटला.

त्याला वेळ मिळाला म्हणजे तो नदीकांठीं जाऊन त्या घरीं जाई व त्या गंधर्व स्त्रीला भेटून येई. दोघें कित्येक दिवस अशींच आनंदानें व सुखासमाधानानें रहात होतीं.

सुमारें एक वर्ष लोटलें. गुढी पाडवा होता. राजा सर्व मानकऱ्यांना मेजवानी देत असे. मेजवानी थाटामाटाचीच होत असे. मेजवानीच्या वेळीं राजा सहज म्हणाला—"आपल्या देशाची राणी खरोखरच राणी आहे. तिच्या बरोबरीची रूपवती या दुनियेंत कोठेंहि असेलसें मला वाटत नाहीं. आज राणी साहेब स्वतः मेजवानीला हजर राहणार आहेत. त्यांच्याहून अधिक सुंदर स्त्री तुम्ही कोठें पाहली असेल तर तसें सांगावें व तसें सिद्ध करून पण दाखवावें."

राजाच्या विनंतीस मान देऊन राणी सरकार मेजवानीसाठीं आल्या. जे नोकर





राजाचा निरोप घेऊन गेले होते त्यांनी मानकरी लोकांसमक्ष राजानें जें कांहीं सांगितलें होतें तें सांगून राणीच्या सौंदर्याची जास्तच स्तुति केली. राणी गर्वानें फुलून गेली.

राणी आल्याबरोबर सर्व दरबारी उभे राहिले. स्वतः महाराज पण स्वागतासाठीं उभे राहिले व म्हणाले—"मी म्हणालों तें खरें आहे कीं नाहीं आतां तुम्हीच सांगा!"

राणी सुंदर होती खरी, परंतु तिच्याहून सुंदर अनेक दरबाऱ्यांच्या बायका सुद्धां होत्या. पण राजासमक्ष कोण काय बोलणार. सर्व म्हणाले—"महाराजांचें म्हणणें बरोबर आहे. इंद्राची इंद्राणी देखील राणीसरकारांच्या सौंदर्यासमोर मान खालीं घालून उभी राहील." परंतु यशवर्मा कांहींच बोलला नाहीं. इकडे तिकडे पहात बसून राहिला. पण राणीचें लक्ष सर्वांच्या तोंडाकडे होतें. तिनें यशवर्माकडे बोट दाखवीत म्हटलें—"तुमचा हा दरबारी थोडा उद्धट दिसतो आहे. ह्यानें माझ्या सौंदर्याचा अपमान केला आहे. त्याला त्याचें प्रायश्चित्त मिळालें पाहिजे!"

तें ऐकून राजा संपातानें यशवर्माकडे पहात म्हणाला—"यशवर्मा! सर्वजण राणीच्या सौंदर्याची प्रशंसा करीत असतां तूं एकटा गुपचूप कां? कारण कळलें पाहिजे!"

यशवर्मा उभा राहून म्हणाला—"महाराज! इतक्या दरबारी व मानकरी लोकांसमक्ष स्वतः राणीसाहेबांना बोलावून त्यांच्या रूपाचें वर्णन करणें महाराजांना किंवा राणीसरकारांना देखील शोभत नाहीं. सर्वांनीं आपल्या होला हो देऊन राणीसाहेबांच्या रूपाची प्रशंसा करावी आपण ही अपेक्षा ठेवणें देखील मला रास्त वाटत नाहीं. राणी सरकारांचें सौंदर्य खरोखरच अवर्णनीय आहे पण अप्रतिम नाहीं."

"इतकी रूपवती दुसरी स्त्री दाखविल्या-शिवाय तुला मी सोडणार नाहीं." राजा म्हणाला.

"इतर कोणाचें उदाहरण देण्याची गरजच नाहीं. माझी स्त्रीच महाराणी पेक्षां शतपटीनें जास्त सुंदर आहे!" यशवर्मा म्हणाला.

तें ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. यशवर्माचें लग्न झाल्याची गोष्ट कोणालाच माहीत नव्हती.

"तर तूं आपल्या बायकोला दरबारांत हजर कर! कोण अधिक सुंदर आहे याचा निश्चय आतांच्या आतां झाला पाहिजे." महाराणी गरजली.

राजानें देखील होकार दिला. म्हणाला—"घेऊन ये आपल्या बायकोला. ती अधिक सुंदर असेल तर मी तुला माफ करीन. नाहीं तर आजन्म तुरुंगवास भोगावा लागेल."

यशवर्मा लगेच घोड्यावर बसून नदीकाठीं गेला व त्यानें नित्याप्रमाणें आपल्या बायकोला हाक मारली. त्यानें कित्येकदां हाक मारली पण ती आली नाहीं. त्यानें अट मोडली होती आणि आपल्या बायकोच्या सांगण्या-प्रमाणें वागला नव्हता. तिच्या विषयीं इतरां जवळ तो बोलला होता. पण त्याला त्या



अटीचा विसर पडला. तोंडांतून निघालेला शब्द सुटलेल्या बाणासारखा परत येत नसतो. ती त्याला दिसली नाहीं.

राजा त्याला तुरुंगांत टाकणार हें माहीत असून देखील, बायकोची भेट झाली नाहीं म्हणून निराश होऊन दुःखी मनानें तो परत आला. राजानें त्याला पाहाल्याबरोबर विचारलें—"कोठें आहे तुझी बायको?"

"महाराज! तिला येथें दरबारांत आणणें शक्य नाहीं." यशवर्मा म्हणाला.

राजानें आपल्या दोघां शिपायांना बोला-वून यशवर्माला कैद करायला सांगितलें. लहान तोंडी मोठा घास घेतल्याबद्दल याला शिक्षा झालीच पाहिजे."

यशवर्मा अंधारकोठडींत आपल्या बायको-च्या नांवाचा जप करीत मेला. त्याला त्याची बायको कधीं दिसली नाहीं की तिचा एक शब्द त्याच्या कानीं पडला नाहीं."

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा! आतां तूंच सांग, यशवर्मानें हा वेडेपणा कां करावा? त्याच्या थोड्याशा अविवेकीपणामुळें एका बाजूला त्याच्यावर राजा व राणी रागावलीं व दुसऱ्या बाजूला त्याची बायको देखील रागावली. इतरां-



प्रमाणें राणीच्या सौंदर्याची थोडी स्तुति करून टाकली असती तर त्यांत काय बिघडलें असतें ? त्यानें राजाला इतकें तुच्छ कां लेखावें ? कदाचित त्याला ह्या गोष्टीची घमेंड चढली असावी कीं त्याची बायको एक गंधर्व स्त्री आहे व तिच्या कृपेमुळें त्याच्या जवळ अलोट धन देखील आहे. या सर्व प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर शकलें होऊन तुझ्याच पायावर आदळतील."

"यशवर्मा राजाला तुच्छ लेखीत नव्हता ! तसें असतें तर गंधर्व स्त्रीशीं विवाह झाल्या-नंतर तो राजाची नोकरी सोडून केव्हांच निघून गेला असता. त्याची बायको एक गंधर्व स्त्री आहे. या गोष्टीची किंवा त्याच्या कडे अलोट धन असल्याची घमेंडपण त्याला चढली नव्हती. तसें असतें तर तीं दोन्ही रहावी यासाठीं त्यानें तशी काळजी घेतली असती. इतरांप्रमाणें खोटें बोलून वेळ मारून नेण्याची त्याला संवय नव्हती. तो स्वभावानें निष्कपट होता. राजानें त्याच्या पराक्रमा-बद्दल त्याला कधींच कांहीं इनाम किंवा बक्षिस दिलें नाहीं. तरी तो राजाची नोकरी सोडून गेला नाहीं. उलट इमानें इतबारें त्याची सेवा करीत राहाला. यावरून तो राजाला तुच्छ लेखीत नव्हता हें सिद्ध होतें-निस्वार्थपणा व निष्कपट स्वभाव दोन्हींमुळें त्याला खरें बोलण्याची संवय झाली होती. पण या गोष्टीचा काय परिणाम होईल याकडे त्यानें दुर्लक्ष केलें." राजा म्हणाला.

या प्रमाणें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला.





# धडा मिळाला

एका गांवांत यज्ञशर्मा नांवाचा एक वेदशास्त्र संपन्न ब्राह्मण होता. चार घरची भिक्षुकी होती. त्यावर त्याचा उदर निर्वाह चाले. त्याला बायको नव्हती व मूलबाळ देखील नव्हतें. म्हणून त्याला जें कांहीं मिळे तें दान धर्म करण्यांत तो खर्च करी.

यज्ञशर्माच्या घरासमोर एका वाण्याचें घर होतें. त्याचें नांव नरसिंह असें होतें. दोघे लहानपणापासून मित्र होते. पण दोघांच्या स्वभावांत मात्र फार फरक होता. नरसिंह स्वार्थासाठीं काय वाटेल तें करायला सिद्ध असे. यज्ञशर्मानें आपल्या मित्राच्या स्वभावांत बदल व्हावा म्हणून पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, पण फुकट.

एकदां एका श्रीमंत गांवकऱ्याला पुष्कळ नवस केल्यानंतर एक मुलगा झाला. त्या मुलाचें बारसें अर्थातच फार थाटानें झालें. त्या दिवशीं यज्ञशर्मालाच भटजी म्हणून बोलावण्यांत आलें होतें. त्या श्रीमंत गृहस्थानें भटजींना एक पीतांबर आणि एक हिऱ्याची अंगठी दिली व वर भरपूर दक्षिणापण दिली. यज्ञशर्मानें अंगठी सर्व गांवकऱ्यांना दाखविली. नरसिंहाला त्याचा हेवा वाटला. मी दिवसभर इतकी मेहनत करतों, पण मी कधीं अंगठी करून बोटांत घातली नाहीं, आणि या भटाला अंगठी मिळाल्याबरोबर गांवभर दाखवीत सुटला आहे.

वाण्याच्या स्वभावाची ओळख यज्ञशर्माला चांगली होती. त्यानें त्याच्या मनांतला भाव चटकन ओळखला. नरसिंहाच्या देखत त्यानें ती अंगठी एका डबींत ठेवली व डबी कोनाड्यांत ठेवून दिली. नरसिंह तें पाहून

मनांतल्या मनांत खूष झाला. त्यानें त्या रात्रीं ती अंगठी लांबवण्याचें मनांतल्या मनांत योजलें आणि घरीं निघून गेला.

मध्य रात्रीच्या सुमारास नरसिंह यज्ञशर्माच्या घरीं आला. दरवाज्याला हात लावल्याबरोबर तो उघडला. अगदीं मूर्ख म्हणजे महामूर्ख आहे हा भट! असा विचार करीत नरसिंह आंत शिरला. यज्ञशर्मा घोरत खाटेवर पडला होता. नरसिंह हळूहळू कोनाड्यापर्यंत गेला आणि डबी उचलून अंगठी घेण्यासाठीं हात लावला मात्र त्याला विंचू चावला. तो ओरडला—"अरे बाप रे! विंचू!"

यज्ञशर्मा झोंपण्याचें सोंग करून खाटेवर पडला होता, तो आवाज ऐकून उठून बसला. "कोण तें? काय पाहिजे?" त्यानें विचारलें. "ओहो! तूं का नरसिंह? कशाला रे आलास या रात्रीच्या वेळीं? कांहीं हवें आहे का? मला हांक कां नाहीं मारलीस? विंचू चावला तुला? अरे रे! झोंपण्याच्या आधीं एक विंचू दिसला. तुला उद्यां सकाळीं दाखवूं या असा विचार करून डबींत ठेवला होता." यज्ञशर्मा म्हणाला.

पण नरसिंहला चांगली अद्दल घडली होती. त्यानें आपली चूक कबूल केली. अंगठी पाहाल्यापासून त्याला खाणेंपिणें झोंप कांहीं सुचत नव्हतें.

"अरे वेड्या! इतका मोह कशाला तुला? देवानें तुला दिलें आहे तें कांहीं कमी आहे का? त्यांत समाधान मानून वागलास तर कांहीं बिघडणार आहे का? ही अंगठी मागितली असतीस तर मी दिली नसती का?" नरसिंहनें स्वतःचा कान धरला व त्या दिवसापासून त्याच्या स्वभावांत पुष्कळ बदल झाला.





# गुणी गणोबा

गणोबांच्या आईला फार वाईट वाटलें कीं किती प्रयत्न करून एक मुलगी ठरविली होती. पण याच्या नशिबांतच लग्न लिहिलेलें नाहीं व सुनेचें तोंड पाहणें आपल्या नशिबी नाहीं. याला साऱ्या जगाची काळजी स्वतःचीच नाहीं. एवढा पैसा खर्च करून मुलगी ठरविली होती. म्हणे, तिचें दुसऱ्यावर प्रेम आहे, तिच्याशीं लग्न करणें बरोबर वाटलें नाहीं. म्हणाली—"हात टेंकले तुझ्या समोर! आतां मला विहिरींत ढकलून दे आणि हो मोकळा!"

"पण आई! माझ्या गुरूनें मला नेहमीं "परोपकारार्थमिदं शरीरम्" चाच उपदेश केला आहे आणि तूंच विचार कर, विकत घेऊन आणलेल्या स्त्रीबरोबर संसार सुखाचा कसा होणार? माझ्या जोगती जी बायको असेल तिच्या बरोबर संसार सुखाचा होईल असें नाहीं का तुला वाटत?" अशी आईची समजूत घालून व लग्न झाल्याशिवाय घरीं परत येणार नाहीं असा मनाशीं निश्चय करून गणोबा घराबाहेर पडले. संध्याकाळीं ते एक गांव ओलांडून पलीकडच्या गांवीं जाण्यासाठीं चालत असतां त्यांना एक म्हातारा पाठीवर एक मोठें ओझें घेऊन जात असलेला भेटला. त्या दिवशीं त्या गांवचा आठवड्याचा बाजार होता. बरेचसें सामान घेऊन म्हातारा गांवीं निघाला होता. त्याला चालवत देखील नव्हतें. गणोबांनीं त्याची ती स्थिति पाहून त्याला विचारलें—"मी घेऊं का हें ओझें."

म्हातारा चकित होऊन गणोबांकडे पाहूं लागला. या कलियुगांत अशीं परोपकारी माणसें देखील आहेत तर! त्यानें गणोबांना



ओझें व्यायला सांगितलें. दोघे म्हाताऱ्याच्या घरीं पोंचले तोंपर्यंत बराच काळोख पडला होता. ओझें खालीं उतरवून ठेवून "मी येतों आतां!" असें म्हणत गणोबा निघाले. तेव्हां म्हाताऱ्यानें त्यांना जवळ बोलावून प्रेमानें विचारलें—"कोठें जाणार बाबा तूं! उद्यां सकाळीं उठून जा पुढें!"

गणोबांनीं होकार दिला व जेवणखाण आटोपून बाहेरच्या ओसरींत चादर अंथरून झोंपले.

त्या म्हाताऱ्याच्या घरीं त्याची एक विधवा सून व तिची पंधरा सोळा वर्षांची एक मुलगी होती. तिचें लग्न अजून झालेलें नव्हतें. तिचें नांव शारदा होतें. ज्योतिष्यानें तिची जन्मकुंडली पाहून लग्न झाल्याबरोबर तिचा पति मरेल असें भविष्य वर्तवलें होतें. ही गोष्ट त्या गांवच्या व जवळपासच्या लोकांना माहीत होती. शारदा दिसायला चांगली होती व स्वभावानें सुशीलपण होती. परंतु अशा कुलक्षणी मुलीशीं लग्न कोण करणार? तिच्या आज्याला तिची जन्मकुंडली पाहल्या-पासून तिचें लग्न करून तिला वैधव्यांत आयुष्य कंठण्यास भाग पाडण्यापेक्षां आयुष्यभर कुंवारी ठेवणें बरें वाटलें.

परंतु त्या देशाच्या राजानें एक कायदा केला कीं सोळा वर्षांहून जास्त कोणी कुंवारी मुलगी असेल तर पाटलानें त्याला वाटेल त्याच्याशीं तिचें लग्न करून द्यावें.

दैवयोग असा कीं गणोबा आले त्याच दिवशीं शारदाला सोळावें वर्ष पुरें होत होतें. दुसऱ्या दिवशीं पाटील येऊन कोणाशीं लग्न लावून देतो कोणास ठाऊक! या विचारानें दोघी मायलेकी रडत होत्या. म्हाताऱ्याला तर कांहींच सुचत नव्हतें.

मध्यरात्रीच्यावेळीं शारदा सर्व झोंपली असतील असें समजून हळूच बाहेर निघून विहिरीकडे गेली, पण तिच्या आईनें तिला पाहिलें व ती पण तिच्या पाठोपाठ धांवत गेली. म्हणाली—"पोरी! तूं एकटीच कां जीव देण्याचा प्रयत्न करीत आहेस! चल, आपण दोघी एकदमच जीव देऊं."

दोघींच्या बोलण्याचा व रडण्याचा आवाज ऐकून गणोबांची झोंप मोडली. दोघी विहिरींत उडी मारण्याच्या तयारींत होत्या. गणोबांनीं धांवत जाऊन विचारलें—"कांहीं पडलें आहे का आंत मी, काढून देतों. अपरात्रीं तुम्ही विहिरींत उडी मारून उतरणें बरोबर होणार नाहीं."

तितक्यांत म्हातारापण बाहेर आला व त्यानें सर्व परिस्थिति गणोबांना समजाऊन सांगितली आणि डोकें धरून बसला. गणोबा म्हणाले—"मी उपाय सांगतों! मी आणखी एक दिवस तुमच्या घरीं राहातों. कोणी आला तर सांगा कीं शारदाचें लग्न झालें आहे. नवरा कोठें आहे म्हणून विचारलें तर माझ्याकडे बोट दाखवा! म्हणजे आलेला प्रसंग टळेल व परवां मी आपल्या वाटेनें निघून जाईन."

"परंतु खोटें सांगून काम भागणार नाहीं. कारण साक्षी पुरावा विचारतील! मग कोण



होता ? कोणत्या मुहूर्तावर व कोठें लग्न झालें हें सर्व पुराव्यासकट दाखविलें नाहीं तर हें खोटें खरें कसें व्हायचें ?" म्हातारा म्हणाला.

"ठीक आहे ! तर मग मी लग्नाला तयार आहें. मी वधू शोधण्यासाठींच घराबाहेर पडलों आहें ! सहजीं तुमचें काम भागेल व माझें काम देखील होईल." गणोबांनीं सुचविलें.

"पण मी आपल्या उपकारकर्त्यांशीं असा द्रोह करायला तयार नाहीं. मुलीची पत्रिका तिच्या नवऱ्याच्या विरुद्ध पडत आहे. लग्न झाल्याबरोबर तो मरणार ! तेव्हां मला हें लग्न कर्तव्य नाहीं." म्हातारा म्हणाला.

"मला मृत्यूचें भय नाहीं. "परोपकारार्थमिदं शरीरम्" असा माझ्या गुरूचा मला उपदेश आहे. परोपकार करीत असतां मरण आलें तर मनुष्य सरळ स्वर्गांत जातो." गणोबा म्हणाले.

शारदा म्हणाली—"पण मी या विवाहास तयार नाहीं. पतिहत्येचें पातक कपाळीं घेऊन मी जिवंत राहण्यापेक्षां कुंवारपणींच मेल्यें तर मला जास्त सुख वाटेल."

पत्रिकेची गोष्ट ऐकून देखील गणोबा लग्नाला तयार झालेले पाहून म्हताऱ्याला आश्चर्य वाटलें. पण त्यानें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें कीं फसवून मुलगी गळ्यांत बांधल्याचें पातक तरी लागणार नाहीं. त्यानें भटाला बोलाविलें. पाटलाला व गांवांतल्या सर्व मोठमोठ्या लोकांना बोलावून लग्नाचा मुहूर्त ठरविला व गणोबांशीं आपल्या नातीचे लग्न लावून दिलें.

ज्या ज्योतिष्यानें मुलीची पत्रिका पाहून भविष्य वर्तविलें होतें, कर्म धर्म संयोगानें तोच लग्न लावण्यासाठीं पण आला होता. आपलें भविष्य खरें ठरावें म्हणून त्यानें पाण्यांत कांहीं तरी औषध कालवलें व गणोबांना प्यायला दिलें. तें पाणी प्यायल्याबरोबर गणोबा घेरी येऊन बेशुद्ध पडले. लग्नाच्या मांडवांत शोककळा पसरली. सर्व रडूं लागलीं. भटजी म्हणाले—

"तरी मी सांगत होतों. विधिलिखित कधीं टळतें का ? तरणा बांड पोरगा होता. उगीच हट्टाला पेटून जीव धोक्यांत घातला त्यानें." भटजी म्हणाले.

पण गणोबांना काय झालें आहे हें कोणी जाऊन पाहिलें देखील नाहीं. ते जिवंत आहेत कीं मेलेले हें देखील पाहाल्याशिवाय स्मशान यात्रेची तयारी सुरू झाली.





गणोबांना घराबाहेर आणून त्यांच्या डोक्यावर घागरभर पाणी ओतण्यांत आलें. त्याबरोबर गणोबांना ठसका लागल्यासारखें झालें आणि ते भडभड ओकले. भटजींनीं पाण्यांत घालून दिलेल्या विषाचा त्यांच्यावर तेवढाच परिणाम झाला.

भटजींना कळलें कीं आतां बिंग फुटणार! म्हणून त्यांनीं सांगायला सुरवात केली कीं मी नवरदेवांचें तोंड पाहिल्याबरोबर त्यांना आयुष्य उदंड असल्याचें ओळखलें होतें. परंतु वधूच्या पत्रिकेप्रमाणें कांहीं झालें तर तो अपशकून होईल असा विचार करून मी पाण्यांत अमृत चूर्ण घालून दिलें होतें. म्हणूनच नवरदेव वांचले, पहा! आतां तुम्ही विचाराल कीं मग तुम्ही ही गोष्ट प्रथम कां नाहीं सांगितलीत? त्याचें कारण असें आहे कीं वधूच्या पत्रिकेप्रमाणें पतीचा मृत्यु हा झालाच पाहिजे. तो मेल्यानंतरच माझ्या औषधाचें खरें महत्व कळेल असा विचार करून मी कांहीं बोललों नाहीं. आतां अनिष्ट ग्रह सर्व टळले आहेत व दोघांचा संसार सुखाचा होणार आहे."

भटजींच्या बोलण्यावर सर्वांचा विश्वास बसला. गणोबांनीं आपल्या सासुरवाडी तीन दिवस राहून आजेसासऱ्याचा निरोप घेतला. घरीं जाऊन त्यांनीं आईला नमस्कार केला. गणोबांचें असें बिनबोभाट लग्न झालेलें पाहून व आपली सून रूपवती व गुणवती आहे हें पाहून म्हातारीला आनंद झाला.

शारदा आपल्या पतीला प्रत्यक्ष ईश्वराचा अवतार मानी. कारण स्वतःचा जीव धोक्यांत घालून तिच्याशीं लग्न करण्यास ते तयार झाले होते. दोघांचें पुढील आयुष्य सुखा-समाधानाचें झालें. [समाप्त]





# गुलाम हिरकणी

खुरासान देशांत एक कोट्याधीश व्यापारी रहात असे. त्या व्यापाऱ्याला एक सुंदर मुलगा होता. त्याचें नांव अलीशार असें होतें. म्हातारा व्यापारी आजारी पडला व त्या दुखण्यांतून उठणें आतां शक्य नाहीं हें ओळखून त्यानें आपल्या मुलाला जवळ बोलावून त्याला म्हटलें—"बाळ! डोळे मिटण्यापूर्वीं तुझ्या हिताच्या दोन गोष्टी सांगणार आहें. हें जग म्हणजे एक भयंकर अरण्य समज. ह्यांत मनुष्याचा मुखवटा घालून हिंस्र श्वापदें राहतात. त्यांच्यापासून स्वतःचें रक्षण फार सावधपणानें करावें लागतें. तुझ्या अंगांत शक्ति असेपर्यंत तूं परोपकार करण्यांत आपलें जीवित खर्ची घाल, पण त्याचा मोबदला मिळेल अशी आशा मात्र मनांत बाळगूं नकोस. आणखी एक गोष्ट. खरें पाहिलें तर परोपकार करण्यास फार क्वचित संधि मिळते. तुझ्याजवळ जी धनदौलत असेल ती व्यर्थ खर्चूं नकोस. कारण जग तुझी किंमत तुझ्या धनावरच करणार. तिसरी गोष्ट म्हणजे दारू पिणें वाईट. मनुष्याचें त्यामुळें शारीरिक आणि नैतिक पतन होतें."

अलीशारनें त्या उपदेशाप्रमाणें वागण्याचें वचन दिल्यावर म्हाताऱ्यानें कायमचे डोळे मिटले. वडील वारल्यावर अलीशार एक वर्षभर त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागला. पण पुढें त्याला वाईट संगत लागली. नीच, दुष्ट व निरुद्योगी लोकांच्या नादीं लागून तो वाईट मार्गाला लागला. एकदां पाऊल चुकलें कीं पुन्हां सावरणें कठीण जातें. तसें झालें त्याचें. व्यापारांत नुकसान होऊं लागलें.



घरदार जमीन जुमला सर्व घालवून बसला, तेव्हां त्याचे डोळे उघडले. माणसाला अक्कल फार उशिरां येते. अंगावरच्या कपड्या-खेरीज त्याच्याजवळ कांहीं उरलें नाहीं.

आतां त्याच्या मित्रमंडळींनीं विचारपूस करण्याची सोडून दिली. तेव्हां कोठें त्याला त्याच्या वडिलांनीं मरणसमयीं केलेल्या उपदेशांची आठवण झाली. राजवाड्यांत रहात होता पण भीक मागून पोट भरीत होता.

एकदां तो भीक मागत बाजारांत निघाला असतां त्याला तेथें एका जागीं लोकांची गर्दी दिसली. तो देखील गर्दीत शिरून गंमत पहायला उभा राहाला. तेथें एका सुंदर गुलाम मुलीचा लिलाव चालू होता. तिचें सौंदर्य खरोखरच अप्रतिम होतें. त्याला स्वतःचें देहभान राहालें नाहीं. तो थक्क होऊन तिच्याकडे पहात उभा राहिला.

गुलामांचा व्यापारी मोठमोठ्यानें ओरडून सांगत होता–"हें सौंदर्य दुनियेंत कोठें मिळणार नाहीं. चंद्र देखील हें सौंदर्य पाहून आपलें तोंड लपवीत कोठें तरी फिरत असावा."

एक जण म्हणाला–"पांचशें दीनार!" रशीद अलदीन नांवाचा एक म्हातारा ओरडला–"सहाशें!" आणखी एकजण "सातशें!" म्हणाला. त्यावरोबर म्हातारा ओरडला—"एक हजार!" तें ऐकून गुलामांच्या व्यापाऱ्यानें गुलाम तरुणीच्या मालकाला विचारलें–"एक हजाराला देऊं या का?"

मालक म्हणाला–"हरकत नाहीं! तिला विचार! कारण मी तिला वचन दिलें होतें कीं ज्याला ती पसंत करील त्याच्याच हातीं तिला विकावयाचें! तिलाच विचार!"

म्हणून व्यापाऱ्यानें गुलाम तरुणीला विचारलें–"जमरूद! रशीद अलदीनची किंमत द्यायला मान्य करायची का?" तिनें होकार दिला.

गुलामांच्या व्यापाऱ्यानें पुन्हां ओरडून विचारलें–"याहून जास्त किंमत द्यायला कोणी तयार आहे का?"

दोघे तिघे पुढें आले. एकजण रशीद इतका म्हातारा नव्हता. तरी त्यानें केसांना कलप लावल्याचें स्पष्ट कळत होतें. दुसऱ्या एकाला एक डोळाच नव्हता. आणखी एकाची दाढी बेंबीपर्यंत लांब लचक होती.

जमरूदनें त्यांपैकीं एकाला देखील पसंत केलें नाहीं व तोंड फिरवून उभी राहली.

पण तिला समोर अलीशार दिसला. त्याचें सौंदर्य पाहून मात्र ती त्याच्याकडे पहात उभी राहाली. ती म्हणाली–"मला हे जे किंमत देतील त्या किंमतीवर यांच्या हातीं विकावें." असें सांगून ती एक गाणें म्हणूं लागली. त्या गाण्यांत पुरुषाच्या सौंदर्याचें वर्णन केलेलें होतें. तिच्याकडे पहात तो व्यापारी म्हणाला—"पोरगी हिरकणी आहे खरी! नुसतें सौंदर्यच नव्हे गुणपण आहेत."

"अजून तुला हिच्या गुणांची कल्पना कोठें आहे? हिला नाचतां येतें, कशिदा





काढतां येतो, शिवण-काम येतें. एका आठवड्यांत पन्नास दीनार किमतीचे गालिचे व पडदे विणून देते ही. किती किंमत दिली तरी दामदुप्पट वसूल होईल."

लिलाव करणारा व्यापारी म्हणाला—" ह्या हिरकणीला जो विकत घेईल तो खरा भाग्यवान ! तो अलीशारला म्हणाला— "पण तुम्हांला शंभर टके कमी किमतीला मिळेल ही !"

पण अलीशार खालीं मान करून पुट-पुटला—" ह्या इतक्या धनीमानी लोकांसमोर सर्वस्व घालवून बसणाऱ्याला कोण विचारतो?"

पण जमरूदच्या कानावर ते शब्द पडले. तो तोंड खालीं करून उभा होता म्हणून त्याचा चेहरा मात्र तिला दिसला नाहीं. नंतर ती व्यापाऱ्याला म्हणाली—" मला ह्यांच्या घरीं पोंचता कर. मला ह्यानीं विकत घेतलें आहे." नंतर ती व्यापाऱ्याबरोबर अलीशार जवळ गेली आणि म्हणाली—" तुम्ही कां नाहीं बोली बोलत? जास्त किंवा कमी? तुम्ही द्याल ती पुरे!" अलीशारजवळ जणुं कांहीं विनवण्या करीत ती म्हणाली.

अलीशार दुःखावेगानें तोंड फिरवून उभा राहिला आणि म्हणाला—" तुला विकत घेण्याची जबाबदारी मी घेत नाहीं व तूं माझ्या हातीं विकत जाण्याची घेऊं नये!"

तें ऐकून जमरूद हात जोडून त्याला म्हणाली—" असें कां बोलतां? हजार नाहीं तर नऊशें सांगा, आठशें सांगा, सातशें सांगा. नाहीं तर शंभर तरी सांगा!"

शेवटपर्यंत अलीशार नकारार्थी डोकें हलवीत होता. शेवटीं तो म्हणाला—" तेवढी रक्कम तरी माझ्याजवळ कोठें आहे?"

जमरूद उत्साहपूर्वक म्हणाली—" हरकत नाहीं! जेवढी रक्कम असेल तेवढी दे व बाकी रक्कम घरीं गेल्यावर पाठवून दे!"

"आतां मी काय सांगू? माझ्याकडे शंभर दीनार कोठून येणार? एक देखील नाहीं. हातांत नाहीं व घरीं देखील नाहीं. सोन्याचें नाणें तर नाहींच नाहीं, तांब्याचें किंवा जस्ताचें देखील नाहीं. माझ्यासाठीं उगाच तूं आपलें जीवित कां नष्ट करून घेतेस? चांगल्या श्रीमंत मालकाला निवडून घे!" अलीशार म्हणाला.

जमरूद म्हणाली—" राहूं द्या नाहीं तर, त्यांत काय? मला विकत घ्या. माझा हात आपल्या हातांत घ्या आणि सांगा कीं तुम्ही मला विकत घेतली. माझा हात आपल्या हातांत घेतलात तर मला तुम्ही विकत घेतली असा त्याचा अर्थ होईल."

अलीशारनें तसेंच केलें. त्याबरोबर ती गुलाम तरुणी त्याच्या अगदीं जवळ जाऊन त्याला टेकून उभी राहली व त्याच्या हातांत कांहीं तरी देत म्हणाली—" ह्यांत एक हजार दीनार आहेत. त्यांतले नऊशें माझ्या मालकाला द्या व बाकी शंभर आपण आपल्या खर्चा-करितां ठेवून घेऊं या!"

अलीशारनें पिशवींतले शंभर दीनार काढून जमरूदच्या मालकाला दिले व मग तिला घेऊन तो ज्या जागीं रहात होता तेथें



गेला. तो ज्या जागीं आहे ती जागा लहान असणार ह्याची कल्पना जमरूदला प्रथम पासूनच होती. घरीं आल्यावर तिनें आणखी एक पिशवी अलीशारच्या हातांत देत म्हटलें— "घरासाठीं लागणाऱ्या वस्तू बाजारांत जाऊन घेऊन या! एक गालीचा व रेशमी कापडाचें एक ठाणच घेऊन या! थोडी जर, चांदीची तार, निरनिराळ्या रंगाचा दोरा व एक मोठी सुईपण घेऊन या. खाण्यापिण्यासाठीं देखील जरूर त्या सर्व वस्तू घेऊन या!"

अलीशार बाजारांत गेला व त्याच्या प्रेयसीनें त्याला ज्या ज्या वस्तू आणायला

सांगितल्या होत्या त्या घेऊन आला. जमरूदनें आपलें घर खूप सजवलें. ती पडकी झोपडीच एकाद्या दिवाण खाण्यासारखी सुंदर दिसूं लागली. तिनें दिवे लावले. दोघं बसून जेवलीं. अशा तऱ्हेनें दोघांचा संसार खूप थाटला.

जमरूदला गालिचे विणतां येत होते व कशिदा काढतां येत होता. तिनें गालिचे विणले व कशिदा काढून सुंदर पडदे तयार केले. निरनिराळ्या रंगाची नकशी काढून पडद्यावर सुंदर वृक्ष, पक्षी व जीवजंतु काढले. एक पडदा करायला तिला पुरा एक आठवडा लागला. तो पुरा झाल्यावर तिनें त्याची सुंदर घडी घातली व अलीशारच्या हातांत देत म्हणाली—"ही बाजारांत घेऊन जा! पन्नास दिनार तरी किंमत खास मिळेल. त्याहून कमी किमतीला विकूं नका. चार चौघांना दाखवून जो जास्त किंमत देईल त्याला विका. कमी किमतीला विकलीत तर आपलेंच नुकसान होईल."

अलीशारनें त्या पडद्यांत विशेष काय तें समजून घेतलें व बाजारांत निघाला. त्यानें एका ओळखीच्या व्यापाऱ्याच्या हातीं तो पडदा पन्नास दीनार घेऊन विकला. जमरूदनें ते पैसे देऊन पुन्हां अलीशारला बाजारांत पाठविलें व पुन्हां नवीन कापड धागा, जर वगैरे वस्तू मागविल्या. तिनें एका आठवड्यांत आणखी एक पडदा करून दिला. तो त्यानें दुसऱ्या एका व्यापाऱ्याच्या हातीं पन्नास दीनार घेऊन विकला.

अशा तऱ्हेनें दोघांचा संसार थाटला व दोघं सुखानें राहूं लागलीं. दोघांच्या सुखा-बरोबर प्रेमांत वृद्धि होत गेली. पण एके दिवशीं....

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# देवाचा वर

शेजारची मंडळी बालाजीच्या दर्शनाला निघालेली पाहून मुलांनीं आजोबांना आल्याबरोबर सांगितलें.

आजोबा म्हणाले—"होय! असेल त्यांचा कांहीं तरी नवस! म्हणून निघाले असतील!"

"नवस म्हणजे काय आजोबा?" मुलांनीं विचारलें.

"कोणाला नोकरी पाहिजे, कोणाला परीक्षेंत पास व्हायचें आहे. कोणाला मूल पाहिजे. असे लोक देवाचा धांवा करतात!" आजोबा म्हणाले.

"नवस केला म्हणजे नोकरी मिळते का? परीक्षेंत पास होतां येतें का? देवाजवळ मुलें असतात का? नोकरी असते का आजोबा?" मुलांनीं विचारलें.

"वेडे आहां झालें. देवाजवळ कोठून मुलें आणि नोकरी!" आजोबा म्हणाले.

"मग देव कसा देतो हो?" मुलांनीं विचारलें.

"एक गोष्ट सांगतों म्हणजे कळेल तुम्हांला." असें सांगून आजोबांनीं गोष्ट सांगायला सुरवात केली.

एका गांवीं एक सांबाचें देऊळ होतें. देवळांत शंकराची पिंडी होती व समोर नंदी होता. एका बाजूच्या कोनाड्यांत देवीची मूर्त होती व दुसऱ्या बाजूला गणपतीची मूर्त होती. लोक देव दर्शनाला जात. त्यांत एक जण गांवांतला सर्वांत श्रीमंत लक्षाधीश होता व एक सर्वांत गरीब मजूर.

एकदां तो लक्षाधीश उशिरां देव दर्शनाला गेला. देवळांत पाऊल टाकल्याबरोबर त्याला



कोणीतरी बोलत असल्याचा भास झाला- "हा गरीब मजूर किती वर्षें झालीं, नित्य-नियमानें येऊन भक्तिभावें तुमची आराधना करतो आहे पण त्याची गरिबी कां दूर करीत नाहीं ?" बायकी आवाज होता.

"बरें तर मी तसेंच करीन ! गणराज ! उद्या संध्याकाळच्या आंत त्या गरिबाला एक लाख रुपये मिळतील असें कांहींतरी कर." असें पुरुषी आवाजांत कोणी तरी म्हटलें.

"बरें करतों !" तरुण पुरुषी आवाजांत उत्तर आलें.

त्या लक्षाधीशाला आश्चर्य वाटलें. शिव-पार्वती व गणपतीच बोलत असणार हें सर्व ! नंतर त्यानें देवळांत जाऊन पाहिलें तर आंत कोणी नव्हतें. मग तर त्याची खात्रीच पटली.

ज्याला मूठभर तांदूळ मिळणें कठीण, त्याला एक लाख रुपये ? या एक लाख रुपयांचा उपयोग कसा करावा हें देखील त्याला कोठें कळतें आहे. त्याला सुखा समाधानानें रहायला शंभर रुपये पुरतील. फार तर एक हजार ! लक्षाधीशानें विचार केला.

असा विचार करीत देवाला त्यानें नमस्कार केला व घरीं निघून गेला. त्याला रात्रभर झोंप आली नाहीं. जर गणपतीनें त्या मजुराला एक लक्ष रुपये दिले तर त्याचें हित होण्याऐवजीं तो संकटांत पडेल. त्या संकटांतून त्याचें रक्षण आपण केलें पाहिजे. त्या लक्षाधीशानें मनाशीं ठरविलें.

तो पहाटे उठून त्या मजुराकडे गेला आणि म्हणाला—"आज तुला जितके पैसे मिळतील सर्व मला दे, मी तुला त्याबद्दल शंभर रुपये देईन."

मजुराला आश्चर्यच वाटलें. म्हणाला— "कशाला थट्टा करतां गरिबाची ?"

तो श्रीमंत म्हणाला—"शंभरच काय, एक हजार रुपये सुद्धां देईन. पण तुला जितके पैसे मिळतील सर्व मला आणून दिले पाहिजेस ! तुझें जन्माचें दारिद्र्य नाहींसें होईल."

तें ऐकून मजुराला आनंद व्हायच्या ऐवजीं राग आला. म्हणाला—"तुम्ही आपले पैसे आपल्याजवळ ठेवा व मला मी ज्या स्थितींत आहे त्याच स्थितींत सुखानें राहूं द्या."

"मी खोटें बोलतों आहें असें का वाटतें तुला ? एक हजार नाहीं, दहा हजार देतों. अगदीं खरें ! पण एका अटीवर, तुला जें कांहीं आज मिळेल तें सर्व तूं मला दिले पाहिजेस." लक्षाधीश म्हणाला.

"पांच दहा हजारांच्या गोष्टी मला काय करायच्या आहेत ? मला हें सर्व कांहीं कळत नाहीं." मजूर म्हणाला.

प्रत्यक्ष रुपये पाहाल्याशिवाय मजुराला खरें वाटणार नाहीं असा विचार करून तो लक्षाधीश घरीं गेला व पन्नास हजार रुपये घेऊन आला आणि म्हणाला—

"हे घे बाबा ! हें सर्व धन तुझें. पन्नास हजार आहेत बरोबर. तुला ही सर्व थट्टा वाटत आहे. पण थट्टा नव्हे. तुला आज जें कांहीं मिळेल, मग तो एक पैसा असो कीं एक लक्ष



रुपये असोत, मला दिले पाहिजेस. देवाला साक्षी ठेवून शपथ घे !" लक्षाधीश म्हणाला.

साक्षात् शंकरानेंच आपल्यावर प्रसन्न होऊन या लक्षाधीशाच्या रूपानें येऊन आप-ल्यावर ही कृपा केली आहे असा विचार करून लक्षाधीशानें सांगितल्याप्रमाणें त्यानें शपथ घेतली. लक्षाधीश पन्नास हजार रुपये देऊन व निदान पन्नास हजारांचा तरी या सौद्यांत फायदा होईल असा विचार करून आनंदानें घरीं निघून गेला.

संध्याकाळपर्यंत लक्षाधीश मजुराची वाट पहात घरीं बसला होता. पण तो आला

नाहीं तेव्हां तो मजुराच्या घरीं जाऊन म्हणाला—"काय रे! तुला आज काय मिळालें? देऊन टाक मला!"

"मला एक पैसा देखील मिळाला नाहीं मालक!" मजूर म्हणाला.

लक्षाधीशाला वाटलें कीं शिव पार्वती व गणपति तिघांनीं आपल्याला फंसविलें. तो भीत भीत देवळांत गेला. तो आंत पाऊल टाकणार, इतक्यांत त्याला आंतून शंकराचा आवाज ऐकूं आला—"बाळा, गणराजा! तुला मी त्या गरीब मजुराला आज संध्याकाळच्या आंत एक लक्ष रुपये द्यायला सांगितले होते, ते दिलेस का?"

"लक्षाधीशाकडून पन्नास हजार देवविले आहेत बाकी पन्नास हजार पण देववितों!" उत्तर आलें. लक्षाधीशाला राग आला. तो आंत गेला व शंकराच्या मूर्तीला हलवून विचारूं लागला—"तूं कोण रे माझ्याकडून पन्नास हजार रुपये देववणारा? हें काय तुझें औदार्य झालें?"

तेव्हां काय झालें, कळलें? त्या लक्षाधिशाचे दोन्ही हात गणपतीनें आपल्या सोंडेनें घट्ट धरून ठेवले.

लक्षाधीश मोठ्यानें ओरडला—"बाप रे बाप! हा काय न्याय झाला देवा! सोड माझा हात!"

"तूं आणखी पन्नास हजार त्याला द्यायला कबूल होईपर्यंत सोडणार नाहीं." गणपति म्हणाला.

बिचारा लक्षाधीश काय करणार? कबूल झाला व त्यानें बाकी पन्नास हजार त्या गरिबाकडे मुकाट्यानें पोंचते केले.

ज्याच्याजवळ धन असतें त्याच्या जवळून घेऊन, ज्याला गरज असते त्याला देव देतो.





# लांडग्याचें सोंग

इंग्लंड देशाच्या एका किल्ल्यांत एक श्रीमंत सरदार रहात असे. तो तरुण होता व राजाचा स्वामीभक्त सेवक म्हणून प्रसिद्ध होता. त्याची बायको फार सुंदर होती. ती पतिव्रता असल्याचें नुसतें सोंग करी. तिचें दुसऱ्या एका सरदारावर प्रेम होतें. त्याच्याशीं लग्न करण्याची पण तिच्या मनांत फार इच्छा होती.

तिचा नवरा नित्य नियमितपणें आठवड्यांतून तीन दिवस कोठेंतरी परगांवीं जाऊन येई. तो ते तीन दिवस कोठें जातो, काय करतो हें कोणाला देखील माहीत नव्हतें. त्याच्या स्वामीभक्त नोकरांना सुद्धां माहीत नव्हतें. मग बायकोला तरी काय कळणार?

त्याच्या बायकोला वाटलें कीं तो कोठेंतरी गुप्त स्थानीं जात असावा व कांहीं गुप्त कामें करीत असावा. तें गुपित आपल्याला कळलें तर आपल्या खात्रीनें फायदा होईल? म्हणून ती एकदां आपल्या नवऱ्याला म्हणाली—"तुम्ही मला सोडून दर आठवड्याला दोन दोन तीन तीन दिवस कोठेंतरी जातां आणि मी मात्र एकटी वाट पहात घरीं बसतें. मला नाहीं एकटीला घरीं करमत!"

"काय करणार? कामच तसें असतें! नाहींतर मी स्वखुशीनें कधीं तुला सोडून जाईन का?" पति म्हणाला.

असें काय काम असतें कोणाला माहीत कीं मनाविरुद्ध इतके दिवस बाहेर रहावें लागतें. कळूं दे तरी! आज सांगितलेंच पाहिजे नाहींतर मी जेवणार नाहीं." ती अगदीं गळींच पडली.

तिनें फारच हट्ट केला म्हणन शेवटीं तिच्याकडून आणा शपथा करवून कीं ती तें




गुपित कोणाजवळ सांगणार नाहीं, सरदार बायकोला म्हणाला—"मी आठवड्यांतून तीन दिवस लांडग्याचें सोंग घेऊन जंगलभर फिरून येतों. हें माझें तीन दिवसांचें गुप्त काम आहे."

"रानांत जाऊन मी आपले सर्व कपडे एका जागीं लपवून ठेवून देतों. लांडग्याचें रूप घेऊन तीन दिवस हिंडल्यावर पुन्हां आपले कपडे घालून मनुष्य रूप घेऊन घरीं परत येतों."

"तर मग ते कपडे तुम्हीं कोठें ठेवतां? कोणाला सांपडत कसे नाहींत बाई?"

त्याच्या बायकोनें जणुकांहीं आपल्याला काय करायची ही सर्व चवकशी अशी बतावणी करीत चातुर्यानें पतीकडून तें गुपित पण काढून घेण्याच्या हेतूनें म्हटलें.

"तें मी नाहीं कोणाला सांगत. कारण तें गुपित जर का कोणाला कळलें व त्यानें माझे कपडे तेथून उचलून नेले तर मला आजन्म लांडग्याचें आयुष्यच घालवावें लागेल." सरदार म्हणाला.

तें ऐकून त्या बाईला परमानंद झाला. पण तिनें तो दर्शविला नाहीं व प्रेमाचा आव आणून त्याच्याकडून तें गुपित काढून घेण्यासाठीं तिनें हट्ट धरला. बिचाऱ्या सरदारानें तिच्यावर विश्वास करून तिला तें गुपित देखील सांगून टाकलें. म्हणाला—"रानांत एक ओसाड पडकें देऊळ आहे. त्यांत एका झुडपाजवळ एक दगड आहे. त्या दगडाच्या पोकळींत मी कपडे लपवून ठेवून देतों."

तें गुपित कळल्यावर तिला तिच्या नवऱ्याला कायमची रजा द्यायला मार्ग मिळाला. नवरा निघून गेल्यावर ती आपल्या प्रियकराला जाऊन भेटली व त्याला तिनें सारें गुपित जाऊन सांगितलें. तिच्या सांगण्यावरून व तिच्या इच्छेप्रमाणें तो त्या गुप्त देवळांत गेला आणि तिच्या नवऱ्याचे कपडे आणून त्यानें तिला दिले.

लांडग्याचें रूप घेऊन सरदार तीन दिवस रानांत फिरला. चवथ्या दिवशीं तो आपले कपडे घेण्यासाठीं देवळांत परत आला, तेव्हां त्याला तेथें कपडे दिसले नाहींत. त्याच्या बायकोनें त्याला फसवल्याचें त्याला कळलें. पण बायकोला त्याबद्दल शिक्षा किंवा दंड देण्यासारखी त्याची स्थिति नव्हती. कारण तो आपल्या लांडग्याच्या रूपांतच गांवांत गेला असता तर गांवांतले लोक व कुत्रीं त्याच्या अंगावर धांवून आलीं असतीं व त्याला ठार केलें असतें. म्हणून तो रानांतच राहूं लागला.

बायकोनें नवरा घरीं परतला नाहीं म्हणून रडण्याचें सोंग केलें. पण तिचा खरा हेतू दुसराच होता. तिनें कांहीं काळ लोटल्यावर आपल्या प्रियकराशीं लग्न केलें. दोघें आनंदानें निश्चिंतपणें राहूं लागलीं.

एक वर्ष लोटलें. सरदार लांडग्याच्या रूपानें रानांत हिंडत असे. रानांत जीं लहान मोठीं जनावरें मिळत, त्यांची लांडग्यासारखीच शिकार करी आणि




खाई. तो खरोखरच लांडग्यासारखाच राहूं लागला होता.

एकदां राजा शिकारीला त्याच रानांत गेला. त्याला व त्याच्या कुत्र्यांना लांडग्याचा वास आला. कुत्रीं लांडग्याचा पाठलाग करूं लागलीं. राजा व त्याच्या बरोबरचे लोक घोड्यावरून कुत्र्यांच्या पाठीमागून लांडग्याचा पाठलाग करूं लागले.

लांडगा शिकारी कुत्र्यांपासून आपला बचाव करीत दिवसभर पळत होता. अगदीं दमून गेला होता. सर्व अंगाला कांटे बोचल्यामुळें चाळणीसारखीं भोकें पडलीं

होतीं. अगदीं आतां मरायला तयार होऊन तो एका जागीं उभा राहिला. कुत्रीं जवळ येऊन पोंचलीं. राजा व त्याचे साथीदार पण पोंचले. लांडग्याच्या रूपांत राहणाऱ्या सरदारानें आपल्या मालकाला ओळखलें. तो राजाच्या घोड्याजवळ गेला व राजाच्या पायांवर आपला एक पाय व डोकें ठेवून उभा राहिला. सर्व चकित झाले. राजा म्हणाला—"लांडगा शरण मागतो आहे! याला कोणी हात लावूं नका. सोडा याला जंगलांत."

राजानें त्याला सोडायला हुकूम दिला पण लांडग्यानें राजाला सोडलें नाहीं. राजा राजधानीकडे परतल्यावर त्याच्या पाठोपाठ तो पाळलेल्या कुत्र्यासारखा चालूं लागला. राजधानींत गेल्यावर तो नेहमीं राजाबरोबरच राही. राजा झोंपला कीं त्याच्या पलंगाखालीं पडून राही. राजाला देखील इतर कुत्र्यांपेक्षां तो लांडगाच जास्त आवडूं लागला.

पुढें कांहीं दिवसांनीं राजानें दरबारांत आपल्या सर्व सरदारांना बोलाविलें होतें. त्यावेळीं लांडग्याचें रूप घेऊन हिंडणाऱ्या सरदाराच्या बायकोचा प्रियकर पण होता. त्याला पाहतांच लांडग्यानें त्याच्या अंगावर



उडी मारली आणि त्याची नरडी धरून त्याला खालीं पाडलें. पण सुदैवानें इतर लोकांनीं लांडग्याला मागें ओढून त्याला वांचविलें. त्या दिवशीं तीनदां लांडगा त्याच सरदारावर धांवला. तें पाहून राजाला पण आश्चर्य वाटलें. लांडगा नेमका त्या सरदारालाच चावायला कां धांवतो आहे? त्यांत कांहीं विशेष असलें पाहिजे. राजाला आतां आणखी एक भीति वाटूं लागली. लांडगा त्या सरदाराला तरी ठार करील किंवा तो सरदार तरी लांडग्याला ठार करील. म्हणून राजानें लांडग्याला बांधून ठेवलें.

पुढें कांहीं दिवसांनीं राजा पुन्हां त्याच रानांत शिकारीला गेला. तो रानांतल्या एका टुमदार बंगल्यांत उतरला. तो बंगला लांडग्याच्या वेषांत हिंडणाऱ्या सरदाराचाच होता. आपल्या स्वामीभक्त सरदाराचा तो बंगला आहे हें ऐकून राजानें त्यांतच उतरण्याचें ठरविलें होतें. त्या सरदाराच्या बायकोनें आपल्या प्रियकरावर राजा खूश रहावा असा विचार करून राजाच्या स्वागतासाठीं आपल्या पतीच्या बंगल्यांत मोठी मेजवानी दिली. ती राजाच्या स्वागतासाठीं म्हणून आपल्या प्रियकराबरोबर हंसत आनं-



दानें सामोरी आली असतां लांडगा तिच्यावर धांवला. ती मोठ्यानें ओरडली. लोक लांडग्याला ठार करायला धांवले. पण राजानें राजाला अडवलें व लांडग्याला आवरलें आणि म्हणाला—"मला एका गोष्टीचें आश्चर्य वाटत आहे. या बाईचा पहला पति माझा एक स्वामी भक्त नोकर होता. तो कोठें आहे, आजपर्यंत कोणाला कळलें नाहीं. दुसऱ्या पतीनें पहिल्याचा वाडा व सर्व धन-दौलत आपल्या हातीं करून घेतली आहे. हा लांगडा इतर कोणावर झडप घालीत नाहीं. ह्याच दोघांवर त्याचा राग कां आहे? ह्यांत कांहीं तरी गुपित असलें पाहिजे. ह्या दोघां नवरा बायकोंना प्रथम कैद करा, म्हणजे खरें गुपित कळेल."

राजाच्या आज्ञेनें सरदाराच्या पत्नीला व तिच्या प्रियकराला कैद करण्यांत आलें. तुरुंगांत तिला फार कष्ट सहन करावे लागले. ते असह्य झाले म्हणून एके दिवशीं तिनें सर्व गुपित राजाला सांगून टाकलें. राजानें आपल्या स्वामीभक्त सरदाराचे लपवून ठेवलेले कपडे मागविले व एका खोलींत ते कपडे व लांडग्याला ठेवलें. थोड्या वेळानें सरदार पोशाख करून बाहेर आला.

राजानें त्याच्या बायकोला व तिच्या प्रियकराला जन्मठेपीची शिक्षा देऊन कायमचा तुरुंगवास दिला व आपल्या स्वामी भक्त सरदाराला पुन्हां त्याचा वाडा आणि धन व दौलत परत देवविली. सरदार आपल्या किल्लेवजा वाड्यांत रहात असे. तो नेहमीं प्रमाणें आठवड्यांतून चार दिवस मनुष्य रूपांत आणि तीन दिवस लांडग्याच्या रूपांत राहून राजाच्या सेवेला हजर राहूं लागला.





# अरण्यकांड

राम सर्वांपुढें चालत होता. त्याच्या पावलावर पाऊल ठेवून सीता चालत होती व दोघांच्या मागें लक्ष्मण चालत होता. कित्येक ऋषी व मुनी पण रामाबरोबर चालत होते. अनेक पर्वत, नद्या व नाले आणि विविध प्रकारचे पशू व पक्षी पहात सर्व आनंदानें जात होते.

सूर्यास्ताच्या सुमारास ते एका सुंदर सरोवराच्या कांठीं पोंचले. सरोवराच्या आंतून मधुर संगीत ऐकून व कोणतें तरी वाद्य वाजत आहे हें ओळखून रामानें चकित होऊन धर्मभृत मुनींना विचारलें—"हें सर्व काय आश्चर्य आहे बुवा! ह्यांत कांहीं विशेष असेल तर सांगण्याची कृपा करावी."

धर्मभृत मुनि म्हणाले—"ह्या सरोवराचें नांव पंचाप्सर सरोवर असें आहे. मांडकर्णी नांवाच्या एका मुनींनीं आपल्या तपोबळानें हें सरोवर निर्मिलें. ह्या मुनींनीं दहा हजार वर्षें वायुभक्षण करून तपश्चर्या केली होती. तेव्हां अग्नि वगैरे देव घाबरले. त्यांना वाटलें कीं मुनि आपल्या तपोबळानें त्यांचें आसन हरण करतात कीं काय? म्हणून त्यांनीं पांच अप्सरांना मांडकर्णी मुनींची तपश्चर्या भंग करण्यासाठीं पाठविलें. मांडकर्णी त्या अप्सरांवर मुग्ध झाले. त्यांनीं आपल्या तपोबळानें हें सरोवर निर्मिलें. त्यांना पुन्हां यौवन प्राप्ति झाली. सरोवराच्या बुडाला त्यांनीं



त्या अप्सरांसाठीं एक वाडा बांधला व त्यांच्याबरोबर विवाह करून तेथेंच विहार करूं लागले.

धर्मभृत मुनींनीं ही कथा सांगितल्यावर राम-लक्ष्मण सीते सह आश्रमांत येऊन पोंचले. आश्रमवासियांनीं त्यांचें प्रेमानें स्वागत केलें. राम, लक्ष्मण व सीता महिने दोन महिने एकेका आश्रमांत रहात व ऋषी मुनींचा आशीर्वाद घेत सुमारें दहा वर्षें दंडकारण्यांत राहाले.

दहा वर्षें लोटल्यावर राम, लक्ष्मण व सीता सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमांत राहावयास आले. एकदां त्यांनीं मुनींना विचारलें–"अगस्त्य मुनि येथेंच कोठें तरी राहतात असें आम्ही ऐकलों. पण ते नकी कोठें राहतात हें आम्हांला कळलें नाहीं. आपल्याला त्यांचा आश्रम कोठें आहे हें माहीत असल्यास सांगण्याची कृपा करावी. त्यांच्या दर्शनाची अभिलाषा आहे. आमच्या हातून त्यांची देखील थोडी सेवा घडावी अशी फार इच्छा आहे."

सुतीक्ष्ण मुनि म्हणाले–"मी देखील तुला हेंच सुचविणार होतो. तूंच विचारलेंस म्हणून बरें झालें. येथून दक्षिणेकडे चार योजन चालून गेलास तर तुला अगस्त्य ऋषींचा आश्रम दिसेल. तो एक अत्यंत सुंदर आश्रम आहे. त्यांच्या दर्शनासाठीं जावयाचें असल्यास अवश्य जावें. शुभकार्यास कधीं उशीर करूं नये."

रामानें सुतीक्ष्ण ऋषींचे आभार मानले व त्यांचा निरोप घेऊन सीता व लक्ष्मणासह राम अगस्त्य मुनींच्या आश्रमाकडे निघाला. वाटेंत रामानें लक्ष्मणाला व सीतेला अगस्त्य मुनींचें चरित्र वर्णन करून सांगितलें आणि वातापि व इल्वल या दोघां राक्षसांचा वृत्तांत सांगितला.

इल्वल व वातापि नांवाचे दोन राक्षस होते. त्यांनीं कित्येक ब्राह्मणांना फसवून खाऊन टाकलें होतें. इल्वल ब्राह्मण वेष धारण करून संस्कृत भाषेंत बोले. तो ब्राह्मणांना म्हणे–"गुरुजी, या! आज आमच्या घरीं श्राद्ध आहे. आपण कृपा करून जेवायला यावें. ब्राह्मणांना तें सर्व खरें वाटे व ते जेवायला जात. वातापि बकऱ्याचें रूप घेऊन येई व त्याला कापून त्याचें मांस इल्वल ब्राह्मणांना वाढी. खाणें पिणें आटोपल्यावर इल्वल वातापीला हांक मारी–"वातापि! ये आतां." वातापि बकऱ्यासारखा "बें....बें...." करीत ब्राह्मणांचें पोट फाडून बाहेर येई.

अशा प्रकारें दोघांनीं अनेक ब्राह्मणांचा वध केला. एकदां इल्वलला अगस्त्य मुनि दिसले. त्यानें प्रार्थना केल्यावरून ते देखील जेवायला आले. त्यांनीं देखील बकऱ्याचें मांस खाल्लें. ते हात धुवायला बाहेर आले तेव्हां इल्वलनें त्यांना हात धुवायला पाणी देत म्हटलें–"वातापि ये आतां!"

अगस्त्य हंसत म्हणाले"मूर्खा! आतां वातापि कोठें आहे? तो तर केव्हांच यमलोकीं पोंचला. आपला भाऊ मेल्याचें



कळल्यावर इल्वलला भयंकर राग आला. तो अगस्त्य मुनींना खायला धांवला. पण त्यांच्या डोळ्यांतून जणूं अग्निवृष्टीच झाली व तो भस्म होऊन गेला. एका आश्रमाकडे बोट दाखवून रामानें येथवर गोष्ट सांगितली व लक्ष्मणाला म्हणाला–"अशा शक्तिशाली अगस्त्यऋषींच्या भावाचा हा आश्रम आहे."

अगस्त्य मुनींच्या भावानें पुढें येऊन राम, लक्ष्मण व सीतेचें स्वागत केलें. ती रात्र तेथेंच विश्रांतिसाठीं थांबून दुसऱ्या दिवशीं उजाडतांच राम लक्ष्मण सीतेसह पुढें निघाले.



अगस्त मुनींच्या आश्रमाकडे जात असतां त्यांना वाटेंत हत्तींनीं उपटून टाकलेलीं कांहीं झाडें दिसलीं. पक्ष्यांचा गोड आवाज ऐकूं आला. अगस्त्य मुनींच्या आश्रमालगतचा प्रदेश शांत व सुंदर होता.

राम लक्ष्मणाला म्हणाला—" अगस्त्य मुनि फार मोठे मुनि आहेत. वाढत्या विन्ध्य पर्वतानें सूर्याचा मार्ग आक्रमण केला. पण तो अगस्त्य मुनींचा फार आदर करीत असे. अगस्त्य मुनींना नमस्कार करण्यासाठीं तो वांकला तेव्हां अगस्त्य मुनींनीं त्याला तसेंच रहावयास सांगितलें. म्हणून जगावरचें संकट टळलें. अगस्त्य मुनि दक्षिणेकडे येऊन राहूं लागले. म्हणून दक्षिण दिशेला अगस्त्य दिशा असेंहि नांव मिळालें. अगस्त्य मुनींचा आश्रम अत्यंत पवित्र आहे. त्यांत क्रूर, वंचक व पापी यांना प्रवेश मिळत नाहीं. आतां लक्ष्मणा! तूं पुढें जाऊन अगस्त्य मुनींना मी सीतेसह आल्याचें सांग!"

लक्ष्मणानें अगस्त्य आश्रमांत प्रवेश करून अगस्त्य मुनींच्या एका शिष्याला नमस्कार केला व अयोध्येच्या दशरथ राजाचे जेष्ठ चिरंजीव श्री रामचंद्र सीतेसह अगस्त्य मुनींच्या दर्शनास आल्याचें सांगितलें.

अगस्त्य मुनि त्या वेळीं अग्निहोत्र गृहांत बसले होते. शिष्यानें येऊन रामचंद्र आल्याचें सांगितलें. त्यावर अगस्त्य मुनींनीं त्यांना आदरपूर्वक आश्रमांत घेऊन यायला सांगितलें. त्या प्रमाणें शिष्यानें राम, लक्ष्मण व सीता यांना नमस्कार करून आश्रमांत येण्यास विनंति केली. अगस्त्य मुनींचें सूर्यासारखें तेजस्वी मुख पाहून रामचंद्राला आनंद झाला. तिघांनीं त्यांना श्रद्धा व भक्तिपूर्वक नमस्कार केला व एका बाजूला उभे राहाले. अगस्त्य मुनींनीं त्यांना बसावयास सांगितलें. म्हणाले—" मोठ्या भाग्यानें तुमच्यासारख्या अतिथींच्या दर्शनाचा योग येतो." नंतर मुनींनीं त्यांना कंदमुळें व फळें खावयास दिलीं.

अगस्त्य ऋषींच्या जवळ एक रत्नखचित धनुष्य होतें. तें सामान्य धनुष्य नव्हतें. प्रत्यक्ष विष्णूचें धनुष्य होतें तें. विश्वकर्म्यानें तें तयार केलें होतें. मुनींजवळ ब्रह्मदेवानें दिलेलें एक अपूर्व अस्त्र होतें, इंद्रानें दिलेला एक भाता होता व सोन्याची मूठ असलेली एक तल्वार होती. हीं सर्व आयुधें अगस्त्य मुनींनीं आदरपूर्वक रामाला दिलीं व म्हणाला—" रामा! तूं मला दर्शन देण्यासाठीं इतक्या दुरून आलास. मला मनापासून आनंद झाला. तुला देण्यासारखें माझ्याकडे काय आहे? जें आहे तें मी तुला देत आहें. सीतेनें स्वखुशीनें पतीबरोबर वनवास स्वीकारला व कष्ट सहन केले. तिला थोडी विश्रांति मिळाली पाहिजे. तुम्ही सर्वच विश्रांति घ्या."

राम मुनींना नमस्कार करून म्हणाला—" मुनिवर, वनवास पुरा होईपर्यंत निवास करण्या योग्य स्थान सांगण्याची कृपा करावी."

" येथून दोन योजन अंतरावर गोदावरी नदीच्या काठीं पंचवटी नांवाचें एक पवित्र स्थान आहे. तेथें तुम्ही जाऊन रहावें. आतां



वनवासाचा अवधी जवळ जवळ संपत आला आहे तेव्हां तुम्ही तेथें जाऊन रहावें. वाटलें तर माझ्याच आश्रमांत रहावें. मला तुमच्या सहवासाचा आनंदच होईल. परंतु तुम्हांला स्वतंत्रपणें राहणेंच बरें वाटेल असें मला वाटतें. म्हणून मी आग्रह करीत नाहीं. म्हणूनच मी पंचवटीचें नांव सुचविलें. तें एक रम्य स्थान आहे. सीतेला तर तें फारच आवडेल. तो पलीकडे जो वृक्षसमूह दिसत आहे त्याच्या उत्तरेला थोडें अंतर चालून गेल्यावर एक वटवृक्ष दिसेल. त्याच्या पुढें एक टेकडी लागेल. त्या टेकडीवरून एक पर्वत व



त्याच्या बाजूला गोदावरी नदी दिसेल.''
अगस्त्य मुनि म्हणाले.

सीता, राम व लक्ष्मण तिघांनीं अगस्त्य मुनींना नमस्कार केला व त्यांचा निरोप घेतला. मुनींनीं सांगितलेल्या मार्गानें ते चालूं लागले. त्यांना वाटेंत एक फार मोठा पक्षी दिसला. त्यांना प्रथम वाटलें कीं तो राक्षस असावा. म्हणून त्यांनीं त्याला विचारलें—
''कोण तूं ?''

तो पक्षी म्हणाला—''मी, तुझे वडील महाराज दशरथ यांचा एक बालमित्र आहें. मी थोडक्यांत आत्मचरित्र तुला सांगतो. दक्षप्रजापतीला साठ मुली होत्या. त्यांपैकीं आठ जणींशीं कश्यप ऋषींनीं विवाह केला. त्यांपैकीं ताम्र नांवाच्या मुलीला पांच मुली झाल्या. त्यांत शुकी नांवाची एक मुलगी होती. शुकीला नट नांवाची मुलगी होती. नटला विनता नांवाची मुलगी झाली. विनताला गरुड व अरुण अशीं दोन मुलें झालीं. अरुण हें आमच्या वडिलांचें नांव आहे. श्येनि आमच्या आईचें नांव. मला एक भाऊ आहे. त्याचें नांव संपाति व माझें नांव जटायु. हें एक अति भयंकर जंगल आहे. ह्यांत अनेकानेक भयंकर श्वापदें राहतात. कित्येक क्रूर राक्षस आहेत. म्हणून तुम्हांला कांहीं हरकत नसेल तर मी तुमच्याबरोबर राहून सर्वदा आपलें रक्षण करीन. तुम्ही दोघे कोठें शिकारीला गेला असाल त्या वेळीं मी सीतेचें रक्षण करीन.''

जटायूचा वृत्तांत ऐकून रामाला फार आश्चर्य वाटलें व आनंद पण झाला. दशरथ महाराजांच्या मृत्यूची वार्ता जटायूला कळली होती. त्यानें रामाला धीर दिला व म्हणाला—
''मी असेपर्यंत तुला किंवा सीतेला कोणत्याहि प्रकारची काळजी करण्याचें कारण नाहीं.

जटायूचा निरोप घेऊन व त्याचा आशीर्वाद घेऊन राम, लक्ष्मण व सीता जटायूबरोबर पंचवटींत आले. पंचवटी हें एक विषारी सांप व हिंस्र श्वापदांचें निवासस्थान होतें. घनदाट झाडी पण तेथें होती.

राम म्हणाला—"लक्ष्मणा ! हीच पंचवटी ! आपल्या तिघांसाठीं एक पर्णशाला तयार कर. जरा उंचवट्याची जागा पाहून पर्णकुटी बांध म्हणजे पुराची भीति राहणार नाहीं व सर्व प्रकारें तें स्थान सुरक्षित राहील.

"मला जागेची निवड जमायची नाहीं. तूं मला दाखवशील त्या जागीं पर्णकुटी तयार करून देण्याची जबाबदारी माझ्यावर !" लक्ष्मण म्हणाला.

रामानें एक समतल उंचशी जागा पाहून तेथें पर्णकुटी बांधायला लक्ष्मणाला सांगितलें. ती जागा गोदावरीच्या काठीं होती. लक्ष्मणानें झाडाच्या काटक्या गोळा करून व तोडून त्याच्या चटया विणून तयार केल्या व खांब उभे करून त्या चटया भिंतीसारख्या खांबांना बांधल्या. नंतर छप्परासाठीं कांहीं चटया टाकून त्यांवर पानें पसरवून टाकलीं व बांबू टाकून ते दोरीनें आवळून बांधले. त्यानें आजूबाजूची जागा स्वच्छ केली.

त्यानंतर रामानें गोदावरीवर स्नान केलें. कमळें, फुलें व फळें घेऊन आला. लक्ष्मणानें त्या पर्णकुटीची पूजा केली व सर्वांनीं तींत प्रवेश केला.

लक्ष्मणानें इतका श्रम करून खरोखरच सुंदर पर्णशाला बांधली होती. रामानें प्रेमालिंगन करून त्याची पाठ थोपटली आणि म्हणाला—"लक्ष्मणा ! तूं माझी व सीतेची इतकी काळजी वाहतोस व सेवा करतोस कीं मला बाबांची आठवण होते."



# इनका पूल

अर्जेंटिनाच्या अँडीस पर्वतांत समुद्राच्या पातळीपासून ९००० फूट उंचीवर ईनकीचा पूल एक नैसर्गिक पूल आहे. मेंडोजा नदीनें कित्येक शतकें पर्वत पोखरून हा नैसर्गिक पूल निर्मिला. या पुलाखालीं त्याच नदीचा प्रवाह सतत चालू आहे.

